विश्वसाहित्य : १६ :

# बालपणींचा काळ सुखाचा

अनुवादक :
मंगेश पाडगांवकर

ग. पां. परचुरे प्रकाशन मन्दिर, मुंबई ४

मूल्य २-५०

प्रकाशक :
ग. पा. परचुरे
ग. पा. परचुरे प्रकाशन मन्दिर
गोरेगावकर चाळ क्र. २
गिरगाव, मुंबअी ४

Marathi Translation of
PRAIRIE-TOWN BOY
by Carl Sandburg


मुद्रक :
वि. पु. भागवत
मौज प्रिन्टिंग ब्यूरो
खटाववाडी, मुंबअी ४

# अनुक्रमणिका

## इतर कांहीं विश्वसाहित्य :

| | |
|---|---|
| ● धडधडते काळीज | २–२५ |
| ● आरोपी | २–५० |
| ● एकटा | २–५० |
| ● अमेरिकन संस्कृति | २ |
| ● असा आहे रशिया | २ |
| ● ध्रुवाचा अस्त | ५ |
| ● मी विजयी आहे | २ |
| ● अखेरचा रामराम | २–५० |
| ● आशियांतील धर्म संग्राम | १–५० |
| ● बेन फ्रॅंकलिन | १–५० |
| ● जॉर्ज वॉशिंग्टन | १–५० |
| ● अखेरचे पान | २–५० |
| ● अब्राहम लिंकन | १–५० |
| ● स्वातंत्र्याची नवीं क्षितिजे | २ |
| ● हेलेनकेलर . एक व्यक्तिरेखा | १–५० |
| ● बाळपणीचा काळ सुखाचा | २–५० |
| ● प्रेमळ घर | २–५० |
| ● स्वातंत्र्यवीर | २–५० |
| ● पांच भावाची गोष्ट | १–५० |

# गेलसबर्गची गोष्ट

इलिनॉय राज्यातल गेलसबर्ग ह एक शहर. न्यू इग्लडमधून आलेले लोक आणि त्याची मुलबाळ याचीच बहुताशी मालकी या शहरावर होती. चर्च, शाळा-कॉलेज, राजकारण—या सर्व व्यवहारावर याच लोकाचा ठसा होता. हे इग्लिश आणि स्कॉच-आयरिश वशाचे लोक थेट केटकी आणि टेनेसीपासून इथ आले होते. बऱ्याचशा स्वीडिश लोकानाहि मतदानाचा हक्क मिळालेला होता, त्यानी व्यापारात आणि राजकारणात आपल बरच वर्चस्वहि प्रस्थापित केल होत. तुरळक जर्मन लोकहि होते. १८९० च्या प्रारभी इटालियन लोकहि आले.

१८९० साली गेलसबर्ग शहराची लोकसख्या वीस हजाराच्या आसपास होती पन्नास वर्षाच्या कालावधीत जमा झालेले हे लोक होते. त्यापूर्वी गेलसबर्ग शहराच्या जागी वाऱ्याच्या लाटाबरोबर हेलावणाऱ्या विस्तीर्ण गवताळ प्रदेशाखेरीज दुसर काहीहि नव्हत! वसाहतीसाठी आलेले हे लोक जबर मेहनती होते, दुर्दैवाचे आघात झेलण्या-सोसण्याची त्याची ताकदहि मोठी होती! या लोकानी तो गवताळ प्रदेश साफ करून वस्तीला अनुकूल केला. रस्ते आखले. चर्च आणि शाळा बाधल्या ज्या गेलसबर्ग शहरात मी जन्मलो आणि वाढलो त्या शहरात निश्चित रगरूप असलेली परपरा निर्माण केली. या जुन्या लोकापैकी काहीना मी माझ्या बालपणी पाहिल्याच मला स्मरत. त्याच वय त्यावेळी ऐंशीच्या आसपास होत काळाच्या आघातानी ते पार थकले वाकले होते, त्याचे डोळे पैलतीरी लागले होत. माझ्या चिमुकल्या मनात मी त्याच्या तरुण वयातल चित्र आणण्याचा प्रयत्न करीत असे जिथ भितीचा, छपराचा मागमूसहि नव्हता, रस्त्याच नावहि नव्हत, अशा त्या हेलावणाऱ्या गवताच्या लाटासमोर उभे असलेले ते मला दिसत! घर बाधण्यासाठी प्रथम कुठला भाग साफ करायचा, हमरस्त्या-वरचा चौक, चर्च, शाळा, लोहारच मेट, किराण्याच दुकान, तरुण पिढीला नव्या प्रकाशाच जणू केद्रच झालेल कॉलेज हे सार कुठ कुठ उभारायच याचे आराखडे मनाशी बाधीत असलेल्या त्याच्या मूर्ति माझ्या डोळयासमोर उभ्या

गहत! वाऱ्या यावमान झोडपत्या जाणाऱ्या त्या गवतातन, शांततेचा भग करणाऱ्या जगली जनावराच्या भयद गर्जनातून नावारूपाला आलेल गेटसबर्ग शहर त्याच्या डोळयापुढे तरळत असलेल मला स्पष्ट दिसे!!

आपली बायका-मुल, ससाराची चीजवस्त घोडयाच्या गाड्यात घालून ओहियो, न्यू यॉर्क, टेनेसी, केटकी या दूरदूरच्या ठिकाणाहून ते इथवर आले होते घोडे पिटाळीत त्यानी दाट जगल तुडविली होती होडग्यातन किंवा वाफेवर चालणाऱ्या छोट्या बोटीमधूनहि काही आले होते अनत हालअपेष्टाना त्यानी ताड दिल होत. १८५४ साली नॉक्स तालुक्यात रेल्गाडी आली, त्यापूर्वीची ही गोष्ट आहे

मी जन्मलो त्या काळात पहिल्या वसाहतवाल्यापैकी एक पुढारी मोठ्या मानमान्यतेस चढला होता त्याच नाव जॉर्ज डब्ल्यू. ब्राउन माझ्या जन्माच्या वेळी तो गेलसबर्गचा मेयर होता. न्यू यॉर्कमधील सारटोगा नावाच्या खेड्यातला तो एक शेतात काम करणारा मुलगा होता तो सुतारकाम शिकला, आणि मोहॉक दऱ्यातील पहिल्या रेल्वे रस्त्याच्या बाधणीच्या वेळी त्याने काम केल इलिनाय राज्यात चागली जमीन स्वस्त मिळते आहे असं त्याच्या कुणातरी नातेवाईकाकडून त्याला समजल, आणि १८३६ साली वयाच्या एकविसाव्या वर्षी बायकोला बरोबर घेऊन तो इथ यायला निघाला बिकट रानातली वाट! पाऊस धो धो कोसळत होता! गाडीची चाक वाटेतल्या चिखलात रुतून बसत आणि ती बाहेर काढण्या साठी त्याला अक्षरश. तपश्चर्या करावी लागे! अखेर जुलै महिन्यात तो मुक्कामाला येऊन पोहोचला आपल्याजवळचे घोडे विकून त्याने ऐशी एकर जमीन विकत घेतली! तो घर बाधीत असे आणि त्यावेळी त्याची बायको शेतात काम करी! आपल्या मिळकतीतून तो थोडी थोडी शिल्लक टाकीतच होता आणि त्याच वेळी धान्याची पेरणी करण्यासाठी एक यत्र तयार करण्याच्या उद्योगात तो गर्क झाला होता. त्याचे प्रयोग सुरूच होते!

१८५२ सालच्या वसत ऋतूत या यत्राच्या साहाय्याने त्याने आपल्या सोळा एकर जमिनीची आणि आपल्या शेजाऱ्याच्या आठ एकराची पेरणी केली! त्या वर्षी अशी दहा यत्र तयार करण्याचा त्याचा सकल्प होता! पण एकच यत्र पूर्ण होऊ शकल या यत्राचे सर्व हक्क स्वाधीन ठेवण्यासाठी त्याने आपली सर्व जनावर—अगदी शेवटच्या घोड्यापर्यंत—विकून टाकली. मोठ्या प्रमाणावर ही यत्र तयार करून विकायची असं त्याच स्वप्न होत. या नादापायी त्यान आपल शेत विकल, आणि दहा टक्के व्याजाच्या दरान कर्जहि काढल १८५६ साली

गेटसबर्गमध्ये त्याचा कारखाना चालू झाला. त्या वर्षी सहाशे आणि पुढच्या वर्षी एक हजार यंत्रं त्यानं तयार केली. १८६१ ते १८६५ या युद्धकालात त्यानं तयार केलेली हीं यंत्रं मध्य व पश्चिम विभागात सर्वत्र वापरण्यात येऊ लागली. या यंत्रामुळे धान्याचं उत्पादन पूर्वापेक्षा अनेक पटींनी वाढलं. या युद्धात उत्तरेला जो विजय मिळाला त्याचं बरचसं श्रेय या नव्या यंत्राकडेच जातं. धान्याचं उत्पादन वाढलं नसतं, तर उत्तर विभाग या युद्धात फार काळ तग धरू शकला असता असं वाटत नाहीं. ब्राउनचा हा यंत्रं तयार करण्याचा कारखाना हळूहळू वाढत गेला. दर वर्षी आठ हजार यंत्रं या कारखान्यात तयार होऊ लागलीं. या कारखान्यात दोनशे माणसं काम करीत असत. शहरातली एक सबंध आळी त्याच्या कारखान्यानं व्यापली. न्यू मेथॉडिस्ट चर्च आणि त्याभोवतींचं आवार एवढाच काय तो याला अपवाद होता. ही जागा स्वतः ब्राउननंच चर्चसाठी म्हणून वेगळी राखून ठेवली होती. या चर्चचा तो एक सभासद होता. चर्चमध्ये तो नियमितपणे जात असे.

नाक्सविल रोड हा चार साडेचार मैलांचा रस्ता कॉटी फेअर या गावाकडे जातो. धुळीनं भरलेल्या या रस्त्यावरून चालू लागलं की वाटेत आयझॅक गलिहरचं घर लागतं. इलिनॉय राज्यातल्या सगमॉन तालुक्यात तो १८३० साली आला. १८३२ साली वयाच्या सतराव्या वर्षी 'ब्लॅक हॉक' युद्धात तो दाखल झाला, आणि कॅप्टन आब्राहम लिंकन याच्या हाताखाली त्यानं काम केलं. १८५८ साली लिंकन आणि डग्लस यांचा गाजलेला वादविवाद गेटसबर्ग येथं झाला. त्यासाठीच लिंकन नाक्सविल्ले येथून गेटसबर्ग येथे यायला निघाला होता. वाटेत त्याला कोणीतरी आयझॅक गलिहरचं घर दाखवलं. आपली गाडी थांबवून लिंकन खाली उतरला. त्याची गाडी थांबताच मागं असलेल्या गाड्यांची रांगच्या रांग तशीच उभी राहिली. लिंकन थेट आयझॅकच्या घरात गेला. सॅगमॉन कौंटी येथील जुन्या दोस्ताशी त्यानं थंडगार पाणी पीत पीत चार गप्पा केल्या.

डॅनियल ग्रीन बर्नर यांचं पाचशे सत्तेचाळीस एकरांचं शेत सेमिनरी रस्त्यावर होतं. 'ब्लॅक हॉक' युद्धासाठी कूच करीत असताना आब्राहम लिंकनला या गृहस्थानं पाहिलं होतं. त्याचा किराणा जिनसांचा व्यापार होता, आणि ज्या दुकानात गिऱ्हाइकांना माल देण्याचं काम लिंकन करीत असे, तेथे तो धंद्याच्या निमित्तानं जात असे. पोरवयातला तेव्हाचा लिंकन लोकांशी कसा वागतो हे डॅनियल बर्नरने पाहिलं होतं. गेटसबर्ग येथील एका वृत्तपत्राच्या बातमीदाराला बर्नरने एकदा

लिंकनच्या काहीं आठवणी सांगितल्या होत्या. "मोठा गमत्या होता बर लिंकन! सदा विनोद करीत असायचा! कधी स्वारीला लहर यायची आणि भिंतीला पाठ टेकून हात लांब पसरून उभा राहायचा. इतके लांबलचक हात मी दुसऱ्या कुणाचे पाहिल्याच मला आठवत नाहीं. लोकांना प्रसन्न वाटाव म्हणून तो खूप गमत करायचा. कुणाचंहि मन विरसलेल असल की त्याने खुशाल लिंकनकडे याव आणि मनमुराद हसून परत जाव! लिंकन मात्र आपली करमणूक करून घेण्यासाठी कधीहि कुणाकडे जात नसे! एक वल्ली होती स्वारी!! " बर्नरची ही स्मृतिचित्र ऐकत असताना मला सारख वाटायच की, बर्नरच्या शेतावर मला काम करण्याची संधि मिळाली तर मोठ फक्कड होईल! त्यामुळे त्याच्याजवळ राहून लिंकनच्या आठवणी जिवाची तृप्ति होईपर्यंत ऐकता येतील!!

नॉक्स कॉलेज, लॉम्बर्ग कॉलेज, ब्राउनच व्यापारी कॉलेज याच्यामुळे गेल्सबर्ग हे 'कॉलेजाच शहर' याच टोपणनावान ओळखल जाऊ लागल. पुष्कळ वेळा दोन गॅलनभर दुधाच भांड खांद्यावर घेऊन नॉक्स कॉलेजजवळच्या रस्त्यावरून मी जात असे. वाटेत मला एक बुटकेला माणूस भेटायचा. एकहि शब्द न बोलता नुसतीच मान हलवून तो मला अभिवादन करी मी सुद्धा न बोलताच मान हलवून पुढ जात असे. गुडघ्यापर्यंत लांब आणि अंगाला घट्ट बसणारा काळ्या रंगाचा कोट त्या माणसाच्या अंगात असायचा कोटाची बटण थेट त्याच्या हनुवटीपर्यंत गेलेली असायची. एखाद्या पंख्यासारखी त्याची दाढी पसरलेली असायची, आणि त्यामुळे समोरून त्याच्या कोटाची कॉलर कधीच दिसायची नाहीं! त्याची हनुवटी, ओठ या दाढीखाली पार झाकून गेलेले असत. एकदा मला कुणीतरी सांगितल की, हा माणूस आब्राहाम लिंकनला ओळखीत होता. नंतर मला कळल की, हा बुटकेला माणूस इलिनॉय राज्याच्या लोक-शिक्षण खात्याचा सुपरिंटेंडेंट होता, या पदावर सतत सात वेळा तो निवडला गेला होता, आणि या खात्यात त्याने चौदा वर्षं काम केल होत. स्प्रिंगफील्ड येथील राज्यगृहात त्याची खोली लिंकनच्या खोलीशेजारीच होती. लिंकनची आणि त्याची दोस्ती होती. दोघांच्या गप्पागोष्टीहि चालत असत!

या बुटकेल्या गृहस्थाच नाव होत न्यूटन बॅटमन. नॉक्स कॉलेजचा तो अध्यक्ष होता. 'छोटा न्यूट' या नावानेच तो ओळखला जाई. "माझा हा 'छोटा' दोस्त इलिनॉय येथील शाळेतला एक 'मोठा' शिक्षक आहे बर!" अशी त्याची ओळख लिंकन करून देत असे अस तो सांगत असे. एकदा तर लिंकनने

आपण लिहिलेलं एक महत्त्वाचं पत्र त्याच्याकडे आणून दिलं आणि त्यातल्या व्याकरणाच्या चुका सुधारून देण्याची त्याला विनंति केली !! "हे पाहा, व्याकरण हा विषय माझा कधीच पक्का नव्हता" असं लिंकन त्याला सांगे ! असंतोषाचं वादळ देशात निर्माण होणार आहे याची लिंकनला जाणीव झाली होती. विचाराचं थैमान डोक्यात सुरू झालं की लिंकन जोरजोरात येरझाऱ्या घालू लागे. अशा अस्वस्थ अवस्थेत येरझाऱ्या घालीत असताना न्यूटनने लिंकनला पाहिलं होतं. मग तोच अस्वस्थ होऊन लिंकन ओरडत असे, "मी कःपदार्थ आहे, पण सत्य मात्र महान् आहे, सत्य हेच परब्रह्म आहे." न्यूटनची लिंकनविषयाची आणखी एक आठवण मोठी गमतीची होती. अध्यक्ष म्हणून लिंकन निवडून आला होता. तो आगगाडीने स्प्रिंगफील्डहून वॉशिंग्टनला जायला निघाला होता. स्प्रिंगफील्डच्या स्टेशनवर खूप माणसं जमली होती. गाडी सुटायची वेळ झाली तेव्हा लिंकनशी हस्तांदोलन करून त्याला 'शुभास्ते पन्थानः' म्हणणारी न्यूटन ही शेवटची व्यक्ति होती. कारण नंतर गाडी सुरूच झाली !!

न्यूटन बॅटमनचा जन्म न्यू जर्सी येथे १८२२ साली झाला होता ! त्याचा बाप व्यवसायाने विणकर होता. तो लंगडा होता. आपली बायको आणि पाच मुलं यांना घेऊन तो १८३३ साली इलिनॉय राज्यात आला ! जॅक्सन व्हिले गावाच्या जवळ ते आले तेव्हा कॉलऱ्याच्या साथीने त्यांना गाठलं. या साथीला न्यूटनची आई बळी पडली. सगळेजण विलक्षण घाबरलेले होते. त्या भयानक मनःस्थितीत तिचं प्रेत वाटेतच पुरून टाकून हे कुटुंब पुढं मजल दरमजल करीत निघालं. न्यूटनच्या आईचं प्रेत नेमकं कुठं पुरलं याची काही खूणहि ठेवायला ते विसरले. बऱ्याच वर्षांनंतर न्यूटनने आपल्या आईचं थडगं शोधून काढण्याचा प्रयत्न केला, परंतु त्याला यश आलं नाही.

शिक्षण पुरं करण्यासाठी न्यूटनने खूप हालअपेष्टा सहन केल्या. सुई, दोरा, टाचण्या, पिना अशा किरकोळ सामानाचं बोचकं पाठीवर घेऊन विक्रीसाठी तो वणवण हिंडला. काही वेळा तर आठवड्याला फक्त अकरा सेंट खर्च करून त्याला केवळ कांजी आणि दूध यावर निर्वाह करावा लागला. प्रथम पाद्री होण्याची त्याची आकांक्षा होती. पण नंतर आपलं ध्येय बदलून तो शिक्षणक्षेत्राकडे वळला. जॅक्सन व्हिले येथील शाळेचा तो मुख्याध्यापक होता. राज्यातल्या शिक्षकांची त्याने संघटना निर्माण केली. १८७५ ते १८९२ पर्यंत तो नॉक्स कॉलेजचा अध्यक्ष होता. अध्यक्षपदावर इतक्या दीर्घ मुदतीपर्यंत राहणारा हा एकमेव मनुष्य

होता. त्याच्या हाताखाली शिकून गेलेल्या पदवीधरांनी जीवनाच्या विविध क्षेत्रात नावलौकिक मिळवला न्यूटनखेरीज दुसऱ्या कोणत्याहि अध्यक्षाला हे भाग्य लाभल नाहीं मला आठवत, एक माणूस एकदा मला म्हणाला होता की, न्यूटन हा चारित्र्यसपन्न पुरुष होता त्याच्या तेजस्वी चारित्र्याचा स्पर्श प्रत्येक विद्यार्थ्याच्या अंत करणाला होत असे वयाच्या सत्तराव्या वर्षी अध्यक्षपदावरून न्यूटन निवृत्त झाला सेवानिवृत्त झाल्यानतरहि काही काळ तो शिकवीत असे जान हस्टन फिनले न्यूटननतर नॉक्सचा अध्यक्ष झाला त्या वेळी फिनलेच वय अवघ सत्तावीस वर्षाच होत अमेरिकतल्या कॉलेजच्या अध्यक्षात सर्वात तरुण अध्यक्ष म्हणून तो ओळखला जात असे लिंकन आणि डग्लस याच्या सुप्रसिद्ध वादविवादाचा ७ आक्टोबर १८९६ हा दिवस फिनलेन सस्मरणीय करण्याच ठरवल या दिवसाच्या माहात्म्याशी नावस कॉलेजच नाव निगडित झाल पाहिजे अस त्याच्या मनान घेतल. या दिवशी फिनले नॉक्समध्ये मोठा समारभ घडवून आणीत असे समारभाच्या दिवशी वक्तृत्वाचे, वादविवादाचे फड गाजत समारभाच्या ठिकाणी माणसाची ही गर्दी जमत अस या गर्दीत धक्काबुक्की करून वाट काढीत चेन्सी डेप्यू याच भाषण ऐकल्याच मला आठवत चन्सी डेप्यू त्या दिवशी जे बोलला त्यातल एक अक्षरहि मला आज आठवत नाहीं परतु मी मोठ्या अभिमानान म्हणू शकतो की, न्यू यॉर्क सेंट्रल रेल्वेच्या या अध्यक्षाला, १८६४ मध्ये लिंकनच्या अध्यक्षपदाच्या निवडणुकीसाठी प्रचाराची तुफान भाषण करणाऱ्या या माणसाला, मी पाहिल होत, त्याच एक भाषण मी ऐकल होत

त्याच दिवशी दुपारी आब्राहाम लिंकनचा मुलगा रॉबर्ट लिंकन याच भाषण झाल होत ते भाषण मला सामान्य वाटल व्याख्यान सपल्यावर परत जाताना मनात घोळवावा असा एकहि विचार मला त्याच्या वक्तृत्वात आढळला नाही मी असं ऐकल होत की, रिपब्लिकन पक्षाच्या प्रत्येक अधिवेशनात त्याला राष्ट्राध्यक्षाच्या जागेसाठी उभे करण्याची सूचना यायची आणि त्याला फक्त एक मत मिळायच

गवताळ प्रदेशातल्या त्या शहरात त्या काळी अस तुकड्यातुकड्यानी मला शिक्षण मिळत होत माझ्या जीवनशिक्षणाचा ते शिक्षण एक अपरिहार्य असा भाग आहे याची मला त्या वेळी जाणीवहि नव्हती. गल्सबर्ग शहरात मला अनेक माणस भेटली. त्यातल्या काही माणसाची व्यक्तित्व, त्याचे स्वभाव मला एकाद्या कोड्याप्रमाणे वाटत. पुढे जेव्हा मी शेक्सपिअर वाचला तेव्हा मला कळल की

नेमक्या याच माणसाच्या स्वभावाचं कोडं शेक्सपिअरच्याहि प्रतिभेला पडलं होतं. गुल्बर्गा येथेच मी पशुपक्षी, झाडझुडपं जवळून न्याहाळली. निसर्गाच्या राज्यातले अनेक चमत्कार मी इथेच आश्चर्यभरल्या डोळ्यांनी पाहिले. नंतर मोठेपणी माझं वाचन वाढल्यावर मला आढळून आलं की थोरो, इमर्सन, वॉल्ट व्हिटमन यांचीहि मनं निसर्गातले असेच चमत्कार पाहून भारावून गेली होती. या काळात अनेक लोककथा, लोकगीतं मी ऐकली.

शाळा आणि पुस्तकं यांच्या व्यतिरिक्त जीवनात मी जे जे काही शिकलो त्यात छोट्या छोट्या गोष्टींचा फार मोठा भाग होता.

# आप्तेष्ट मंडळी

गेटसबर्गमधल्या ज्या घरात मी जन्मलो ते घर आज मला मुळीच आठवत नाही. ६ जानेवारी १८७८ या दिवशी माझा जन्म झाला. तेव्हा मध्यरात्र उलटून थोडा वेळ झाला होता. भावंडात सवात वडील माझी बहीण मेरी. तिच्यानंतर तीन वर्षांनी मी जन्मलो. मेरीनंतर माझ्या आईवडिलाना मुलगा हवा होता. अर्थातच, माझ्या जन्मामुळे त्याना विशेष आनंद झाला.

ज्या पाळण्यात मी लहानपणी झोपत असे त्या पाळण्याकडे बोट दाखवून मेरी एकदा मला म्हणाली होती, “या पाळण्यातून मला काढल आणि तुला ठेवल!” हा पाळणा माझ्या वडिलानीच तयार केल्याच आईने एकदा मेरीला सांगितल होत. माझ्या जन्मानंतर दीड वर्षांनी मार्ट जन्मला, मग मला काढून मार्टला त्या पाळण्यात ठेवल! धान्याच्या टरफलाच्या चटईवजा गादीवर मी जन्मलो. मी दहा वर्षांचा होईपर्यंत—तेव्हा आमच कुटुब एकूण नऊ माणसाच झाल होत—आम्ही सगळीं या टरफलाच्या केलेल्या ‘गादी’वरच झोपत असू. जमिनीपासून थोड्या उंच अशा लाकडाच्या चौपाईवर ही गादी घालण्यात येई! ही लाकडाची चौपाई आम्हाला फारशी आवडत नसे. कधीमधीं आम्ही मुल त्याविषयी कुरकूर करीत असू. कालांतरानें या चौपाया इतक्या जुनाट होत कीं त्या मोडत, आणि टरफलाची गादी थेट जमिनीवर येत असे! कित्येक वर्षेपर्यंत पराची गादी कशी असते हे देखील आम्हाला ठाऊक नव्हत, पण या टरफलाच्या गाद्यावर आम्हाला उत्तम झोप यायची, आणि त्यामुळे याच गाद्या आम्हाला पसंत असत. लाकडी चौपाया मात्र केव्हा मोडतील, आणि आम्ही केव्हा खाली येऊ याची खात्री नसे!

काही दिवसानी आम्ही पहिल घर सोडून नव्या घरात राहायला गेलो. हे तीन खोल्याच एकमजली घर होत. या घरातून मी माझ्या वडिलाना हातात फावड घेऊन बागेत काम करताना, गाजर-बटाटे लावताना, त्याची मशागत करताना पाहत बसे. कधी कधी मीहि माझ्या वडिलाच्या कामाला ‘हातभार’ लावीत असे. जमिनीतून गाजर आणि बटाटे उकरून काढायचे, त्याच्यावरचा चिखल खरवडून

टाकून ते एका टोपलीत जमा करायचे. साफ केलेली गाजर आणि बटाटे हातात धरताना मला फार फार बर वाटे. आमच्याकडे एक घोडी होती. तिच नाव ठेवल होत डॉली! तिचा रग लालसर तपकिरी होता. स्थूल, काहीशी म्हातारी आणि चालीला मद अशी ही घोडी आम्ही दोन माणसाच्या गाडीला जुपीत असू. या गाडीतून फिरतानाच प्रथम आम्ही आमच्या घराच्या आजूबाजूच्या निसर्गाच दर्शन घेतल. डोलावणार गवत, ती वळण घेत जाणारी मैलोगणती पसरलेली तारांची कुपण, विस्तीर्ण शेत, गुरामेढराचे कळप, कुरणात मजेत चरणारे घोडे — हे सार अजूनहि माझ्या डोळ्यापुढ उभ आहे! कुरणात मजेत चरणारी जनावर पाहताना मला विलक्षण सुख होत असे. कौतुकाच्या डोळ्यांनी मी ते सार दृश्य पीत असे.

स्वीडिश ल्युथरन चर्चमध्ये आम्ही प्रार्थनेसाठी नियमितपणं जात असू. मात्र महिन्यातून एखाद्या रविवारी सकाळीच डॉलीला जुपून आम्ही क्रेन्स याच्या घरी जात असू. आमच्या घरापासून सात मैलावर सॉपर व्हिले या गावी जॉन आणि त्याची पत्नी लीना क्रेन्स रहात असत. त्याच तीस एकराच शेत होत. लीना माझ्या आईची चुलत बहीण होती. माझे आईवडील आणि क्रेन्स पतिपत्नी याच चागलच सख्य होत. एकमेकाची भेट झाली की त्याचे चेहरे आनदान उजळून निघत, आणि मग मोठ्या जिव्हाळ्यान त्याच्या गप्पागोष्टी सुरू होत. तीं सगळींच माणस मोठीं मेहनती होती. आपल्या कामात तीं मनापासून रगून जात. त्यावर चर्चाहि करीत. तस पाहिल, तर त्याच वय काहीं फारसं नव्हत. सगळींच जण चाळिशीच्या आत असतील नसतील. ती चौघजण स्वीडिश भाषेत फडाफड बोलत. त्याची भाषा आम्हा मुलाना फारशी कळत नसे, तीं काय बोलली हेहि सागण आम्हाला कठिण गेल असत. स्वीडनमधून ती इथं आलीं तेव्हाच्या प्रवासातल्या आठवणीविषयी त्याच बोलण सुरू झाल की त्याचा तो प्रवास मोठा खडतर होता एवढाच पत्ता आम्हा मुलाना त्याच्या बोलण्यावरून लागत असे. जवळ जवळ दहा आठवडे त्यानी जहाजातून प्रवास केला होता. काळसर पाव आणि चीज एवढ्याच अन्नावर त्याना प्रवासात गुजराण करावी लागली होती. खरच, तो प्रवास म्हणजे एक दिव्यच होत!! कधी कधी सहज बोलता बोलता आई म्हणायची, "त्या वेळी पाढऱ्या शुभ्र पावाच दर्शन आम्हाला ईस्टर आणि खिसमस याच दिवशी काय ते व्हायच! इथे अमेरिकेत आता शुभ्र पाव ही नेहमीचीच गोष्ट होऊन बसली आहे!"

गेल्सबर्ग येथल होम्स याच कुटुंब सोडून दिल, तर अमेरिकेत क्रेन्स हेच आमचे सर्वात जवळचे नातेवाईक होते. क्रेन्स पतिपत्नीने आपल एंशी एकराच शेत १८७० साली विकत घेतल. वर्षभर त्यानी अक्षरशः रात्रदिवस मेहनत केल्या तव्हा ते आपल सगळ कर्ज फेडू शकले. शेतीच्या कामात त्यान्या शेजाऱ्याना त्याना मदत केली शेजाऱ्याच काही काम असल की ते करायला क्रेन्स पतिपत्नीहि सदैव तत्पर असत ती दोघजण आपल्या शेताचाच जणू एक भाग झाली होती गुर चरवण्याच्या कुरणात, शेतात, भाजीपाल्याच्या बगीच्यात—कधीहि पाहाव क्रेन्स पतिपत्नी काही ना काही काम करताना आढळली असती जॉन क्रेन्स हा हाडाचा शेतकरी होता शेत, पिके, गुरढोर याच्याविषयीच त्याच्या मनात नेहमी विचार घोळत असायचे!

जॉन क्रेन्स मध्यम उचीचा होता चालताना डोक थोडस माग झुकवून, खाद सल सोडून चालण्याची त्याची मोठी गमतीची लकब होती. त्याच्या या चालण्याच्या विशिष्ट लकबीमुळे तो मला मोठा माणूस आहे अस पाहणाऱ्याला वाटायच त्याचे डोळे तेजस्वी होते त्याच्या ओठात सदैव असलेल मद स्मित त्याच्या दाढीतून देखील दिसत असे! आपल्या खोलीत तो स्वस्थ बसलेला असला तरी देखील, त्याचे केस आणि दाढी जोराच्या वाऱ्यान पिजारल्यासारखी दिसत असे मला कधी कधी तो आपल्या माडीवर घेऊन बसत असे माझे चिमुकले हात मी त्याच्या दाढीवरून फिरवायचा. मला मायेन गोजारीत तो स्वीडिश भाषेत 'माझ्या छकुकड्या' अस म्हणायचा आणि त्याच्या शब्दातून त्याच स्मित आणि प्रेम एखाद्या लाटेसारख पाळाळून गल्याच मला जाणवायच [illegible] कधी तो बायबल किंवा वर्तमानपत्र वाचीत असताना दिसायचा पण ह [illegible] कधीच! त्याच फार लक्ष असायच शेताकडे, गुराढोराकडे! तेच त्याच बायबल होत अस म्हटल तरी चालेल! वादावाद करण, शब्दाशी हुज्जत घालीत बसण, हे त्याच्या स्वभावातच नव्हत! मात्र जमीन जर का थोडी खडकाळ असली तर आपल्या कणखर हातात नागर धरून तो तिच्याशी हुज्जत घालीत बसे! वादविवादात कधीच न दिसणारी त्याची रग आपल्या बळकट हातात लगाम धरून तो घोड्यावर बसला की क्षणोक्षणी जाणवायची. कितीहि नाठाळ घोडा असो, जॉन क्रेन्सच्या रगल हाताचा स्पर्श होताच अगदी मऊ सूत व्हायचा!

सव कुटुबाला घेऊन रविवारी ल्युथरन चर्चमध्ये जायला जॉन क्रेन्स सहसा चुकत नसे त्याचे धर्मोपदेशकसुद्धा त्याच्याइतके निर्भय आणि श्रद्धावान्

असतील की नाही याची मला शंकाच आहे.

जॉन क्रेन्स शेतकऱ्याच्या स्वरूपातच ईश्वराला पाहत असावा. त्याच्या लेखी ईश्वर हा दैनंदिन कामे करीत राबणारा किसान होता. हा किसान या जगात, आणि या जगाच्या पैल असलेल्या अनेक जगात सुद्धा पेरणी, मळणी, कापणी या साऱ्या गोष्टी अत्यंत गूढ रीतीने करीत असतो अशी त्याची श्रद्धा होती. आकाशातल्या या शेतकऱ्याच्या शेतीला पीक कसं आणि कोणतं येतं हे समजणं मानवी बुद्धीच्या पलीकडचं आहे असं त्याला वाटे.

जॉन क्रेन्सचं एक धान्याचं कोठार होतं. हे कोठार लाकडाचं बांधलेलं होतं, पण त्याच्या जमिनी मात्र मातीच्या होत्या. क्रेन्सचे तीन घोडे आणि चार गाई जवळपासच्या कुरणात रात्रंदिवस फिरता चरताना दिसत. गाईचे आचळ धरून तिचं दूध काढताना मी प्रथम इथेच पाहिलं. त्या शुभ्र दुधाच्या झुरझुरु धारा एका स्वच्छ बादलीत पडत. दूध साठवण्यासाठी बांधलेलं तळघर जवळच होतं. या तळघराची जमीन मातीचीच असली तरी स्वच्छ आणि टणक होती. दुधाची भरलेली भांडी या तळघरात ठेवली जात. ही भांडी ठेवण्यासाठी लाकडाच्या फळ्यांचे स्टॅंड केलेले होते. या भांड्याच्या तोंडाशी दाट पिवळसर साय जमा व्हायची. साय घुसळून लोणी तयार करताना आम्ही प्रथम इथेच पाहिलं. इथं आम्ही जे दूध प्यालो ते काढताना आम्ही आमच्या डोळ्यांनी प्रत्यक्ष पाहिलं होतं. इथं जी अंडी आम्ही तळून खाल्ली तीहि कोंबडीनं घातलेली आम्ही डोळ्यांनी पाहिली होती. या गोष्टी आम्ही पूर्वी याचि देही याचि डोळा कधी पाहिल्या नव्हत्या. आणि म्हणूनच त्यांची नवाई, अपूर्वाई विशेष होती.

मी चार वर्षांचा झालो तेव्हा पुन्हा आम्ही घर बदललं. आधीच्या घराच्या हे घर जवळ जवळ तिप्पट होतं. दहा खोल्या होत्या. तिसऱ्या मजल्यावर एक मोठी गच्चीवजा खोली होती. कोंबड्यांच्या खुराड्यासाठी एक वेगळी खोली, घरासमोर एक मोठा बगीचा असा एकूण थाट होता. या घराचा मालक म्हणून ऑगस्ट सटबर्ग या म्हाताऱ्या स्वीडिश माणसानं आपला परिचय करून दिला. पहिल्या मजल्यावरच्या दोन खोल्या भाड्याने दिल्या जात.

माझ्या वडिलांना लिहिता येत नव्हतं. वाचता मात्र येत असे. स्वीडन मध्ये असतानाच त्यांचे आईबाप वारले. त्याच काळात ते थोडंसं वाचायला शिकले. त्यांची अक्षर ओळख ही अशी होती. आईबापाच्या मृत्यूनंतर एका दारू गाळण्याच्या कारखान्यात हलकीसलकी कामं करणारा पोऱ्या म्हणून ते नोकरीला राहिले. इथे

काम करून स्वीडनहून जहाजान अमेरिकेत येण्यापुरते पैसे त्यांनी जमा केले ! ते न्यूयॉर्कला आले आणि त्यांनी तिथल्या काही स्वीडिश लोकांच्या ओळखीने चीज तयार करण्याच्या एका कारखान्यात नोकरी मिळवली ! त्यांचा चुलतभाऊ मॅग्नस होम्स त्यावेळी गेल्सबर्ग येथे होता. चीजच्या कारखान्यात काम करणाऱ्या माझ्या वडिलांना होम्सन एक पत्र लिहिल. गेल्सबर्गमध्ये नवीन कामाला बराच वाव आहे असा उल्लेख त्या पत्रात होता. मॅग्नस होम्स १८५४ साली गेल्सबर्गला आला. रॉक रिव्हर नदीचा पूल बांधण्याच काम तेव्हा चालू होत. तिथे त्याला काम मिळाल. त्या वेळी त्याच वय एकोणीस वर्षांच होत. तो स्वीडनमध्ये जर दोन वर्षं अधिक राहता तर त्याला लष्करात जाण भाग पडल असत. त्याच्या वडिलांनी आपल्या एकविसाव्या वर्षापासून तो थेट सेवानिवृत्त होईपर्यंत स्वीडिश लष्करातच काम केल होत. सैनिकाच जीवन इतक्या जवळून पाहिल्यामुळे की काय कुणाला ठाउक, मॅग्नसला सैनिकी जीवनाचा उबग आला होता. काही झाल तरी आपण सैन्यात जायच नाहीं अस त्यान आपल्या मनाशी अगदी पक्क ठरवून टाकल होत. म्हणूनच वयाच्या एकोणिसाव्या वर्षी तो स्वीडनहून पळाला आणि अमेरिकेत येऊन थडकला. प्रवासासाठी पैसे जमा करताना आणि नतर वादळवाऱ्याच्या थपडा खात जाणाऱ्या जहाजातून प्रवास करताना त्याला बरेच खडतर अनुभव आले असले पाहिजेत ! मॅग्नसच खर आडनाव होत होम. गेल्सबर्ग येथे आल्यावर होम या नावात बदल करून त्याने होम्स केल. होम हे नाव उघड उघड स्वीडिश वाटत. होम्स हे आडनाव मात्र खास इंग्लिश आहे. हॅनिबल येथे रेल्वेचा रस्ता बाधण्याच काम चालू होत. मॅग्नसने तिथं काम मिळवल. मेथॉडिस्ट पथाच्या लोकांच्या एका सभेत त्याची एका स्वीडिश मुलीशी ओळख झाली. एका कुटुंबात घरकाम करणारी मोलकरीण म्हणून ती नोकरीला होती. त्या कुटुंबात त्यावेळी गुलाम ठेवण्याची प्रथा चालू होती. मॅग्नस या स्वीडिश मुलीच्या प्रेमात पडला. नतर त्या मुलीने हॅनिबल येथील कुटुंबातल काम सोडल आणि ती गेल्सबर्ग येथे आली. तिथल्या लॉम्बर्ड कॉलेजातल्या मुलींच्या वसतिगृहात तिने काम मिळवल. त्यावेळी मॅग्नसला रेल्वे कारखान्यात घण घालण्याच काम मिळाल होत. इथे असताना त्याच्या आणि त्या स्वीडिश मुलीच्या वारवार भेटीगाठी होऊ लागल्या. ती मुलगी गृहकृत्यात निष्णात होती, दिसायला देखणी होती, एवढ्यासाठी ती मॅग्नसला आवडली होती अस नव्हे, आणखीहि एक मोठ गमतीच कारण होत : ती मुलगी गटेच्या फाऊस्टच इग्रजी भाषातर वाचीत असे आणि विशेष म्हणजे,

ते पुस्तक तिच स्वतःच होत. शेवटी जे व्हायच तेच झाल. एका सुप्रभाती मॅग्नस त्या मुलीशी विवाहबद्ध झाला !

नॉक्स कॉलेजाच्या आवारात १८५८ साली झालेला वादविवाद थंडीवाऱ्याच्या माऱ्यात तीन तास उभे राहून मॅग्नस पतिपत्नीनी ऐकला होता. वीसबावीस हजार लोकाचा समुदाय आब्राहम लिंकन आणि स्टीफन डग्लस याची भाषण ऐकण्यासाठी जमला होता. मॅग्नस होम्सने लिंकनला आपल मत दिल. पण 'सैन्यात दाखल व्हा' हा लिंकनचा आदेश मात्र त्याने पाळला नाही. सैनिकी जीवनाचा त्याला उबग होता एवढच नव्हे, तर युद्ध या गोष्टीला त्याचा तात्त्विक विरोध होता.

माझे वडील गेल्सबर्ग येथे आले, तेव्हा त्याना सल्ला आणि नोकरी या दोन्ही गोष्टी देण्याच काम त्याच्या या अनुभवी चुलतभावाने केल. सी. बी. ॲण्ड क्यू रेल्वेचा एक लोहमार्ग बांधण्याच काम चालू होत. मॅग्नसच्या ओळखीमुळे माझ्या वडिलाना तिथे काम मिळाल दिवसाला एक डॉलर याप्रमाणे या कामाचे पैसे मिळत ! दिवसाला दहा तास याप्रमाणे आठवड्यातले सहा दिवस काम कराव लागे. शिवाय जेवण करण्यापासून तो भांडीधुणी करण्यापर्यंत घरची सर्व काम त्यानाच करावी लागत !

माझ्या आईच पूर्वीच नाव होत क्लॅरा मॅथिल्डा ॲडरसन. तिची आई लहानपणीच वारली आणि तिच्या बापाने दुसर लग्न केल माझ्या आईची सख्खी आई ॲप्पुना येथे बदक पाळण्याचा धंदा करीत असे. माझी आई तिला या कामात मदत करायची. पण तिच्या मृत्यूनतर सावत्र आई आली. माझ्या आईच तिच्या सावत्र आईशी पटेना. त्या वेळी अमेरिकेत स्थायिक झालेल्या स्वीडिश लोकाची त्याच्या नातेवाइकाना पत्र येत असत. कामधंदा मिळवण्याच्या दृष्टीने अमेरिकेत भरपूर वाव आहे असं त्या पत्रात लिहिलेल असे. माझ्या आईने अमेरिकेला जायच ठरवल. त्यासाठी तिने थोडे थोडे पैसेहि जमवायला सुरवात केली. पुरेसे पैसे जमले तेव्हा ती अमेरिकेला जायला निघाली.

माझ्या आईची आणि वडिलाची भेट कशी झाली आणि त्याच लग्न कस जुळल याविषयी मी एकदा माझ्या आईला विचारल. ती म्हणाली, "बुशनेल या शहरातल्या एका हॉटेलात मी नोकरी करीत होते. बिछाने घालण, स्वयपाकात मदत करण इत्यादि काम मी करीत असे. रेल्वेरस्त्यावर काम करणाऱ्या काही कामगाराबरोबर तो एकदा या हॉटेलात उतरला. त्याने मला पाहिल. आम्ही एकमेकाशी

होतं. तो म्हणाला, मला तुझ्याशी लग्न करायचं आहे. त्या क्षणीं साक्षात्कार झाल्यासारखं मला एकदम जाणवलं की, माझ्या आयुष्यातली ही सोन्याची संधि चालून आलेली आहे! लवकरच आम्ही दोघं गेल्सबगला गेलो तिथं रे. लिन्हॉफ यांनी आमचं लग्न लावून दिलं आम्ही दोघांनी आमचा संसार थाटला" हे सारं सांगत असताना तिच्या किंचित् लाजऱ्या चेहऱ्यावर स्मित झळकून जायचं कसल्यातरी तेजानं डोळे क्षणभर झळाळून उठायचे "माझ्या आयुष्यातली ती महान संधि होती" लग्नानंतर कितीतरी वर्षांनी तिच्या तोंडून हे उद्गार निघाले होते या काळात तिनं काय सोसलं नव्हतं! कष्ट, दारिद्र्य, दुर्दैवाचे आघात हे सारं सोसूनहि विषादाची एक लहरसुद्धा तिच्या मनात निर्माण झाली नव्हती! उलट, मोठ्या तृप्तीनं, अभिमानानं ती सांगत होती, "तो माझ्या आयुष्यातला सोन्याचा क्षण होता डोळे मिटून मी उडी घातली हे माझं केवढं भाग्य!"

बाबांचे केस सरळ आणि काळे कुळकुळीत होते त्यांच्या खोलगट काळ्या डोळ्यांत किंचित् तपकिरी छटा होती ते मोठ्यानं हसले की त्यांच्या डोळ्यां भवतीच्या कातडीला सुरकुत्या पडत! त्यांची उंची मध्यमपेक्षाहि थोडी कमीच होती त्यांची शरीरयष्टि बळकट होती वजन चांगलं एकशे अठ्ठेचाळीस पौंड होतं त्यांची कॉलर खाली आली की त्यांच्या छातीचा गोरा वर्ण मानेवर बसलेल्या लोखंडाच्या कणांच्या काळ्या रंगाच्या थरामुळे विशेष उमटून दिसायचा! खेळांत त्यांना विशेष रस नव्हता पण खेळांत रंगून जावं तसे ते आपल्या कामात रंगून जायचे सी बी ॲण्ड क्यू रेल्वेच्या लोहारकामाच्या खात्यात ते मदतनीस म्हणून नोकरीला राहिले होते वर्षभर ते सटकून काम करायचे सुट्टी त्यांना कधीच मिळत नसे पहाटे पावणेसात वाजता कामावर जाण्यासाठी ते घरातून निघायचे बरोबर सात वाजता ते कामावर हजर व्हायचे त्यांना कधीहि उशीर होत नसे! घण घालण्याचं मेहनतीचं काम त्यांच्याकडे होतं दुपारी बारा वाजेपर्यंत हे काम चालू असायचं बारा वाजले की ते दुपारच्या जेवणासाठी घरी यायचे एक वाजता पुन्हा कामावर रुजू व्हायचे. संध्याकाळी सहा वाजले की काम संपायचं आणि ते घरी यायचे.

तोंडावर, मानेवर, हातावर चिकटलेले लोखंडाचे कण धुवून टाकायला त्यांना जवळ जवळ पधरा वीस मिनिटं लागायची. त्यांच्या हाताच्या घट्ट्यांत चिकटलेले लोखंडाचे कण जाता जात नसत. कितीहि खसखसून धुतलं तरी ते काळसर कण थोडेसे उरायचेच.

वसंत ऋतूत आपल्या बागेत ते रात्रीपर्यंत काम करीत असायचे. ऑक्टोबर महिन्यात टोमॅटो तोडण्याचं, बटाटे उकरून टोपलीत भरण्याचं त्यांचं काम चंद्रप्रकाशात चालू असायचं. थंडीच्या दिवसात आपले फाटलेले कपडे ते शिवीत बसायचे. त्यांच्याकडे घट्ट दोरा आणि एक जाडजूड सुई होती. या दाभणवजा सुईचा उपयोग ते तुटलेले बटण लावण्यासाठी करीत असत. त्या काळात शिकागोहून निघणार स्वीडिश भाषेतलं एक साप्ताहिक ते वाचायचे. ते किंवा माझी आई आम्हा मुलांना नियमानं स्वीडिश भाषेतलं बायबल वाचून दाखवीत असत.

माझ्या आईचे केस सुंदर होते. सूर्याच्या किरणांनी उजळलेल्या जाण्याच्या ओटाच्या ताटाचा असतो तसा तिच्या केसांचा रंग काळसर पिंगट होता. तिचे डोळे फिकट निळे होते. लिननचं कोरं कापड मेणबत्तीच्या प्रकाशात तकाकतं तसा तिचा गौरवर्ण भासायचा. कधीहि पहावं, माझी आई हसतमुख दिसायची. बाबांचा चेहरा सहसा गंभीर असे. आई दहा वेळा हसली की बाबा एकदा हसताना दिसायचे---असं हे प्रमाण होतं. माझ्या आईचं नाक बसकं नव्हतं. ते चांगलंच उठावदार होतं. तिची उंची पाच फूट पाच इंच होती आणि तिचं वजन एकशे चाळीस पौंडांच्या आसपास होतं. घरातलं काम ती सारखी करीत असायची. परंतु तिच्या चेहऱ्यावर थकवा म्हणून आम्हाला कधी दिसला नाही. नऊ माणसांचं आमचं कुटुंब होतं. घरातला स्वयंपाक, धुणीभांडी, शिवणटिपण, अंथरूण घालणं, साफसफाई ही सगळी कामं माझी आई एकहाती करायची. पहाटे सहा वाजता उठून ती बाबांच्या न्याहारीची तयारी करायची. ते कामाला गेले की मग आम्हा मुलांची न्याहारी. त्यानंतर दुपारचं आणि संध्याकाळचं सगळ्यांचं जेवण. जेवणखाण उरकल्यानंतर तरी तिला विश्रांति मिळायची म्हणता? ही कामं संपल्यावर आमचे फाटके कपडे शिवीत ती बसायची. आम्ही विजारी वापरू लागलो तेव्हा आमच्या गुडघ्यावर विजारी नेहमीच फाटायच्या. बाहेरच्या दंगामस्ती, गोट्या खेळणं, कुस्त्या, असे आमचे खेळ. मग विजारी फाटणार नाहीत तर काय? विजारींना गुडघ्यावर पडलेली ही भोकं, आई ठिगळ लावून दुरुस्त करीपर्यंत केविलवाणी होऊन तिची वाट पाहत बसायची!!

मॅग्नस होम्स हा बाबांच्यापेक्षा पंधरा वर्षांनी वडील होता. त्या दोघांची दृढ मैत्री होती. महत्त्वाच्या कामात बाबा होम्सचाच सल्ला विचारीत. १८७० साली

बाबा प्रथम स्वीडनहून होम्सच्याच घरी आले. गेल्सबर्गमध्यें होम्स पधरा वर्षे स्थायिक होऊन राहिला होता. तो पूर्णपणे अमेरिकन बनला होता. आयरिश आणि इंग्लिश माणसाबरोबर त्याने काम केल होत. या माणसाच्या सहवासात राहून होम्स पतिपत्नीनी इंग्रजी भाषा उत्तम शिकून घेतली---इतकी की घरात त्याच कुटुब इंग्रजीच बोलू लागल. होम्सचे चार मुलगे स्वीडिश भाषा मुळीं शिकलेच नाहीत.

माझे बाबा होम्सकडून कामापुरते लागणारे बरेचसे इंग्रजी शब्द शिकले अमेरिकन नागरिक होण्यासाठी कुठ जायच, कोणत्या कागदावर सही करायची, ही सर्व माहिती होम्सनेंच बाबाना दिली. 'थॅक्स गिव्हिंग' भोजन समारभाच्या दिवशीं होम्स कुटुब आमच्या घरी जेवायला येत असे आणि नव्या वर्षाच्या दिवशीं आम्ही होम्सच्या घरी जेवायला जात असू. अशाच एका भोजनाच्या प्रसगी अमेरिकेची राज्यघटना आणि स्वातत्र्याची घोषणा याच्याविषयी मॅमस होम्स बाबाबरोबर बोलल्याच मला आठवत. आमच्या कुटुबात मी, मेरी आणि मार्टिन स्वीडिश भाषा बऱ्यापैकी बोलायला शिकलो होतो. काही हव असल की लहानपणी स्वीडिश शब्द वापरूनच मी माझी इच्छा कळवीत असे. परतु आमच्या नतरची भावड एमिल, फ्रेड, एस्थर आणि मार्था याना मात्र 'दूध' या अर्थाचा एकच स्वीडिश शब्द येत असे. स्वीडिश भाषेत सहापर्यत आकडे सुद्धा त्याना मोजता येत नसत.

चर्चमधील प्रवचन स्वीडिश भाषेतच होत तरुण मुलाना काहीं स्वीडिश भाषा येत नसे. या प्रवचनातल एक अक्षर देखील आम्हाला कळत नाही अशी त्याची कुरकूर सुरू होई. यानतर चर्चमधल एखाद प्रवचन इंग्रजी भाषेत होऊ लागल. हळूहळू ही प्रथा वाढत गेली आणि कालातराने सगळीच प्रवचन इंग्रजीत होऊ लागली. हा बदल म्हाताऱ्या माणसाना मुळींच रुचला नाही. मायदेशापासून दूरवर आलेली ही माणस आपली प्रिय स्वीडिश भाषा ऐकायला अगदी आसुसलेली असत. प्रवचन इंग्रजीत सुरू झाल्यामुळे मायबोलीच्या श्रवणसुखाला आपण मुकलो याची त्याना खत वाटे.

स्वीडनमधल जीवन खडतर असल्यामुळें माझे आईबाप इतक्या दूरवर अमेरिकेत येऊन स्थायिक झाले. पण तरीहि स्वीडिश लोक आणि स्वीडिश भाषा याच्याविषयी त्याना विलक्षण जिव्हाळा वाटत असे. मायदेशाविषयींची ही भक्ति त्याच्या मनात खोलवर रुजलेली होती. परतु आमच्याशी बोलताना मात्र

माझे आईवडील स्वीडनविषयी फारसे कधी बोलत नसत. माझे आईबाप अमेरिकेत स्थायिक झाले त्यावेळी सुरुवातीची काही वर्षे त्यांचे सगळे लक्ष अमेरिकन जीवनाशी पूर्णपणे समरस होण्यावरच केंद्रित झाले होते. नव्या वातावरणाशी समरस होण्याच्या या धडपडीमुळे मायदेशापासून दुरावूनसुद्धा त्यांना फारसे चुकल्याचुकल्यासारखे वाटले नाही. जसजशी वर्षे उलटली तसतशी त्यांनी इंग्रजी भाषा आपलीशी केली. त्यांच्या मित्रमंडळापैकी बहुतेकांना स्वीडिश भाषेचा गंधहि नव्हता. माझ्या धाकट्या भावंडांनाहि इंग्रजीशिवाय कोणत्याच भाषेत बोलता येत नसे. अशा रीतीने स्वीडनहून आलेले आमचे कुटुंब त्या नव्या भूमीशी अगदी एकरूप होऊन गेले.

# बेरीन स्ट्रीटवरचें घर

१८८५ ते १८९० या काळात बेरीन स्ट्रीटवरच्या घरात आम्ही राहत होतो. सोळा–सतरा वर्षांच्या माझ्या वाटाळू नराच्या या काळात चड्डया घालून हिंडण्यापासून तों थेट विजार वापरण्यापर्यंतच्या सर्व स्थित्यंतरातून मी गेलो. मनमिळाऊ एमिल, त्याच्या पाठीवरचा फ्रेड, सुंदर दिसणारी एस्थेर, आणि तिची दिसण्यात साधी, विनम्र वृत्तीची बहीण मार्था हीं माझी भावंडं याच घरात जन्माला आलीं.

दहा खोल्याच्या त्या मत्या मोठ्या घराचा खर्च बाबाना झेपत नसे. घर दुरुस्तीचा खर्चदेखील त्याना पेलण्यासारखा नव्हता. त्यामुळे सुतार, गवंडी, रंगारी, माळी यांचीं कामं ते स्वतःच करीत. त्यांच्या हाताखालीं मी बारीकसारीक काम करीत असे. माझा धाकटा भाऊ मार्ट नंतर नंतर आमच्या मदतीला येऊं लागला. घरशाकारणीचं काम सुरू झालं की, शिडीवरून छपरावर चढून बाबाना कौलं काढून देण्याचं काम माझ्याकडे असे. पाण्याच्या टाकीच्या वार्षिक सफाईच्या दिवशीं मी उघड्या पायानीं टाकीत उतरत असे. तळाशीं साचलेला गाळ आणि चिखल मी एका बालदींत भरून ठेवी. ही बालदी दोऱ्याला बांधलेली असे. बालदी चिखलानें भरली की बाबा ती वर ओढून घेत. टेबल किंवा खुर्ची यांची मोडतोड झाली कीं हे सामान बाबा तळघरात घेऊन जात. केरोसीनचा दिवा हातात घेऊन मी उजेड दाखवी. त्या प्रकाशात बाबा ठोकठोक करीत हें मोडकं सामान दुरुस्त करीत बसायचे. रात्रीच्या जेवणानंतर शाळेच्या वाचनालयामधून आणलेलं जे. टी. हेडले या लेखकाचं 'नेपोलियन आणि त्याचे सेनापति' हं पुस्तक वाचण्यात मी अगदीं रंगून जात असें. इतक्यात बाबा माझ्या नावाचा पुकारा करीत. मी कुरकुरत म्हणायचा, "इतकं छान आहे हे पुस्तक! नेपोलियनचं चरित्र वाचण्याची मला विलक्षण उत्सुकता लागून राहिली आहे!" यावर बाबा म्हणायचे, "हे पाहा शाली (चार्ली या नावाचा उच्चार ते असा करायचे) तुझा नेपोलियन आज जरा बाजूला ठेव. आज मला खुर्ची दुरुस्त करायची आहे. माझ्याबरोबर तळघरात ये आणि दिवा घेऊन उभा राहा कसा!"

माझं नाव खरं म्हणजे होतं कार्ल ऑगस्ट सॅडबर्ग. एक-दोन वर्षं मी शाळेत गेलो आणि एक दिवस ठरवून टाकलं की, कार्ल हे नाव बदलून त्याचं चार्ल्स करायचं. कार्ल हे नाव स्वीडिश वाटायचं ते तसं वाटू नये यासाठीच हा खटाटोप होता!! सॅडबर्ग या आडनावाचं स्पेलिंगसुद्धा स्वीडिश पद्धतीनं न करता इंग्लिश वळणाचं करायचं असं आम्ही तिघा भावंडांनी ठरवलं होतं.

माझ्या बरोबरची इतर स्वीडिश मुलं 'च' चा उच्चार 'श' करीत. आमच्या पुस्तकात 'चार्लीज् चिकन्स्' या नावाची एक गोष्ट होती. ही स्वीडिश मुलं ही गोष्ट मोठ्यानं वाचताना शीर्षकाचा उच्चार हटकून 'शार्लीज् शिकन्स्' असा करायची. एके दिवशी वर्गातल्या मास्तरांनी शिरा ताणून सांगितलं की, बाबांनो, शार्लीज् नव्हे चार्लीज्. पण त्या मुलांचे उच्चार काही सुधारले नाहीत. मी मात्र बेहद्द खूष होतो. कारण मी नवीन धारण केलेलं नाव नेमकं कसं उच्चारायचं हे मला चांगलंच माहीत होतं.

मंगळवार हा धुणी धुण्याचा दिवस होता. हौदातून पाण्याच्या बादल्या भरभरून आणून मी त्या कपडे धुण्याच्या मोठ्या घंगाळात ओतण्याचं काम करीत असे. एका घंगाळात थंड पाणी असायचं व दुसऱ्या घंगाळात गरम. कपडे धुवून झाले की ते दोरीवर वाळत घालण्यासाठी टोपलीत भरून मी घरामागच्या अंगणात नेत असे. कडाक्याच्या थंडीच्या दिवसात ते कपडे गोठल्यासारखे घट्ट व्हायचे. हे गोठल्यासारखे झालेले कपडे सोडवून दोरीवर नीट वाळत घालायचे म्हणजे एक दिव्यच होतं. थंडीनं आखडलेल्या बोटांनी आम्ही काम करीत असू. खरं म्हणजे थंडी पडली की, इलिनॉयमध्ये हा एक खेळच होऊन बसायचा. कधी कधी जोराचा वारा यावयाचा आणि दोरीवरचा थंडीनं कडक झालेला वाळत टाकलेला सदरा एखाद्या फळकुटासारखा खाडकन् डोक्यात बसायचा. कित्येक वेळा स्वयंपाकखोलीत जाऊन हे कपडे (आणि माझी बोटं) थोडेसे शेकून मगच मी ते वाळत घालण्यासाठी बाहेर नेत असे.

कपडे धुवून झाल्यानंतर स्वयंपाकखोलीतली फरशी धुण्याचं काम आई सुरू करी. साबणाचं पाणी ती फरशीवर ओतून ठेवायची. स्वयंपाकखोलीतल्या एका टेबलावर आम्ही यावेळी चढून बसत असू. साबणाच्या पाण्यात उभं असलेलं ते टेबल चहूबाजूला पाणी असलेल्या एखाद्या बेटासारखं किंवा नदीतून वाहून जाणाऱ्या एखाद्या घराच्या छपरासारखं दिसायचं. या बेटावर किंवा या छपरावर बसून आम्ही वाहत वाहत दूर दूर चाललो आहोत अशा कल्पना आमच्या

डोक्यात नाचू लागत. बाहेर वाळत घातलेले कपडे दुसऱ्या दिवशी टोपलीत भरून मी पुन्हा घरात आणीत असे. मंगळवारचं सकाळ-संध्याकाळचं जेवण उकडलेले बटाटे आणि शिजवलेले हरिंग मासे हे असायचं. मंगळवारच्या जेवणाचा हा बेत वर्षानुवर्षे तसाच होता. हा उपक्रम अनेक पिढ्यांचा होता. या खाण्या-मुळेच स्वीडिश लोक मजबूत होतात असंच सारे मानायचे, हंस अनेक वेळा बोलूनहि दाखवायचे.

बराच काळ आम्ही आंघोळी केलेल्या नाहीत असं आईच्या लक्षात आलं की, ती घंगाळात गरम पाणी उपसून घ्यायची आणि आमच्या हातात साबण देऊन आम्हाला आंघोळीला पाठवायची. मी आणि माझा धाकटा भाऊ मार्ट आंघोळ झाली की झोपायला जायचं. मग आमच्या बहिणी आंघोळ करायला यायच्या.

हिवाळ्याच्या दिवसात हातात थोडेसे पैसे असले की बाबा सफरचंद विकत घ्यायचे आणि एका पिपात भरून ती पहिल्या मजल्यावरून तळघराकडे जाणाऱ्या जिन्याच्या खाली थोडीशी जागा होती तिथं ठेवायचे. या लहानशा जागेला त्यांनी एक दरवाजाहि केला होता. सफरचंद आम्हा मुलांच्या हाती लागू नयेत म्हणून ते या दरवाज्याला कुलूप लावून त्याची चावी लपवून ठेवायचे. दरवाज्याच्या वरच्या बाजूची फळी निखळलेली आहे हे आमच्या सुदैवाने त्यांच्या लक्षात आलं नव्हतं. मी आणि मार्ट या मार्गानं हळूच या लहान्या खोलीवजा जागेत प्रवेश करायचे. एका वेळीं आम्हीं दोन सफरचंद लपास करीत असू आणि तीहि एक दिवसाआड! आमची ही शिताफी कधीच कोणाच्या लक्षात आली नाही. मी आणि मार्ट एकमेकांना म्हणायचे, "हे पाहा, आपण दररोज दोन सफरचंद घेतो म्हणजे प्रत्येकाच्या वाट्याला फक्त एकच येतं आणि एक सफरचंद एकानं घेणं याला काहीं चोरी म्हणता यायचं नाहीं. हो, फार तर सफरचंद आम्हीं हळूच उचललं असं म्हणता येईल."

आमच्या भाडेकरूंपैकी 'ज्यो एल्सर' हा मला विशेष आठवतो. खांद्यावर सुतारकामाच्या हत्यारांची पेटी घेऊन त्यानं आमच्या घरात प्रवेश केला होता. त्याचं इतर सामान गाडीनं आलं होतं. वरच्या मजल्यावरच्या पूर्वेकडच्या दोन खोल्या आम्ही त्याला भाड्यानं दिल्या होत्या. या खोल्यांकडे जायला बाहेरच्या बाजूने एक लाकडी जिना केलेला होता. या जिन्याच्या खाली कोळशाचं पिप ठेवलेलं असे. दारू, धूम्रपान, तंबाखू यांपैकी ज्यो एल्सरला कसलंहि व्यसन नव्हतं. चर्चमध्ये तो

चुकूनहि जात नसे. त्याच्या खोलीत एकहि पुस्तक नव्हत, वाचनालयातूनहि तो कधीच पुस्तक आणीत नसे. कसलीहि तक्रार करताना ज्यो एल्सरला मी कधी पाहिल नाहीं. तो आजारी पडल्याचहि आम्ही कधी ऐकल नाहीं. आपला स्वयपाक, धुणी, कपडे, शिवण, पायमोजे रफू करण हीं सारी काम तो स्वतः करी. आपली खोली तो नेहमी स्वच्छ आणि नीटनेटकी ठेवीत असे. ज्योचा बांधा उच आणि बळकट होता कधीहि पाहावे त्याची हत्यारे त्याच्या खाद्या-वर असत, जसा काहीं त्या सुतारकामाच्या हत्याराचा त्याला विलक्षण लळा लागला होता त्याच वय पन्नाशीच्या जवळपास होत आपल काम तो आनदान करी पार्ट गडबडीत असलेला त्याला कधीच कुणी पाहिला नाहीं. काम करीत असताना त्याचा हात भपसप चालत असे वर्षभर त्याला बऱ्यापैकी काम असे. कधी कधी जिथे त्याला काम मिळायच त्या घराच पायाभरणीचच काम सपलेल नसायच अशा वेळी हत्याराना धार काढीत असताना किंवा आपल्या चादरी आणि उशाचे अभ्रे धूत असताना ज्यो दृष्टीस पडायचा. हिवाळ्यात रात्र झाली की, मी आणि मार्ट वर ज्योच्या खोलीत जात असू कधीहि गेल तरी तो आमच मनःपूर्वक स्वागत करी आम्ही त्याला ज्यो काका म्हणत असू, आणि त्याला ते फार आवडायच आपण एकाकी असल्याची तक्रार त्यानं कधी पुसटपणे सुद्धा केली नाही. त्याच्या त्या एकाकीपणाला दुःखाच अस्तर असेल असं आम्हाला चुकूनसुद्धा कधी वाटल नाही. आमची रात्रीची जेवण झाली की, आम्ही ज्योच्या स्वयपाकखोलीत तळ ठोकून बसत असू. साधारणतः तीच त्याच्या जेवणाची वेळ असे, आणि त्यावेळी तो टेबलावर जेवणाच सामान मांडीत असताना दिसायचा आपल्याशेजारी आमच्यासाठी दोन खुर्च्या ठेवून तो आम्हाला बसवून घ्यायचा. मग आमच्यासाठी दोन बशा ठेवून तो आम्हाला तळलेल मास खायला द्यायचा. तो मास इतक झकास तळीत असे की, काहीं विचारू नका. मी आणि मार्ट त्याच्या या खमग पाककौशल्याची तारीफ करायचे. "ज्यो काका, असा खमग मासाचा तुकडा आम्ही कुठेच कधी खाल्ला नाही." असं मी आणि मार्ट म्हणालो की, ज्योचा चेहरा खुलायचा.

आम्ही वरचेवर आणि वेळी अवेळी ज्योच्या घरी जातो याबद्दल आई कधी कधी आम्हाला दटावायची. "अरे, त्याने एवढ्या श्रमाने तळलेले मासाचे तुकडे सगळेच मटकावून टाकू नका. त्याच्यासाठी थोडे शिल्लक ठेवीत जा."

अस आई म्हणायची. ज्योच जेवण झाल की, तो कठीण कवचाची सुकी फळ आम्हाला खायला द्यायचा. मग आम्ही तिघे ती फळ कुडुम कुडुम खात गप्पा मारीत बसायचे बोलण्याच बरचस काम ज्योच करी. उलट खाण्याच काम आम्ही त्याच्याहून जास्त करायचे.

ज्यो एल्सर युद्धावर गेला होता. त्यावेळी युद्ध अस एकच झाल होत आणि ते म्हणजे गुलामगिरी नष्ट करण्यासाठी उद्भवलेल ज्यो जवळजवळ चार वर्ष युद्धभूमीवर होता. स्वेच्छेने सामील झालेला एक साधा सैनिक म्हणून तो युद्धात गेला आणि तसाच निवृत्त झाला तेव्हाच्या युद्धाच्या रम्य वार्ता ज्यो आम्हाला खुलवून खुलवून सांगायचा लाकडाचा एक ठोकळा घेऊन तो जमिनी वर ठेवायचा मग त्या ठोकळ्याच्या समोर आणखी एक ठोकळा ठेवून म्हणायचा, "शत्रूच सैन्य ह इथ होत आणि आम्ही हे असे इथे. आम्ही त्याच्यावर हे असे चालून गेलो. हे पाहा, चार वर्ष मी युद्धात होतो पण एक जखम कधी आली नाहीं हां, एकदा डासानी प्रताप गाजवला आणि सहा आठवडे मी मलेरियाने बिछान्यावर खिळून पडलो." युद्धाची ही वर्णन सांगत असताना ज्योने आपण रणात मोठी बहादुरी गाजविली अस बढाईने कधी कधी म्हणून सांगितल नाहीं उलट, "साधे सैनिक होतो आम्ही जे पडेल ते काम करीत असू." असच तो नम्रपणे सांगत असायचा. लढाईत अर्थातच खाण्यापिण्याचे हाल होत कधी कधी साध्या वाटाण्यावरच भागवाव लागे. शत्रूच्या ताब्यातली कोंबडी, डुकर एखाद्या हल्ल्यात हाती लागली तर मात्र मेजवानी झडायची डाव्या खांद्यावर पांघरुणात गुंडाळलेला बिछाना—त्यातच मावेल तेवढ सामान, उजव्या खांद्यावर बंदूक आणि कमरेला काडतुसाची संदूक एवढाच जामानिमा असायचा. युनिफॉर्म, बूट मोजे, खाद्यपेय हे सगळ सैन्यातूनच मिळायच. निराळ अस काहीं विकत घ्याव लागत नसे आणि काही लागलच, तर शक्य तेव्हा सैन्याच्या स्टोअरमार्फत व्यवस्था व्हायची

तीन-चार वर्षांनी ज्योने आमच घर सोडल, तेव्हा आम्हाला फारच चुकल्या-चुकल्यासारख झाल जे काही थोडफार मिळायच त्यात ज्यो समाधानी वृत्तीन राहायचा. सुतारकामाची मजुरी दिवसाला दोन डॉलर्स आणि महिन्याचे तीस डॉलर सरकारी पेन्शन येवढीच ज्योची मिळकत होती. आपण कसबी सुतार आहोत याचा ज्योला अभिमान वाटायचा. ज्यो निर्व्यसनी होता, पण संयमावर व्याख्यानबाजी करताना मी त्याला एकदाहि पाहिल नाहीं. ज्यो एकाकी होता,

पण आपल्या एकाकीपणात तो मस्त असायचा. भीतीचा स्पर्श ज्योच्या मनाला कधीच झाला नाही. वर्तमानकाळात तो निर्भय सहजतेन जगायचाच, पण माणसाला सर्वस्वी अज्ञात असलेल्या भविष्यकालाचाहि त्याला कधीच भाऊ वाटला नाहीं.

बेरीन स्ट्रीटवरच घर विकत घेतल्यावर आपला चुलतभाऊ मॅग्नस होम्स याला घर घेण्याचे अनेक फायदे कसे असतात हे बाबानी नक्की पटवून दिल असणार. मॅग्नस होम्सन हॉल्ड्रगी इथ ज्या वेळी जमीन विकत घेतली त्याच वेळीं बाबानी पॉनी कॉटी येथे जमीन खरीदली.

घर आणि जमीन याच्या पायी आलेला खर्च हे बाबाच्या छातीवरच एक ओझच होऊन बसल होत. चागला भाव येतो आहे अस वाटल की, आधी घेतलेली जमीन विकून टाकून ते दुसरी घेत. जमिनीचा वार्षिक कर मनीऑर्डरने पाठवण्याच काम मी करीत असे, मनीऑर्डरबरोबर एक पत्रहि लिहाव लागे. बाबा मला एक पेन्सिल देत असत. त्या पेन्सिलीवर त्याचा फार जीव होता. ही पेन्सिल त्यानी कशाकरता बाळगली होती देव जाणे ! या पेन्सिलीन एकदा लिहिल की ते खोडल जाण शक्य नाहीं अस ते अभिमानानं सागत असत.

एकशेसाठ एकराच्या या जमिनीन आमच्या कुटुबाला कित्येक वर्ष अगदी झपाटून टाकल होत दुसर काहीच कोणाला सुचत नव्हत. कधी कधी लहरीत येऊन बाबा गेल्सबर्ग सोडून शेतीसाठी त्या जमिनीवर जाऊन राहायचा बेत आखायचे 'स्वतत्र' हा शब्द आम्ही प्रथम याच काळात ऐकला शेतकरी कधीच उपाशी मरत नाही. तो श्रम करतो आणि आपल्या पोटापुरत पिकवतो. तो कोणाचा नोकर नसतो. त्याला नोकरीवरून कोणी हाकलून लावू शकत नाहीं. तो अगदी स्वतत्र असतो. बस्स ! याच विचारानी आमच्या घरातल वातावरण कस भारून गेल होत.

आणि अचानक १८९३ साली ती मंदीची लाट आली. तो मोठा खडतर काळ होता. धान्याचा भाव एका बुशेलला दहा सेंट इतका एकदम खाली कोसळला. शेतकरी सर्पण म्हणून जाळण्यासाठी धान्याचा उपयोग करू लागले. कॅन्सास येथील जमिनीचे भाव भराभर खाली उतरले. बाबानी याच वेळी आपली जमीन विकून टाकली. या जमिनीचे त्याना किती पैसे मिळाले हे मला कधीच कळल नाहीं. पण एवढ मात्र खर की, त्या दिवसापासून शेतकरी स्वतत्र

की रेल्वे रस्त्यावर काम करणारा कामगार स्वतंत्र या विषयावरची आमच्या घरातली चर्चा एकदम बंद पडली.

मंदीचा तो तडाखा जबरदस्त होता लोक बँकाकडे आकांतून धावत पण बँकाना टाळी लागलेली असत. बेकारी सर्वत्र पसरली होती. काही लोक वॉशिंग्टन येथे कॉंग्रेसला या परिस्थितीचा जाब विचारण्यासाठी जात होते. ही लाट गेरसबर्गला पोचली रेल्वे कामगारांना दरोज फक्त चार तास काम मिळू लागले. पगार निम्म्याहून कमी झाला.

पावाला डुकराची चरबी आणि मीठ लावून खाण्याला आम्ही याच वेळी शिकलो. डुकराची चरबी मिळाली नाही तर काकवी लावून आम्ही पाव खात असू, पण तो विशेष रुचकर लागत नसे. सुदैवाने यावेळी आमच्या मळ्यात बटाट्याचे भरघोस पीक आले मी आणि मार्ट बटाट्याच्या टोपल्या भरभरून तळघरात आणून ठेवीत असू. तळघराच्या तक्तपोशीवर हातात खडू घेऊन बाबा बटाट्याच्या प्रत्येक बुशेलमागे एक सरळ रेघ काढायचे. अशा चार रेघा काढून झाल्या की, त्यांच्यावर ते एक आडवी रेघ ओढायचे म्हणजे एकूण पाच बुशेल बटाटे जमा झाले असा याचा अर्थ. आमच्या बाबानी केलेले हे एकमेव लेखन !!

आजूबाजूच्या लोकानी एक छोटीशी सहकारी संघटना बनवली. भाड्याने घोडागाडी घेऊन ते बाजारात जायचे आणि जॉन क्रेन्सकडून एक धष्टपुष्ट डुक्कर घेऊन यायचे. "अगदी अल्प किमतीत दिलेला आहे बर हा!" जॉन क्रेन्स हसून म्हणायचा आमच्या घरापुढील दोन चौक सोडून हा डुक्कर मारायचा समारंभ व्हायचा. डुकराला मारताना पाहणे हा आम्हा मुलांच्या दृष्टीने एक रोमहर्षक आणि नाट्यपूर्ण प्रसंग होता. मग या डुकराच्या मांसाच्या विविध पदार्थाची चमचमीत मेजवानी झडायची आमच्या स्वयपाकखोलीत एक शेगडी होती कोळशाचा भुगा घालून आम्ही ही शेगडी पेटवीत असू कोळशापेक्षा हा भुगा स्वस्त पडे या कोळशाचे पिप जिन्याखाली ठेवलेले होते दरवाज्यातून वाकून मी जिन्याखाली जात असे. कधीकधी हातोडा घेऊन कोळशाच्या मोठ्या तुकड्यांचे मी लहान लहान तुकडे करी. कोळशाच्या कणानी माझे हात, नाक, कान काळेकुट्ट होऊन जात. मला याचा अभिमान वाटायचा माझी भाकरी मी मेहनत करून मिळवतो आहे असे मला वाटे. अशा तऱ्हेची जबर मेहनत करणे हे खडतर

नशिबाच लक्षण आहे असच मी समजलो असतो. पण 'यूथ्स् कॅपॅनियन' हे पुस्तक मी वाचलेल होत म्हणून बर. या पुस्तकात कोळशाच्या खाणीत काम करणाऱ्या मुलाच्या जीवनावरच्या गोष्टी असत. या मुलाना सारा दिवस कष्ट करावे लागत. दिवसाच्या अखेरीस ते खाणीतून वर येत तेव्हा त्याच्या तोंडावर कोळशाच्या किटणाचे थरच्या थर बसलेले असत. या मुलाच खडतर जीवन मला माहीत असल्यामुळे माझ्या श्रमाविषयी अवास्तव कल्पना करून घेण मला शक्य झाल नाही. कधी कधी मी खाणकामगार आहे अशी कल्पना करून घ्यायचा. खाणीत उतरताना डोक्याला दिवा बांधून कामगाराना उतराव लागत एवढ मला ठाऊक होत आमच्या घरात एक पत्र्याचा डबा पडलेला होता. तो डबा फोडून मी त्याचा पत्रा मोकळा केला. हा पत्रा डोक्याला बांधून मी कोळशाच्या खाणीत म्हणजे जिन्याखालच्या कोळशाच्या पिपात उतरलो.

थंडीच्या दिवसात सगळ्या खोल्या गारठून जात. स्वयपाकघर तेवढच गरम राहायच. दुसऱ्या मजल्यावर असलेल्या झोपण्याच्या खोलीत स्वयपाकघरातल्या शेगडीची ऊब थोडीशी पोचायची. मी आणि मार्ट तिसऱ्या मजल्यावर छपराच्या खाली असलेल्या माळ्यावर झोपत असू या खोलीत उबेचे नाव नव्हत कडाक्याची थंडी पडली की, आम्ही दोघे स्वयपाकखोलीतल्या शेगडीसमोर उभे राहत असू अग चागल झकास शेकल गेल की, जिन्यावरून दडदड धावत आम्ही आमच्या तिसऱ्या मजल्यावरच्या खोलीत जात असू आणि पाघरूण घेऊन गुडुप झोपत असू. थंडीच्या कडक आजीबाईची अशा वेळी आमच्यापुढे काहीच मात्रा चालत नसे.

आमची स्वयपाकखोली पधरा फूट लाब व बारा फूट रुद होती एक कपाट, फडताळ, गॅसची शेगडी, आठ खुर्च्या, एक जेवणाच टेबल इतक सामान इथ ठेवल होत आमच कुटुब नऊ माणसाच होत. माझा बाप आणि आई कष्टाची सगळी काम करीत असत. पीठ मळण्यापासून तो थेट भट्टीत पाव भाजण्या पर्यंतच काम आई एकहातीच करायची. फाटके कोट आणि चड्ड्या शिवण, पायमोजे रफू करण ही सगळी काम घरातच व्हायची. मंदीच्या काळात बाबा स्वतः कातड कापून आमच्या जोड्याचे तळवे शिवायचे व घरातल्या कात्रीने मुलाचे केस कापण्याच कामहि तेच करायचे. त्याच्या या केस कापण्यात कौशल्याच नावहि नसे--पण न्हाव्याचा खर्च मात्र त्यामुळे वाचायचा वर्तमानपत्राच्या कागदाच्या आम्ही हॅट्स करात असू घरात केरोसीनचेच डबे होते. दिव्यातल

तेल संपलं की तळघरात जाऊन आम्ही दिवा भरून घेत असू. गंधकाच्या काडीनं हा दिवा पेटवीत असू. काडी पेटवली की प्रथम निळी ज्योत दिसायची, निळी ज्योत जाऊन पिवळी ज्योत दिसू लागली की मग आम्ही काडी वातीला लावीत असू.

एकदोनदा आम्ही मांजरंहि पाळलं होतं. पण हे मांजर सारखं आमच्या पायात येऊन अडमडायला लागलं. मांजर पाळण्यापेक्षा गाणारा पक्षी पाळणं बरं असं बाबांनी माझ्या आईला सुचवलं. काही दिवसांनी पक्ष्याचा पिंजरा घरात आला. हा पक्ष्याचा पिंजरा वर टांगलेला होता. आमच्या वाटेत तो कधीच येत नसे. पण मधूनमधून आम्हाला छोटी भावंडं खेळायला मिळत, आणि असल्या प्राण्यांची गरज भासेनाशी होई. एवढ्या छोट्याशा जागेत सर्वांनी गुण्यागोविंदानं राहायचं म्हणजे एकमेकांच्या बाबीत नाक न खुपसण्याचं व्रत पाळावं लागत असे.

स्वयंपाकखोलीत एक लहानसा आरसा पुढं ठेवून बाबा दाढी करायला बसायचे. दाढी करताना त्यांचे गाल आणि मान साबणाच्या फेसानं भरून गेली की, एरवी गंभीर दिसणारे बाबा आम्हा मुलांना तितकेसे गंभीर वाटत नसत. तीन-तीन दिवसांच्या वाढलेल्या दाढीच्या खुंटावर ते वस्तरा खरखर फिरवू लागले की, आम्हाला खूप हसू यायचं. तोंड वेडीवाकडी केल्याशिवाय त्यांना दाढीच करता येत नसे. अशी वेडीवाकडी तोंड करून ते दाढी करू लागले की, कधीकधी त्यांचा चेहरा इतका भयाण दिसायचा की आम्हा मुलांना त्यांच्याकडे पाहायला भीति वाटायची. हनुवटी सोडून सर्व गालावरून वस्तरा फिरत असे. हनुवटीवर ते दाढीचं छोटंसं बेट ठेवीत असत. कधीकधी हातातली कात्री घेऊन ते हनुवटीवरची ही बोकड दाढी रेखीव करण्याचा प्रयत्न करताना दिसायचे. अशा वेळी मी आणि मार्ट एक गमतीदार गाणं म्हणत असू. ' हनुवटीवरचे खुंट तयांच्या दिसती गमतीदार " असं त्या गाण्याचं धृपद होतं. आम्ही हे गाणं म्हटलं तरी बाबा रागावत नसत.

मागल्या दारी विहिरीला एक लाकडी पंप लावलेला होता. मागील दाराच्या जिन्यापासून पंधरावीस पावलांच्या अंतरावर तो पंप होता. उन्हाळ्याच्या दिवसात बादलीत काढून ठेवलेलं पाणी काही वेळ गेल्यानंतर चवीला चांगलं लागत नसे. बाबा म्हणायचे, "शॉली, ताजं पाणी काढून आण जा!" मग स्वयंपाक-खोलीतली बादली घेऊन मी ती पंपाच्या तोटीखाली ठेवीत असे. बादली

पाण्यान भरून जाईपर्यंत मी पपाच लाकडी हॅडल हलवीत उभा राहायचा. काहीं वेळान ताज्या पाण्याने बालदी भरून जायची. पपाने पाणी काढायच हे मेहनतीच काम घरातली इतर माणस कधी कधी करायची, परतु मी सर्वात वडील आणि सशक्त मुलगा असल्यामुळे हे काम सहसा माझ्याच वाट्याला यायच.

उन्हाळा वाढला की, विहिरीतल पाणी आटत असे. पपाच हॅडल अशा वेळी ढिल पडायच आणि कितीहि खटाटोप केला तरी बालदी भरण मुष्कील व्हायच. अशा वेळी मी हौदातल पावसाच साठवणीच पाणी विहिरीत ओती मग मात्र पपाच्या तोटीखाली लावलेली बालदी भरून निघायची. अशा उन्हाळ्यात स्वयपाकघरातल लोणी वितळून जात असे. मग हे वितळलेल लोणी माझी आई एका लहानशा बालदीत भरायची. या बालदीला दोरा बाधून ती आम्ही विहिरीत सोडायचे. पाण्याच्या गारव्यामुळे वितळलेल्या लोण्याचा पुन्हा घट्ट गोळा व्हायचा. मग ती बालदी आम्ही वर ओढून घेत असू

कडाक्याची थडी पडली की, या पपाच हॅडल हलणदेखील कठीण होऊन बसायच. अशा वेळी गरम पाण्याच्या बालद्या भरून आम्ही त्या पपावरून खाली विहिरीत ओतीत असू त्या गरम पाण्यामुळे थोड्या वेळाने गोठून आखडलेला पप मोकळा व्हायचा. मग दोन बालद्या पाणी आम्हाला मिळायच. हे पाणी दुसरे दिवशी सकाळपर्यंत आम्हाला पुरवून वापराव लागत असे. एकदा तीनचार वेळा या पपाच हॅडल मी जोरजोरात दाबल. पण पाण्याच टिपूस-देखील येईना. बाबानी हे पाहिल त्यानी चामड कापून एक नवी बोथी तयार केली. मग माझ्या कमरेला त्यानी दोर बाधला आणि मला विहिरीत सोडल. विहिरीच्या काठाशी उभ राहून ते मला नवी बोथी त्या पपाला कशी बसवायची ते सागत होते, आणि मी त्याप्रमाणे करीत होतो. नवी बोथी बसल्यावर पप पूर्ववत् चालू लागला. तोटीतून पाण्याची धार येताना मी पाहिली तेव्हा मला खूप आनद वाटला.

त्या काळी प्रत्येक घराच्या भोवती कुपण लावलेल असे. घरासमोरच्या कुपणाला फाटक असे. हळूहळू ही कुपण आणि फाटक काढून टाकण्यात येऊ लागली. सर्वात अगोधी घराच्या समोरची कुपण काढण्यात आली, त्यानतर मागील दाराची आणि दोन्ही बाजूची. जनावर आत येऊन त्यानी बागेची नासधूस करू नये म्हणून ही कुपण लावलेली असत. हळूहळू पाळीव जनावराची सख्या कमीकमी

होऊ लागली. स्वाभाविकच कुंपणाची जरूर भासेनाशी झाली. आमच्या घरासमोरचं कुंपण आम्ही तोडलं. आणि त्याच्या लाकडाच्या जळणासाठी उपयोग केला. लाकडाच्या चांगल्या फळ्या होत्या त्या मात्र घरदुरुस्तीसाठी उपयोगी पडतील म्हणून बाजूला काढून ठेवल्या. मागीलदारचं आणि घराच्या दोन्ही बाजूचं कुंपण मात्र आम्ही मोडलं नाहीं. सतरा वर्षं आम्हीं त्या घरात राहिलो, तोपर्यंत ते कुंपण तसंच होतं.

# छोटा रिपब्लिकन

ऑक्टोबर महिन्यातल्या त्या रात्री बाबांचे बोट धरून रोचिस्टरी रस्त्याने मी चाललो होतो. मी त्यावेळी सहा वर्षांचा होतो. राजकारणाच्या वातावरणात माणसांची मन तापलेली मी प्रथम पाहिली ती याच वेळी रस्ता माणसांनी दुतर्फा भरून गेला होता. या रांगा इतक्या दूरवर गेल्या होत्या की, तिथे माझी नजर सुद्धा पोचत नव्हती रस्त्याच्या मधून मिरवणूक निघाली होती. दोघादोघांचे गट करून ही माणसं शिस्तीन रांगेत चालली होती. प्रत्येक माणसाच्या खांद्याला एक काठी होती आणि या काठीला जळती मशाल बांधलेली होती माझ्या आयुष्यात मी कधी पेटती मशाल पाहिलीच नव्हती, आणि आता अकस्मात शेकडो मशालींच्या हारी मला पाहायला मिळाल्या होत्या प्रत्येक माणसाच्या खांद्यावर लाल, पिवळ्या रंगाची मेणकापड होती. मशालींतून ठिबकणारे तेलाचे थेंब या कापडावर पडत ही मिरवणूक कसली म्हणून मी बाबांना विचारलं तेव्हा ते म्हणाले की, ही रिपब्लिकन पक्षाच्या लोकांची मिरवणूक.

उत्तरेच्या दिशेन आम्ही थोडं चाललो खांद्यावर मशाली घेतलेल्या लोकांची रांग इथहि होतीच. हुकूम मिळाला की, मशालीला जोडलेल नळकांड जोरात फुंकून ते जवळच्या मशाली उंच करीत मशाली उंचावल्या गेल्या की, ज्वाळांच्या लालभडक फुलांचे थवेच्या थवे हवेत झुरू लागत. या मशाली मंद झाल्या की, अंधार अधिकच गडद भासू लागे

आम्ही आणखी थोडे पुढे गेलो तेव्हा मिरवणुकीच्या पुढे बॅंडचे एक पथक असलेल आम्ही पाहिल या बॅंडच्या पथकाचं नेतृत्व ज्या माणसाकडे होत त्यानं पिवळी पॅंट आणि लाल रंगाचा कोट अंगात घातला होता. त्याच्या डोक्यावर एक लाल रंगाची टोपी होती. या टोपीची उंची जवळ जवळ माझ्याएवढी होती. त्याच्या हातात एक काठी होती त्या काठीच्या टोकाला एक सोनेरी गोळा लावलेला होता. हातातल्या या काठीने मिरवणुकीने कुठं वळावं हे तो दाखवीत होता. तुताऱ्या फुंकीत आणि ढोल बडवीत ही मिरवणूक मेन स्ट्रीटच्या दिशेन निघाली.

मेन स्ट्रीटवरून ही मिरवणूक जाऊ लागली. मिरवणुकीतला प्रत्येक मनुष्य रिपब्लिकन पक्षाचा होता. या मिरवणुकीतून चालून आपण रिपब्लिकन पक्षाचे आहोत हे तो रस्त्यावर जमलेल्या डेमोक्रॅट पक्षाच्या लोकाना जणु बजावून सागत होता. हे मला माझ्या बाबानीच सागितले मिरवणुकीतले लोक अधूनमधून 'ब्लेनचा विजय असो' किंवा 'ब्लेन प्रेसिडेंट झालाच पाहिजे' अशा घोषणा करीत. कधी कधी ते 'ब्लेन, ब्लेन, जेम्स ब्लेन' असे म्हणत त्या तालावर पावले टाकीत.

इतक्यात रस्त्यावरचा एक माणूस ओरडला, "क्लीव्हलँडचा विजय असो" त्याच्या या घोषणेला मिरवणुकीतल्या लोकानी प्रत्युत्तर दिले, "क्लीव्हलंडला फाशी द्या!" हा काय प्रकार आहे असे मी बाबाना विचारले तेव्हा ते म्हणाले, "क्लीव्हलंड हा डेमोक्रॅट पक्षाचा आहे तो ब्लेनच्या विरुद्ध आहे." घरी परतताना वाटेत मी बाबाना अनेक प्रश्न विचारले माझ्या प्रश्नाना त्यानी जी उत्तर दिली त्याचा सारांश असा की, रिपब्लिकन पक्षाचे लोक ही सज्जन माणसं आहेत. आणि डेमोक्रॅट पक्षाचे लोक एक तर दुर्जन तरी आहेत किंवा वाट तरी चुकलेले आहेत किंवा मठ्ठ तरी आहेत. हे सारं ऐकून माझ्या मनात अशी भावना निर्माण झाली की, क्लीव्हलँड हा एक घाणेरडा मनुष्य असला पाहिजे, आणि रिपब्लिकनानी जरी त्याला फासावर चढवला तरी मला यत्किंचित्‌हि वाईट वाटणार नाहीं. फाशी देतात म्हणजे काय करतात हे मला मुळीच माहीत नव्हते पण रिपब्लिकनाना क्लीव्हलँडला जर फाशीच द्यायचं असेल तर माझा मात्र फाशीला पाठिंबा होता मी एक रिपब्लिकन होतो—सहा वर्षे वयाचा छोटा रिपब्लिकन!

काही महिन्यानतर निवडणुका सुरू झाल्या. आणि गमत अशी की, ग्रोव्हर क्लीव्हलँड फासावर लटकण्याऐवजी अध्यक्ष म्हणून निवडून आला या ग्रोव्हर क्लीव्हलँडने आमच्या गेटसबर्ग गावासाठी एक नवीन पोस्टमास्तर नेमला. या पोस्टमास्तरचे नाव होते वुइल्यम ट्रूहिग आम्ही त्याला विली ट्रूहिग म्हणत असू तो आमच्या घरापासून दोन चौक सोडून रहायचा. त्याचं घर साधंच होतं. त्याच्या घराच्या मागील दारच्या अंगणात एक मोठा थोरला वाळूचा ढिगारा होता. आमच्या घरी काही बांधकाम व्हायचं असलं की विटाबरोबरच आम्हाला वाळूची गरज लागे. मग बाबा माझ्याजवळ हातगाडी आणि दहा सेंट देऊन मला ट्रूहिगच्या घरी वाळू आणण्यासाठी पाठवीत असत. ट्रूहिगची आणि माझी या निमित्तान ओळख झाली. या ओळखीत मला असं आढळून आलें की ट्रूहिग

हा जरी डेमोक्रॅट पक्षाचा असला, दुष्ट क्लीव्हलॅडने जरी त्याची नेमणूक केलेली असली तरीदेखील तो माणूस मोठा झकास होता! बाबाना सुद्धा तो आवडत असे. डेमोक्रॅट आणि रिपब्लिकन पक्ष याच्याविषयी माझ्या मनात इतका गोंधळ उडालेला होता की मी बाबाना त्याविषयी प्रश्न विचारायचं एकदम थांबविलं.

मी साडेसात वर्षाचा झालो तेव्हा जनरल युलीसिस ग्रँट वारला. मला आठवत की, मी बाबाच्याबरोबर ग्रँटच्या निधनाबद्दलच्या शोकप्रदर्शक मिरवणुकीला गेलो होतो. आमच्या गॅलसबर्गपासून खूप लांब कुठेतरी तो वारला होता. पण त्या दिवशी गॅलसबर्ग गावातली सगळी दुकानं बंद ठेवलेली होती. सेमिनरी स्ट्रीटवरून पब्लिक स्क्वेअरपर्यंत भली मोठी मिरवणूक निघाली. लोक म्हणत होते की, गॅलसबर्गमध्ये एवढी मोठी मिरवणूक आपण कधी पाहिलीच नव्हती.

अठराशे पंचाऐंशीमधल्या जुलै महिन्यातील ती एक दुपार होती. वातावरण एखाद्या भट्टीसारखं तापलं होतं आणि तरीहि सारे चौक आणि दुतर्फा रस्ते माणसानी नुसते फुलून गेले होते. बाबानी धक्काबुक्की करून गर्दीतून वाट काढायला सुरुवात केली. तसं करून पुढे गेल्याखेरीज आम्हाला काहींच दिसणं शक्य नव्हतं. मीहि त्यांचा हात धरून त्यांच्यामागून फरफटत जात होतो. माझं नशीब की त्या दिवशी बूट आणि पायमोजे मी घातले होते! नाहींतर माझ्या पायांचं नक्कीच चिरडं झालं असतं. धक्काबुक्की करून आम्ही मिरवणुकीच्या जवळ आलो. मी माणसांच्या तगड्यातून मिरवणूक दिसेल किंवा काय हे पाहू लागलो. पण मला मिरवणुकीतल्या लोकांचे नुसते पायच दिसले. शेवटी मी संतापलो. बाबाचा हात जोराने हिसकून मी ओरडलो, "मला काहींच दिसत नाही!"

बाबानी मला वर उचलून घेतलं आणि आपल्या मानेच्या भोंवती माझे पाय टाकून एखाद्या घोड्यावर बसवावं तसं त्यानी मला आपल्या खांद्यावर बसविलं. ओ हो! आता काय पण झकास दिसत होती मिरवणूक मला! एखादा उंच राक्षस जर इथं हजर असता तरच त्याला ती मिरवणूक माझ्याइतकी चांगली दिसली असती. मिरवणुकीच्या पुढे मुख्य सेनापति घोड्यावर बसून चालला होता. त्याच्यामागं पोलिसांच्या दोन रांगा होत्या. त्यांच्या निळ्या कोटांच्या खांद्यावर निकेलचा मुलामा दिलेले तारे चमकत होते. प्रत्येकाच्या कमरेला एकएक छोटासा दंडुका बांधलेला होता. मोठमोठ्याने ढोल वाजत होते. त्या ढोलांचा आवाज इतका प्रचंड होता की आजूबाजूची घरं त्या आवाजाच्या दणक्याने थरथरू लागल्याचा भास होई. त्या आवाजाला मी इतका घाबरलो की

मला वाटलं मी आता बहुतेक खालीच पडणार. मी बाबाची हॅट घट्ट धरून ठेवली!

नंतर होतं गेटिसबर्ग मरीन बँडचं पथक. पथकातले लोक तुताऱ्या वाजवीत होते. एका माणसाजवळ एक भलीमोठी तुतारी होती. त्या तुतारीचं त्याच्या शरीरामोवती जणु वेटोळंच पडलं होतं. तो मनुष्य या वेटोळ्यात कसा शिरला याचंच मला कोडं पडलं. बँड पथकातल्या सर्व लोकांनी निळे कोट आणि निळ्या विजारी घातल्या होत्या. करुण आणि मंद लयीतलं संगीत ते वाजवीत होते. युद्ध संपून वीस वर्षं उलटली होती. जनरल ग्रँटने या युद्धात सर्वांत मोठी मर्दुमकी गाजविली होती. जनरल ग्रँट इहलोक सोडून गेला होता. आणि त्याच्या मृत्यूमुळे झालेलं दुःख व्यक्त करण्यासाठी भिन्नभिन्न थरांतली माणसं इथं जमली होती.

बँड पथकाच्या मागं सैनिकांचं पथक होतं. मला असं कळलं की या सैन्य-पथकातील काही सैनिकांनी जनरल ग्रँटबरोबरच युद्धात भाग घेतला होता. जनरल ग्रँट घोड्यावर कसा बसायचा, त्याला एवढ्या मोठ्या पदावर न्यायला कोणते गुण कारणीभूत झाले याविषयीची सारी माहिती हे सैनिक सांगू शकले असते. एक लांब काळी शवपेटिका काळ्या रंगाचे आठ घोडे ओढीत होते. या प्रतीकात्मक शवपेटिकेत जनरल ग्रँटचा देह नव्हता, तरीहि यावेळी सारे लोक विशेष गंभीर होते. शवपेटिकेच्या मागं दोन तोफा जात होत्या. सहा घोडे या तोफा ओढून नेत होते. या तोफांच्या मागून निग्रो लोकांचं बँडचं पथक चाललं होतं. सगळ्या मिरवणुकीत गौरेतर अशी ही एवढीच माणसं होती. त्यांना पाहताच सर्व लोकांचे चेहरे क्षणभर उजळल्यासारखे दिसले. बाबांनी मला सांगितलं की, ज्या युद्धात जनरल ग्रँटने सेनापति म्हणून काम केलं ते युद्ध या नीग्रो लोकांची गुलामगिरीच्या फासातून सुटका व्हावी म्हणूनच लढलं गेलं होतं. मला मोठं आश्चर्य वाटलं. माणसांना गुलाम कसं करतात, गाई घोडे ही जनावरं विकावीत तसं त्यांना विकू कसं शकतात हेच मला कळेना. गुलामांच्या खरेदीविक्रीची ही प्रथा गेटिसबर्गमध्ये काही मी पाहिली नव्हती. कसंहि असो, ही प्रथा भयानक होती यात शंका नाही. गुलामगिरीविषयी बोलताना माणसांचे चेहरे गंभीर होत. या गुलामगिरीच्या प्रथेविरुद्ध जनरल ग्रँट प्राणपणानं लढला होता. आणि म्हणूनच, त्याच्या प्रेतयात्रेच्या वेळी नीग्रो लोकांच्या बँडचं पथक असण्यात मोठंच औचित्य होतं.

मिरवणुकीतल्या एका माणसान एक भला मोठा झेंडा घेतला होता. या झेंड्याची काठी त्याने आपल्या कमरेच्या पट्ट्यात खोवली होती. तो झेंडा तसा घेऊन चालण मोठ कष्टाच असल पाहिजे; कारण त्या माणसाच्या गालावरून कपाळावरून सारखा घाम ओघळत होता.

मी अनेक मिरवणुका पाहिल्या होत्या, पण ही मिरवणूक काहीं निराळीच होती. सर्कशीतल्या लोकानी एकदा अशीच एक मिरवणूक काढली होती. त्याना पाहण्यासाठी खूप गर्दी जमली होती रस्त्यावर जमलेली ही बधी माणस सर्कशीतल्या लोकाकडे आणि जनावराकडे पहात मोटमोठ्यान हसत होती, आरडा-ओरड करीत होती. रिपब्लिकन पक्षाच्या मशालधारी लोकाची मिरवणूकहि मीं पाहिली डेमोक्रॅट पक्षाचे लोक त्यावेळी रस्त्यावर दुतर्फा उभे होते. दोन्हीहि पक्षाचे लोक आपल्या पक्षाची स्तुति करणाऱ्या आणि दुसऱ्या पक्षाची रेवडी उडविणाऱ्या घोषणा मोटमोठ्याने करीत होते. पण या मिरवणुकीत मात्र तस काहीहि नव्हत. इथ जमलेल्या माणसाची वृत्ति आज काही निराळीच दिसत होती. सगळे शात होते, गभीर होते. या प्रौढ माणसासारखेच मुलाबाळानीहि आपले चेहरे गभीर केले होते. माझ्याप्रमाणेच या मुलानाहि या प्रसगाच गाभीर्य जाणवलेल होत. गाड्याचीं चाक, घोड्याच्या टापा, पावलाचे आवाज आणि ढोलाचा आवाज याखेरीज दुसर काहीहि ऐकू येत नव्हत. सगीत होत पण तेहि खिन्न, करुण! या सगळ्या गर्दीत मी एकच स्मित पाहिल. बाबानी मला आपल्या खाद्यावर बसवल होतं. मध्येच त्यानी मला विचारल, "दिसतय ना नीट?" मी म्हणालो, "छान दिसतंय की!" बाबाच्या ओठात स्मित उमटल. त्या सगळ्या गभीर वातावरणात मी पाहिलेल ते एकुलतं स्मित!

युद्ध म्हणजे काय? जनरल ग्रॅटन नेमक अस या युद्धात काय केल की ज्यामुळे एवढ मानाच स्थान त्याला प्राप्त झाल? तो पुढे अमेरिकेचा राष्ट्राध्यक्ष झाला होता. रिपब्लिकन पक्षाचा एक आधारस्तभ म्हणूनहि तो ओळखला जात होता. त्याच्या चारित्र्याचा प्रभाव एवढा मोठा होता की त्याच्या मृत्यूनतर डेमोक्रॅट पक्षाचे लोकसुद्धा हळहळले. हा सारा गौरव, हे गुणवैभव जनरल ग्रॅटने कस काय प्राप्त केल? मला आठवत, मी त्यावेळीं या प्रश्नाचा खूपखूप विचार केला होता!

मिरवणूक सापली तेव्हा बाबानी मला खाद्यावरून खाली उतरवल. मेनस्ट्रीट-वरच्या त्या हजारो लोकाच्या गर्दीबरोबरच आम्ही घरी परतलो. त्या दिवशी बाबा विशेष गभीर झाले होते. रस्त्यावरच्या काहीं दुकानाच्या खिडक्यात जनरल

ग्रॅटचे फोटो लावलेले होते. दाढी आणि कल्ले असलेल्या इतर माणसापेक्षा काही सेनापति ग्रॅट वेगळा दिसत नव्हता. लोंबार्ड कॉलेजातले प्रोफेसर ग्रब आमच्या जवळच राहायचे. सकाळीं वर्गात शिकवायला जाण्यापूर्वी ते गाईच दूध काढीत असताना मी त्याना अनेक वेळा पाहिल होत. त्याचा चेहरा हुबेहुब जनरल ग्रॅटच्या चेहऱ्यासारखा दिसायचा. माझ्या मनात विचार आला, जनरल ग्रॅटसारखे दिसणारे हे प्रोफेसरसुद्धा उद्या मेले तर काहीं त्याच्यासाठी अशी मिरवणूक निघायची नाही.

रात्रीं मी झोपायला गेलो तेव्हा अनेक प्रश्नानी मला भडावून सोडल होत. गुलामगिरीची प्रथा नष्ट करण्यासाठी केलेल युद्ध, जनरल ग्रॅटच कार्य, सगळ्या राष्ट्राचा कारभार हाकणारा लोकनियुक्त अध्यक्ष असे कितीतरी विषय माझ्या कोवळ्या बुद्धीला आव्हान देत होते. या प्रश्नाच उत्तर आज ना उद्या मिळवायच असा सकल्प करून मी झोपी गेलो.

# ज्ञानाची भूक

बेरीन स्ट्रीटवरच्या घरात आम्ही राहत होतो. तेव्हाची एक आठवण मला नेहमी येते. माझं वय तेव्हा चार वर्षाचं होतं. आमच्या घरात स्वीडिश भाषेत लिहिलेलं एक लहानसं बायबल होतं. कडाक्याची थंडी पडलेली होती. वारा जोराचा सुटला होता घरात केरोसीनच्या दिव्यासमोर बसून बाबा बायबलमधलं एक प्रकरण वाचीत होते. मी आणि मेरी ऐकत बसलो होतो त्यानंतर अनेक वेळा टेबलावर ठेवलेलं ते पुस्तक उघडून मी चाळीत असे. बाबा वाचीत असताना माझ्या कानावरून गेलेले काही शब्द माझ्या लक्षात असत. मग मी माझ्या आईला बोलावून बायबलमधले ते शब्द मला शोधून द्यायला सांगत असे. वाचता येत नसल्यामुळे मला स्वतःला ते शब्द शोधून काढता येत नसत याची मला खंत वाटे. पण मग आई मला दिलासा देई. ती म्हणे, "आता लवकरच, तू शाळेत जाशील तेव्हा येईल बरं तुला सगळं वाचता!"

शेवटी एका सुमुहूर्तावर आमची स्वारी शाळेत गेली. ही शाळा आमच्या घरापासून चार चौकावर होती. मी शाळेत गेलो तेव्हा लिपीचं रहस्य मला समजलं. वर्गात नवे शब्द शिकलो तेव्हा प्रथमच कळलं की, प्रत्येक शब्द जसा बरोबर उच्चारता येतो तसाच तो चुकीचाहि उच्चारता येतो. शब्दाचा उच्चार निश्चित असतो, तो नीट समजून घेतला पाहिजे, आणि तसा उच्चारला पाहिजे. भाषा अनेक शब्दांची बनलेली असते. हे शब्द तुम्हाला कळले म्हणजे भाषा तुम्हाला कळली.

एक दिवस ॲबट या लेखकाचं 'नेपोलियन बोनापार्टचा इतिहास' हे पुस्तक माझ्या हाती पडलं. मी पाचव्या इयत्तेत होतो. शनिवार, रविवार मी दुसरं काहींच केलं नाही. तिसऱ्या मजल्यावरच्या खिडकीत बसून मी झपाटल्यागत ते पुस्तक वाचीत होतो. पहिला खंड मी वाचून संपविला. नेपोलियनविषयी मी खूप ऐकलं होतं आणि म्हणूनच त्याचं जीवन जाणून घेण्याची मला जबरदस्त उत्सुकता वाटत होती. पुस्तक वाचता वाचता माझ्या मनश्चक्षूसमोर मी नेपोलियनचं चित्र उभं

केल होत नेपोलियन कसा दिसत असेल, कसा लढत असेल हे सार मी माझ्या डोळ्यापुढं रंगवल होत. एक दिवस मी माझ्या कमरेला पट्टा बांधला. हातात लाकडी तलवार घेतली आणि नेपोलियनप्रमाणे सैन्याला हुकूम देत तिसऱ्या मजल्यावरून तळमजल्यापर्यंत जिन्यावरून धडधड धावत सुटलो.

मी सहावीच्या वर्गात गेलो तेव्हा मिस् गोल्डक्रिस्ट बाई आम्हाला शिकवू लागल्या. एक दिवस त्या आम्हाला वर्गात म्हणाल्या, "मुलानो, वाचनाची सवय आपण लावून घेतली पाहिजे. चांगल्या पुस्तकासारखे मित्र या जगात कुठंहि आढळणार नाहींत. तुम्हीं खूप खूप वाचल पाहिजे" शिक्षण हा शब्द मी प्रथम गोल्डक्रिस्ट बाईच्याच तोंडून ऐकला. बाई म्हणायच्या, "ज्ञान अफाट आहे. कितीहि शिकत राहिल तरी ते संपतच नाही." या वेळी मी अगदी अधाशा-सारखा वाचत होतो. इतिहास, चरित्र, प्रवासवर्णन, गोष्टी . काहीं काहीं म्हणून मी वाचायच ठेवल नाहीं. मला आठवत, चॅम्प्लिनन तयार केलेला तरुणाचा ज्ञानकोश मला फारच आवडला होता. व्यक्ति, स्थळ आणि सर्वसामान्य ज्ञान यांच्याविषयींच्या माहितीच प्रचंड भांडार या ज्ञानकोशात भरलेल होत.

चार्ल्स कॉफिन यानी लिहिलेले अमेरिकन इतिहासाचे खंड मला फारच आवडले. "धी बॉइज ऑफ सेव्हन्टीसिक्स" हे पुस्तक वाचताना माझी कल्पना स्वैर धावू लागली. अमेरिकन स्वातंत्र्ययुद्धातली ती सारी दृश्ये डोळ्यासमोर उभी राहिली . हा जॉर्ज वॉशिंग्टन. उमद्या घोड्यावर तो बसलेला आहे. त्याच्या घोड्याची फेक सहज आणि खंबीर आहे. त्याच्यामागून खांद्यावर बंदुका घेऊन हे फाटक्या कपड्यातले शिपाई चाललेले आहेत हा पॉल रिव्हियर घोड्यावरून दौडत प्रत्येक शेतकऱ्याच्या घरासमोर थांबून ब्रिटिश सैन्य येत असल्याची वर्दी देत आहे हा कुरळ्या केसाचा इस्रायल पुट्नॅम. त्याच्या शौर्याला तुला नाहीं. वेढा घालणाऱ्या फ्रेंच सैन्याला त्याने दे माय धरणी ठाय करून सोडल हा जनरल ग्रीन. गनिमी काव्याबद्दल हा प्रसिद्ध. आपण माघार घेतो आहो असे तो शत्रूला दाखवायचा आणि अचानक त्याच्यावर तुटून पडून त्याना नामोहरम करायचा. या साऱ्या वीराच्या कहाण्या वाचत असता शौर्याच्या भावनेने माझ मन भरून येई. ब्रिटिशाच्या बाजूने युद्धाची सूत्रे हलवणाऱ्या मुख्य प्रधान लॉर्ड नॉर्थच वर्णन मी वाचल. त्याच चित्रहि पुस्तकात दिलेल होत. ते पाहत असताना माझ्या मनात विचार आला कीं, मीहि याला सहज लोळवू शकेन. इतिहासातल्या वीरकथाच हे पुस्तक सचित्र

होत. ती चित्र कुणी काढली होती हे मला कळल नाहीं. पण एवढ मात्र खर की, लेखकाइतकच्च कौशल्य त्या चित्रकाराने दाखविल होत.

अमेरिकन वसाहतवाल्याच प्रारभीच्च जीवन चितारणार 'ओल्ड टाइम्स इन द कॉलनीज्' आणि ज्या युरोपातून निर्वासिताचा लोंढा अमेरिकेत आला त्या युरोपातील जुलुमशाही व धार्मिक युद्धे याच्च वर्णन करणार 'स्वातत्र्याची कथा' या कॉफिनच्या पुस्तकानतर मी त्याच्च यादवी युद्धावरील "घी बॉइज ऑफ सिक्स्टीवन" आणि इतर दोनतीन पुस्तक वाचली. खर म्हणजे या युद्धाच्या वेळी कॉफिन स्वतः वार्ताहर म्हणून हजर होता. हे युद्ध प्रत्यक्ष पाहून त्याने हे पुस्तक लिहिल होत. "धी बॉइज ऑफ सेव्हन्टीसिक्स" हे पुस्तक चक्षुर्वैसत्य नव्हत. पण अस असूनहि तेच्च अधिक रगतदार होत. एकसष्ट सालच्च युद्ध शहात्तर सालच्या युद्धापेक्षा अधिक मोठ होत, ते कॉफिनने प्रत्यक्ष पाहिलेल होत. अस असूनहि त्यावरच्च पुस्तक मात्र इतक फिकट कस झाल? कदाचित् असे असेल की, या युद्धाच्या गडबडीत अवलोकनार्थ त्याला मिळावा तितका वेळ मिळाला नसेल. असहि अस् शकेल की, सैनिकाच्या मागून त्याच्या हालचाली न्याहाळण्या-करता वणवण धावताना कॉफिन इतका वैतागला असेल की, प्रत्यक्ष पुस्तक लिहिताना उत्साहाचा लवलेशहि त्याच्यात उरला नसेल. कसहि असो, पुस्तक रगाव तितक रगल नाही हे खर.

याच्च वेळी आम्ही रहस्यकथाहि वाचू लागलो होतो. वर्गात गभीर चेहरे करून हातात भूगोलाच्च पुस्तक घेऊन आम्ही बसत असू. पण या भूगोलाच्या पुस्तकात मात्र एखादी सनसनाटी रहस्यकथा दडलेली असे. काहीं काळा-नतर या रहस्यकथेतल्या सगळ्या युक्त्या माझ्या ध्यानात आल्या, आणि स्वाभाविकच्च माझ मन त्यात रमेना. इतिहास किवा ज्ञानकोश वाचताना जो आनद मला मिळायचा तो आनद देण्यास या रहस्यकथा असमर्थ ठरल्या. याच्च-वेळी मार्क ट्वेनची हकलबेरिफिन आणि टॉम सॉयर हीं पुस्तक मीं वाचायला घेतली. पण या पुस्तकानी माझ्या मनाची घ्यावी तशी पकड घेतली नाहीं. चार्ल्स डिकन्सच्या कादबऱ्या वाचतानाहि माझ असच्च झाल. तीं पुस्तक वाचण्याच्च माझ ते वय नव्हत हेच्च खर.

आमच्या शाळेत शरीरशास्त्रावर दोन-तीन पुस्तक होतीं. या पुस्तकात मद्यपानाच्या दुष्परिणामाची वर्णन करणारी प्रकरण होतीं. दारू पिणाऱ्या माणसाच्या पोटाची काय भयानक अवस्था होते हे मीं या पुस्तकात वाचल. परतु मला

मिण्याच काहींच कारण नव्हत. कारण बाबा दारू पीत नसत. दारूच्या गुत्यात ते कधीच जात नसत. कडाक्याची थडी पडली की ते घरात एक दारूची बाटली आणून ठेवीत आणि औषध घ्याव तस कॉफीच्या कपात दोन चमचे घालून ते ती घेत. थडीचा मोसम सपेपर्यंत ही बाटली त्याना पुरत असे. पुढच्या वर्षा पुन्हा थडी पडेपर्यंत आमच्या घरात दारूच्या बाटलीचा प्रवेशहि होत नसे. क्रेन्स आणि होम्स हीं कुटुबहि मद्यपान करीत नसत. दारूत पैसा उधळण्यापेक्षा काहीं उपयोगी वस्तु विकत घेण्यात पैसा खर्च करण चागल असच त्याच मत होत.

दर वर्षी दारूच्या दुष्परिणामावर वक्तृत्वाच्या स्पर्धा होत. मिशन शाळेत या स्पर्धा होत असत. मिशनच्या रविवारच्या शाळेत आम्ही खूप मजा करीत असू. गेल्सबर्गपासून १६ मैलावर असलेल्या मन्मॉथ या गावी एका परिषदेत आम्हीं मिशनतर्फे एक कार्यक्रम सादर केला होता. मी त्यात एक गाण म्हटल आणि एका छोट्या नाटिकेत भटक्याच काम केल होत. आजबाजूची शभर-दीडशे मुल या मद्यनिषेधाच्या स्पर्धेत भाग घेत. स्पर्धा चालू असत तेव्हा शाळेतल वातावरण गजबजून गेलेल असे. स्पर्धेत जो पहिला येईल त्याला ‘डिमोरेस्ट रौप्यपदक’ मिळत असे. डिमोरेस्ट हा एक श्रीमत मनुष्य होता. तो एक स्त्रियाच मासिक चालवीत असे. हे मासिक खूप लोकप्रिय होत. त्यात त्याने पुष्कळ पैसा मिळविला. डिमोरेस्ट निर्व्यसनी होता. मद्याच्या थेबालाहि त्याने कधी स्पर्श केलेला नव्हता. अमेरिकेतले सर्व दारूचे गुत्ते बद व्हावेत अशी त्याची इच्छा होती. दारूच्या दुष्परिणामावर तोच वक्तृत्वस्पर्धा घडवून आणीत असे. त्यानेच आपल्या नावाच चादीच पदक ठेवल होत. वक्तृत्वस्पर्धेत जे विद्यार्थी भाग घेत त्याच्याकडे तो या विषयावरच एकेक पुस्तक पाठवीत असे या पुस्तकातले हवेत ते उतारे निवडून विद्यार्थ्यांनी पाठ करायचे आणि ही पाठ केलेली भाषण वक्तृत्वस्पर्धेत म्हणून दाखवायचीं. मी या पुस्तकातला एक छोटासा उतारा निवडला होता. या उताऱ्याच्या शेवटी ‘जग झपाट्यान बदलत आहे’ अस एक वाक्य होत. मला हे वाक्य फार आवडल आणि वक्तृत्वाच्या दृष्टीन मोठ महत्त्वाचहि वाटल. माझ्या मनाशीच हे वाक्य कस म्हणायच याच्या मी अनेक तालमी केल्या. हे वाक्य हळू, सावकाश म्हणायच की अंधारात बदुकीची गोळी थाडकन् उडवावी तस झपाटल्या वेगान म्हणायच याचा मीं खूप विचार केला. निश्चित अस काहीं ठरवू शकलो नाहीं.

या स्पर्धेच्या कल्पनेन आम्हा मुलाची मन भारून गेलेली असत. ज्याना पहिल

बक्षीस म्हणून पूर्वी चांदीची पदकं मिळालेली असत त्यांची एक निराळी स्पर्धा होई, आणि त्याच्यात जो पहिला नंबर मिळवील त्याला सोन्याचं पदक मिळे. त्यानंतर ज्यांना सोन्याची पदकं मिळालेली असत त्यांची एक खास स्पर्धा होई आणि पहिला येणाऱ्याला हिऱ्याचं पदक मिळे. हे हिऱ्याचं पदक मिळवणं बहुमानाचं समजलं जाई.

स्पर्धेची तारीख आली. स्पर्धा रात्री व्हायच्या होत्या. मिशन शाळेच्या आवारात श्रोत्यांची खूप गर्दी जमली. स्पर्धेत भाग घेणारी आम्हीं मुलं एका मोठ्या व्यासपीठावर ओळीनं बसलो होतो. आमच्यासमोर बसलेला प्रचंड श्रोतृसमुदाय आमच्याकडे पाहत होता आणि आम्ही त्याच्याकडे पाहत होतो. दोघेहि एकमेकांतले ओळखीचे चेहरे हेरीत होते. श्रोत्यांतले लोक व्यासपीठावर एखादा ओळखीचा चेहरा दिसला की स्मित करीत. परंतु आम्ही मात्र श्रोत्यांत ओळखीचा चेहरा दिसला तरीहि गंभीर चेहरे करून बसत असू. स्पर्धेत भाग घेणारे आम्ही विद्यार्थी होतो! व्यासपीठावर बसून श्रोत्यांकडे पाहून स्मित करणं हे स्पर्धकांना शोभणार नाहीं असं आमचं मत होतं.

एकेक मुलगा आणि मुलगी क्रमाक्रमानं उठून आपापली भाषणं करून जाऊं लागली. बऱ्याच वेळानं माझं नाव आलं. मी व्यासपीठाच्या मध्यभागी जाऊन उभा राहिलो. इतर विद्यार्थी जेवढं बोलले तेवढं तरी आपण न विसरता, न अडखळता बोललं पाहिजे असं मी माझ्या मनाला बजावून ठेवलं होतं. माझ्या भाषणातलं पहिलं वाक्य मी ठणकावून उच्चारलं, आणि त्या वाक्याचा श्रोत्यांवर कसा काय परिणाम झाला हे पाहूं लागलो. माझं भाषण अर्ध्यावर आलं आणि माझ्या वक्तृत्वाची गाडी अचानक थांबली. पुढचं वाक्य काय तेंच मला काहीं केल्या आठवेना. माझ्या मनानं खूप धडपड केली. शेवटीं एकदा माझ्या नशिबानं विस्मृतींत गडप होऊं पाहणारं तें वाक्य माझ्या हातीं लागलं. त्या वाक्यापासून मी सणाणत पुढं गेलो आणि शेवटच्या वाक्यापर्यंत येऊन ठेपलो. 'हे जग झपाट्यानं बदलत आहे' हेंच तें शेवटचं वाक्य होतं. बंदुकीची गोळी ठोऽऽदिशी उडवावी तसंच मी तें वाक्य झाडलं. श्रोत्यांत एकदम हशा पिकला.

स्पर्धेच्या निकालासाठी आम्हांला फार काळ थांबावं लागलं नाहीं. काहीं वेळ आपापसांत चर्चा करून परीक्षकांनी निकाल निश्चित केला. माझं भाषण चांगलं झालेलं नाहीं याविषयीं मला खात्री होती. त्यामुळे कुणाला बक्षीस मिळतं याविषयी फारशी उत्सुकता काहीं माझ्या मनात नव्हती. परंतु पहिल्या बक्षिसाचं

नाव जेव्हा परीक्षकानी जाहीर केल तेव्हा माझ मन अभिमानाने थरारून गेल. परीक्षक उठून म्हणाले होते, "पहिल्या बक्षिसाच चादीच पदक मेरी सॅडबर्ग या विद्यार्थिनीला देण्यात आम्हाला आनद होत आहे."

दरवर्षी हॉस्टेटरची सचित्र अमेरिकन दैनदिनी आमच्या घरी आम्हा मुलाना मिळत असे. अर्धी दैनदिनी हॉस्टेटरने बनवलेल्या औषधाच्या शिफारशीने भरलेली असे. शिवाय सर्व तऱ्हेच्या माहितीची खिचडी असे. पोटात दुखू लागल तर कोणती औषध घ्यावी, फोड आले किंवा खरचटल तर काय कराव, बोट सुजल तर त्यातून आगठी बाहेर कशी काढावी, गजलेला खिळा पायात गेला तर कोणते औषधोपचार करावे इथपासून तो थेट सकाळसंध्याकाळ उगवणारे तारे, भरती-ओहोटी, ग्रहणे, पृथ्वीची गती, विनोदी चुटके आणि सुभाषित इथपर्यंत सारा मालमसाला या वार्षिक डायरीत असे. आम्ही भावड स्वयपाकखोलीत बसून ही डायरी मोठ्यान वाचीत असू. त्यातले विनोदी चुटके वाचून मोठमोठ्याने हसत असू. त्यातल्या सुभाषिताच्या अर्थावर चर्चा करीत असू. ही डायरी वाचीत असताना, हसत खेळत या चर्चा करीत असताना आम्हाला शिक्षण मिळत आहे याची आम्हालाच जाणीवच नव्हती. नव्या नव्या गोष्टी आम्हाला शिकायच्या होत्या. आम्ही आपले वाचीत होतो—हाताला मिळेल ते वाचीत होतो.

चरित्र वाचण मला फार आवडायच. माझ्या मालकीच अस चरित्राच पहिल पुस्तक मी एकदा फिरायला जात असताना मला फुटपाथवर आढळल. त्याचे कोपरे कुरतडलेले होते पावसात भिजल्यामुळे त्याच्यावर धुळीचे थर जमले होते. मी त्याच्यावरची धूळ झटकून टाकली. माझ्या कोटाच्या खिशात राहील एवढंच ते पुस्तक होत. घरी येऊन मी फुटपट्टीने ते पुस्तक मापून पाहिल. ते पुस्तक पावणेतीन इच लाब आणि दीड इच रुद होत मुखपृष्ठावर गणवेश घातलेल सैन्याधिकाऱ्याच चित्र होत. पुस्तकाच नाव होत 'पी टी. ब्यूरगार्ड याचा छोटासा इतिहास'. पुस्तकाला सुबक छपाईची एकूण तेरा पान होती. शेवटच्या पानावर आतल्या बाजूला त्याच मालेतल्या पन्नास पुस्तकाची यादी होती. इतर काही पुस्तक आगामी या सदराखाली होतीं. या यादीच्या खाली एक टीप दिलेली होती. त्यात अस म्हटल होत कीं ड्यूक सिगारेटच पाकीट जो घेईल त्याला त्या पाकिटाबरोबर एकएक पुस्तक फुकट मिळेल.

इतिहासाच्या या पुस्तकानी माझे सर्व खिसे भरून टाकण्याची माझी इच्छा होती. परतु दहा सेंट्सच ड्यूक सिगारेटच पाकीट घ्याव तेव्हाच ते पुस्तक

मिळणार! आता कस करायच? सिगारेट ओढण फार वाईट असच आम्हा मुलाना सागण्यात आल होत. चागली माणस सिगारेट ओढीत नाहींत असच आम्ही मुल मानीत असू शरीरशास्त्राच्या पुस्तकात सिगारेट ओढण्याचे दुष्परिणाम कोणते याची यादी आम्हीं वाचली. आम्हाला माहीत होत की तबाखूत निकोटिन नावाच विष असत सिगारेट ओढल्या की हे विषारी निकोटिन श्वासाबरोबर थेट तुमच्या फुफुसात जात त्यामुळे क्षयरोग जडण्याचीहि भीति असते. सिगारेट ओढल्यामुळ दम खुटतो आणि उत्तम रीतीन खेळ खेळण अशक्य होऊन बसत. बाप रे! अशा परिस्थितीत इतिहासाच्या पुस्तकासाठी डयूक सिगारेटच पाकीट कोण घेणार होत? मोठेपणी आम्ही एका निकेलला मिळणारे पाच चिरूट घेऊन जेव्हा ओढू लागलो तेव्हा आम्हाला मनातून वाटत होत की आता आम्ही प्रौढ माणस झालो. बघू तरी धूम्रपानाचा काय परिणाम होतो तो!!

इतिहासाची हीं पुस्तक मिळवायच माझ्या मनान घेतल. ओळखीच्या लोकाच्या घरी जाऊन डयूक सिगारेट कोण ओढतात ह मी पाहू लागलो. डयूक सिगारेट ओढणारी तीन माणस मला आढळली. त्यापैकी एकजण हीं इतिहासाची पुस्तक स्वतःसाठीच जमवीत असे. बाकीच्या दोघानी मात्र इतिहासाची हीं पुस्तक जमवून मला देण्याच कबूल केल. काहीं काळानतर माझ्याकडे बरीच पुस्तक जमली.

पुस्तकाच्या या यादीत जॉन एरिक्सन याच चरित्र होत. तो स्वीडिश होता. युद्धात उत्तरेला विजय मिळावा म्हणून त्याने खूपच मदत केली होती. एरिक्सनच हे चरित्र मिळविण्यासाठी मी खूप प्रयत्न केला, पण मला यश आल नाहीं. एके दिवशी एका स्वीडिश मुलान मला हव असलेल त पुस्तक हसत हसत आपल्या खिशातून काढून दाखविल. मला त पुस्तक हव आहे हे त्याला माहीत होत. मी गयावया करून ते पुस्तक त्याच्याकडे मागितल. एका पेनीपासून एका निकेलपर्यंत पैसे द्यायला मी तयार झालो पण पुस्तक देण तर दूरच, मला तो ते पुस्तक हातातहि घेऊ देईना. पण मग मी एक युक्ति केली. माझ्याकडे सारा बर्नहार्ट हिच चरित्र होत. त्या मुलान अस ऐकल होत कीं ही बाई आपल्या झोपण्याच्या खोलीत एक शवपेटिका ठेवते आणि विश्रातीसाठी म्हणून तिच्यातच झोपते. मीं त्याला हे पुस्तक दाखविल. तेव्हा त्या मुलाचे डोळे कुतूहलानें चमकले आणि तो आनदाने ओरडला, "अरे बाप रे! मला दे ना हे पुस्तक." मग मीं

सौदा केला. एरिक्सनचं मला हवं असलेलं चरित्र मी त्याच्याकडून या पुस्तकाच्या बदली मागून घेतलं. तो सौदा त्या मुलाला पटला, परंतु आपल्या आईबापांना विचारल्याशिवाय तो मला काही पुस्तक द्यायला तयार होईना. दुसरे दिवशी आपल्या आईबापांना विचारून तो आला. एरिक्सनचं चरित्र मुळीच देऊ नकोस असं त्यांनी त्याला सांगितलं होतं, त्यामुळं वाचून झाल्यावर मला तं पुस्तक परत देणं भाग होतं. सारा बर्न हार्टच्या पुस्तकाच्या मोबदल्यात एरिक्सनचं पुस्तक मिळविण्याचा माझा घाट अखेर फसलाच

हळूहळू माझं हं खिशातलं वाचनालय वाढू लागलं. डाव्या बाजूच्या खिशात चार आणि उजव्या खिशात चार अशी आठ आठ पुस्तकं घेऊन मी ऐटीत हिंडू लागलो ती पुस्तकं माझ्या मालकीची होती शाळेच्या लायब्ररीतून पुस्तक वाचायला आणली की ती परत द्यावी लागत पण हीं पुस्तकं मात्र मी कुणालाच परत देणार नव्हतो ती माझी होती.

त्या दिवशी मंगळवार होता सकाळी आई तळघरातली फरशी धूत बसली होती. इतक्यात एक झकपक कपडे केलेला माणूस तिला भेटायला आला. हातातलं काम तिनं तसंच बाजूला टाकलं आणि ती त्याचं बोलणं ऐकू लागली. तो मनुष्य तिला काहीं पुस्तकाचे नमुने दाखवीत होता. पूर्ण पुस्तक त्याच्याकडे नव्हतीं. पण मुखपृष्ठ आणि नमुन्यादाखल काहीं पानं त्यानं आपल्याबरोबर आणली होतीं. मूळ पुस्तक त्यानं आणलेल्या नमुन्याच्या पानापेक्षा पांच पटीनं मोठं होतं. नमुन्याची ती पानं पाहतांना माझ्या आईचा चेहरा आणि डोळे उजळलेले दिसले. तो मनुष्य तिला सांगत होता, "हे पाहा, शिक्षण हेंच मुलांच्या जीवनात अत्यंत महत्त्वाचं असतं. हे शिक्षण कसं मिळवणार? त्यासाठी पुस्तकं वाचली पाहिजेत—चांगली चांगली पुस्तकं वाचली पाहिजेत. आता समजा, तुमच्या घरी हा जगातल्या माहितीचं भांडार असलेला ज्ञानकोश आहे. स्वाभाविकच तुमची मुलं तो वाचू लागतात, आणि त्यांच्या ज्ञानात भर पडत जाते. तुमची मुलं मोठी होऊन जेव्हा जगात जातील तेव्हा हे ज्ञानच त्यांना तारील. ज्याचं ज्ञान मोठं तो माणूस मोठा." तो माणूस बोलत होता आणि माझी आई थक्क होऊन ऐकत होती. शिक्षणाविषयीं आणि ज्ञानाविषयीं माझ्या आईचं देखील तेंच मत होतं. तो मनुष्य जणू तिचं मनोगतच बोलून दाखवीत होता. बाबा तिथं असते तर पुस्तकांचं हे लाड पाहून ते कुरकुरले असते, त्यांनी कपाळाला आठ्या घातल्या असत्या. पण माझ्या आईचं तसं नव्हतं. पुस्तकाचं महत्त्व तिच्या मनाला पटलेलं होतं.

त्या माणसाने दाखविलेली पुस्तकाचीं पान तिन एकदा चाळून पाहिली आणि प्रश्नार्थक नजरेन तिन माझ्याकडे पाहिल. तिचे डोळे जणू विचारीत होते, "हवी आहेत ना तुला हीं पुस्तक ?" मला शक्य होत तितक्या प्रकारानी मी तिला माझा होकार दर्शविला त्या माणसाजवळ आपली पुस्तकाची मागणी तिने नोदविली टरलेल्या तारखेला तो मनुष्य नवा ज्ञानकोश घेऊन आला. तोपर्यंत माझ्या आईने त्या पुस्तकाची पचाहत्तर सेट्स किमत जमवून ठेविली होती.

माझ्या बाबानी हा ज्ञानकोश पाहिला तेव्हा ते म्हणाले, "पाण्यात गेले पैसे. हीं पुस्तक आणखी घरात कशाला ? पोराना शाळेत मिळतय त शिक्षण काय थोड झाल ?" पुस्तकाचा तो एजट पुन्हा जेव्हा घरी आला तेव्हा मात्र माझ्या बाबानी खूपच आरडाओरडा केला. त्या पुस्तकविक्रेत्यान या वेळी 'जगाचा इतिहास' हे पुस्तक आणल होत. पहिल्या ज्ञानकोशापेक्षा हे पुस्तक तिप्पट मोट होत. त्या पुस्तकात खूप चित्र होतीं. जगाच्या इतिहासाची माहिती देताना, जगात झालेल्या महत्त्वाच्या युद्धाची तपशीलवार वार्ता कटाक्षान देण्यात आली होती. माझे बाबा पहिल पुस्तक आईन घेतल तेव्हा चिडले होते : त्यामुळे या वेळी हे पुस्तक घ्यायला माझी आई थोडीशी कचरत होती. पण मी हे पुस्तक पाहिल तेव्हा माझ्या आनदाला सीमाच उरली नाहीं. मला हे पुस्तक हवच असा मी तिच्याजवळ हट्ट धरून बसलो. शेवटी पुस्तक घ्यायला ती तयार झाली. पुस्तकाची किमत दीड डॉलर होती : म्हणजे माझ्या बाबान्या एका दिवसाच्या पगारापेक्षाहि ती अधिक होती. दोन आठवड्यानी ते पुस्तक घेऊन तो माणूस आला तेव्हा माझ्या आईन पैसे तयार ठेवले होते. दीड डॉलर देऊन ते पुस्तक घेतल हे जेव्हा माझ्या बाबाना कळल तेव्हा तर त्यानीं घरच डोक्यावर घेतल. पुन्हा जर आम्हीं पुस्तक विकत घेतली असती तर त्यानी काय केल असत देव जाणे ! त्या दिवसापासून त्या पुस्तकविक्रेत्याच आमच्या घरी येण बद झाल.

मी पुस्तक वाचू लागलो की माझ्या उज्ज्वल भविष्यकाळाची चित्र माझ्या आईच्या डोळ्यासमोर तरळू लागत. आणि तिचा चेहरा उजळून निघे. बाबा मात्र वैतागून म्हणत, "शॉली, काय मिळणार आहे तुला ते पुस्तक वाचून, अ !" त्याच्या या प्रश्नाला माझ्यापाशी उत्तर नव्हत. त्याच हे बोलण मला मुळीच आवडत नसे. पण कधी कधी वाटायच की छातीवर कर्जाच ओझ असल्यामुळे तर ते अस बोलत नसावे ना ?

ग्रामर स्कूलमध्ये माझ नाव घातल तेव्हा आपण आता मोठे झालो आहोत

असं मला वाटू लागल. शाळेत जाण्यायेण्यासाठी मला दिवसाकाठी दोनअडीच मैल चालाव लागे. शहरातल्या सर्व भागातली मुल या शाळेत येत. अनेक नव्या नव्या ओळखी होत. चागल्या चागल्या घराण्यातली मुल आणि मुली या शाळेत शिकत होती. गावाच्या चवाठ्यापासून एका चौकाच्या अतरावर आमची ही नवी शाळा होती. चौक आणि शाळा याच्यामध्ये पहिल जुन चर्च होत. वसाहत करून राहण्यासाठी प्रथम आलेल्या माणसानी चाळीस वर्षापूर्वी हे चर्च बाधल होत. शाळेच्या पलीकडच्या रस्त्यावर हेन्री सॅन्डर्सन यान दुमजली घर होत. सॅन्डर्सननी लाबलचक शुभ्र दाढी ठेवलेली होती. त्याचा चेहरा शात असे. अठराशे अठ्ठावन्न साली – म्हणजे ज्या वर्षी अब्राहम लिंकन आणि डगलस याच्यात वाग्युद्ध झाल त्या वर्षी—सॅन्डर्सन गेटसबर्गचे मेयर होते. मला कुणीतरी सागितल होत की सॅन्डर्सननी अब्राहम लिंकनला आपल्या घरी नेऊन त्याचा पाहुणचार केला होता. लिंकनला आघोळीसाठी त्यानी गरमगरम पाणी आणि स्वच्छ टॉवेल दिला होता.

मी आठवीत गेलो तेव्हा आमच्या वर्गाला मिस् फ्रॅन्सिस हेग नावाच्या बाई शिकवायला आल्या. ती खूप वाचन करायची, पुस्तकावर तिच अपार प्रेम होत. एखाद पुस्तक ती शिकवीत असो किंवा नसो, मोठ्या उत्साहान ती त्याच्याविषयी बोलायची. सर्व युरोपचा तिने प्रवास केला होता. इतिहासाविषयी ती बोलू लागली, शहराविषयी माहिती सागू लागली की त्या साऱ्या गोष्टी जिवत होऊन आमच्या डोळ्यासमोर उभ्या राहत. अमेरिकेचा इतिहास तिने आम्हाला शिकविला त्यावेळी पहिल्याप्रथमच मला माझ्या देशाचा इतिहास कळला. इतिहासाच हे पुस्तक शैलीच्या दृष्टीने जडच होत, परतु अमेरिकेच्या इतिहासाकडे पाहण्याची नवी दृष्टि मला या पुस्तकाने दिली. मिस् फ्रान्सिस हा इतिहास शिकवीत असताना त्यात विलक्षण रग भरायची.

मिस् फ्रान्सिसचा तास सपला की तिन सागितलेली माहिती, विचार माझ्या मनात घोळत राहायचे. शिक्षण म्हणजे काय, हे नेमक मला माहित नव्हत, पण मला सारख वाटायच की खर शिक्षण म्हणजे जे काही असेल ते मिस् फ्रान्सिस-च्याच तासाला मला मिळत. त्याच्यानतर पुढील वर्षात मला सारख वाटायच की खर शिक्षण मिळाल ते शाळेबाहेरच मिळाल. अनेक पुस्तक, वर्तमानपत्र, मासिक मी वाचली, वेगवेगळ्या तऱ्हाच्या माणसाना वागताना बोलताना मी पाहिल. शाळेच्या चार भितीपलीकडच्या या जगान मला खूप शिकवल.

# खेळांचे दिवस

बेरीन स्ट्रीटवरच्या लाकडी फुटपाथवर, तसच, हा फुटपाथ आणि त्याच्यापलिकडे असलेल गटार याच्यामधल्या गवतावर आम्ही नानातऱ्हेचे खेळ खेळत असू. बेसबॉल, धावाधावी, सुईदोऱ्याची शर्यत, भोवरा फिरविणे असे अनेक खेळ अजूनहि मला आठवतात. दर वर्षी नॉक्स आणि लोंबार्ड कॉलेजच्या विद्यार्थ्यांच्या क्रीडा-स्पर्धा होत असत. त्या स्पर्धा पाहिल्या की आम्हालाहि स्फूर्ति यायची. आणि मग बेरीन स्ट्रीटवर उन्हाळ्यातल्या त्या तापलेल्या धुळीत अनवाणी पायानी आमच्या खेळाच्या स्पर्धा सुरू व्हायच्या. एका मुलाकडे अडीच डॉलर किमतीच वॉटरबेरी कंपनीच घड्याळ होत. पन्नास यार्ड आणि शभर यार्ड हे अंतर आम्ही किती सेकदात धावू शकतो हे या घड्याळाच्या साहाय्याने आम्ही पाहत असू. कॉलेजमधल्या विद्यार्थ्यांपेक्षा थोडेच सेकद आम्हाला अधिक वेळ लागत असे. शभर यार्ड धावण्याचा जागतिक विक्रम किती सेकदाचा आहे हेहि आम्हाला ठाऊक होत. या जागतिक विक्रमापेक्षा सहाच सेकद आम्हाला अधिक वेळ लागत असे. लांब उड्या आणि उंच उड्या याच्या बाबतीत तर कॉलेज विद्यार्थ्यांच्या अगदी जवळजवळ आम्ही असू. कॉलेज विद्यार्थी जे जे खेळ खेळत ते ते आम्ही खेळत असू, फक्त पोलजम्प आम्हाला जमत नसे. आमची एक मैल धावण्याची शर्यत सध्याकाळी व्हायची. या शर्यतीत मात्र आम्ही कुणाचाहि विक्रम मोडण्याचा प्रयत्न करीत नसू. आमच्यातच ती स्पर्धा व्हायची. आम्ही आपापसात म्हणू की एक मैलाची शर्यत धावायला सुरुवात केली की प्रथम दमायला होत, परंतु हा दम खाऊन पुन्हा जर नेटाने धावायला सुरुवात केली तर हा एक मैल सहज पुरा करता येतो.

आमच्या घरासमोरच्या रस्त्याच्या पलीकडे एक दुमजली लाकडी घर होत. या घराभोवती छोटस अंगण होत. या घरासमोर असलेल्या रस्त्यावर आम्ही मुल बेसबॉल खेळत असू. या घराच्या व्हराड्यात झुलती खुर्ची टाकून एक बुटकीशी म्हातारी बाई बसायची. तिचे केस पाढरे शुभ्र होते. मला या बाईविषयीं थोडी

माहिती होती. तिचा भूतकाळ डोळे दिपवणारा नसला तरी तो खासच अभिमानास्पद होता ती बाई प्रसिद्ध होती अस म्हटल तरी चालल असत. लक्षावधि मुलानी आपल्या क्रमिक पुस्तकातून तिन लिहिलेल्या कविताच्या ओळी पाठ केलेल्या होत्या त्या काळातल्या इग्रजी कवितात तिच्या एका कवितेइतकी दुसरी कुठली कविता गाजली असेल, लोकाच्या ओठावर खेळली असेल अस मला वाटत नाही. तिची ती कविता अशी होती.

**पाण्याचे इवले थेंब**
**कण मातीचेहि लहान**
**निर्मिती महासागर अन्**
**निर्मिती प्रदेश महान्**

**सकृत्यें इवलीं इवली**
**अन् एक शब्द प्रेमाचा**
**आपुलिया अस्तित्वानें**
**बनविती स्वर्ग पृथ्वीचा**

या बाईच नाव होत जुलिया कार्नी. फ्लेचर आणि जेम्स हे तिचे दोन मुलगे लोम्बार्ड कॉलेजचे पदवीधर होते. ते विश्वबधुत्ववादी होते. फ्लेचर तर दोन-तीन वेळा गेल्सबर्गचा मेयरहि झाला होता. ती वृद्ध कवयित्री आपल्या झुलत्या खुर्चीवर बसून कसल्यातरी विचारात गढून गेलेली असायची. अशा वेळी ती शाति आणि विश्राति याची प्रतिमा भासायची. तिच्या घरासमोरच्या मैदानात आम्ही खेळताना मारलेल्या आरोळ्या हवेत घुमत असायच्या. 'फेक, तो बॉल, फेक' 'जोराने धाव', 'मॅकगिन्टी गेला समुद्राच्या तळाशी' .पण आमच्या या आरोळ्यानी ती जराहि विचलित होत नसे. खेळणाऱ्या आम्हा मुलाना जराहि त्रास न देणारी ही वृद्ध स्त्री आम्हाला फार आवडायची. खर म्हणजे आमच्या शिक्षकानी आम्हाला तिच्याविपयी माहिती सागायला हवी होती. वर्तमानपत्रातून तिच्यावर लेख लिहायला हवे होते. अमेरिकन साहित्याच्या इतिहासात तिच्याविपयी अस लिहिता आल असत की, 'तिच मुलावर खूप प्रेम होत. तिन मुलासाठी कविता लिहिल्या. आपल्या कविता मुलाना आवडतील असा तिचा विश्वास होता.'

दिवेलागणीची वेळ झाली की रस्त्यावरचे गॅसचे दिवे लावायला एक माणूस

यायचा. खेळ थाबवून आम्ही त्याच्या मागोमाग हिडत असू. त्याच्याजवळ एक लहानशी शिडी असायची. दिव्याच्या खाबाला ओठगून ती शिडी तो उभी करायचा, आणि तिच्यावर चढून काचेच्या त्या दिव्याच ते छोटस दार उघडायचा. दार उघडून झाल की गॅस सुरू करून हातातील पेटत्या काडीने तो दिवा शिलगवायचा. दिवा पेटला की शिडीवरून खाली उतरून पुढचा दिवा पेटविण्यासाठी जायचा. काही काळानतर रस्त्यावरचे हे गॅसचे दिवे जाऊन त्याच्या जागी विजेचे दिवे आले. हे विजेचे दिवे इतक्या उचावर लावलेले होते की गवताच्या गाडीवर बसलेला मनुष्य उभा राहिला असता तरीहि त्याचा हात या दिव्याना लागला नसता. विजेचे दिवे आले तेव्हा हातात शिडी घेऊन गॅसचे दिवे पेटवीत जाणारा तो माणूस आम्हाला कधीच दिसला नाही. त्यामुळे आम्हाला चुकल्याचुकल्यासारखं वाटे.

विजेच्या दिव्याचा झगझगीत प्रकाश रस्त्यावर पडायचा. आम्ही मुल त्यामुळे रात्रीच्या वेळीहि रस्त्यावर खेळायला जाऊ लागलो. दिवसाहि हुदडायच आणि रात्रहि खेळून काढायची असा आमचा क्रम सुरू झाला. त्यामुळे आमच्या आई-बापाच्या मागे नव्या कटकटी लागल्या. खेळ सुरू झाले की दिवसासारखाच आमचा प्रचड आरडाओरडा सुरू होई. खेळात जे जिकत ते हरलेल्याची हुर्योऽऽ करण्या-साठीं आरडाओरडा करीत, आणि जे हरत ते चिडून आरडाओरडा करीत. दिवसभर काम करून दमलेले कामगार आपापल्या घरी झोपण्याच्या तयारींत असत, परतु आमच्या या आरडाओरडीमुळे त्याचा डोळा लागेल तर शपथ! मधूनच उठून ते खिडकीत येत आणि आम्हाला शिव्या हासडीत. पण त्यामुळे आमचा जल्लोष यत्किचितहि कमी होत नसे.

एकदा अशीच झोपमोड झालेला एक कामगार संतापून आपल्या घराच्या खिडकीत येऊन उभा राहिला. एखाद्या मोठ्या मॅचमधल्या अपायरसारखा त्याचा भसाडा आवाज होता. रागाने हातवारे करीत तो ओरडला, 'पोरट्यानो, आरडा-ओरड थाबविता की पोलिसाना आणू बोलावून?' त्याच्या या दमदाटीमुळे आमचा गलका क्षणभर एकदम शात झाला. आम्ही जमिनीवर बसलो आणि हलक्या आवाजात कुजबुज करू लागलो. एकजण म्हणाला, "तुला खरच वाटत का रे तो पोलिसाना बोलवून आणील अस?"

दुसरा म्हणाला, "अरे जा, आम्ही स्वतत्र राष्ट्रातले नागरिक आहोत. बोबाबोब करण हा आमचा न्यायसिद्ध अधिकार आहे!"

"नको रे बाबा, पोलिसाच्या मोटारीत बसून जायची आपली नाहीं बुवा तयारी!" इतक्यात बाजूच्या घरातून तरातरा चालत एक बाई आली. तिचा मुलगा आमच्याबरोबर खेळत होता. तिने त्याला बरोबर हुडकून काढला. त्याचा कान धरून ती त्याला ओढीत घरी घेऊन गेली. त्यावेळी त्या पोराचा चेहरा भेदरलेल्या बकरीसारखा दिसत होता. इतक्यात एकदोन पोराचे बापहि घरातून बाहेर आले. त्यानी आपापल्या पोराच्या बकोट्याना धरून खाटीकखान्यात बकऱ्या नेतात तस त्याना ओढून नेल. मी आणि मार्ट घरी पळालो नऊ वाजेपर्यंत आम्ही जर घरी गेलो नसतो तर आम्हाला चागलाच दम मिळाला असता!

दुसऱ्या दिवशी पुन्हा ये रे माझ्या मागल्या! रात्री पुन्हा आम्ही खेळायला गेलो, आणि एवढ्या मोठ्यान आरडाओरड करायला सुरुवात केली की एक चौकपर्यंत आमचा आवाज ऐकू आला असता. आदल्या रात्री त्या सतप्त कामगारान पोलिसाना बोलावण्याची धमकी दिलीच होती. तसच झाल. गस्त घालणाऱ्या पोलिसाची मोटार आमच्या रोखान येऊ लागली. पोलिस व्हॅन थाबण्यापूर्वीच पाचसहा पोरानी पळ काढला. पाचसहा मुल मात्र तशीच उभी राहिली. आम्ही पळूनहि जाणार नव्हतो किंवा आम्ही भ्यालो आहोत असहि दाखविणार नव्हतो. एकमेकाना खेटून आम्ही उभे राहिलो. इतक्यात पोलिसाची मोटार येऊन आमच्यासमोर थडकली. दोन पोलिस खाली उतरले. त्या दोघापैकी एकाच नाव होत फ्रॅंक पिटरसन त्याच वजन होत दोनशेवीस पौंड तो जवळ येताना एखादा प्रचड युद्धनौकाच आमच्यावर चालून येते आहे असा आम्हाला भास झाला. पिटरसन आम्हाला चागलच खडसावणार अस आम्हाला वाटल होत. परतु तो जवळ आला आणि आम्हाला विश्वासात घेतल्याप्रमाणे अत्यत मृदु आवाजात म्हणाला, 'हे पाहा मुलानो, तुमच्या या खेळामुळ तुम्ही आजबाजूच्या लोकाची झोपमोड करता हे कस कळत नाहीं तुम्हाला?" त्या शातपणे विचारलेल्या रास्त प्रश्नाला आम्ही दुसर काय उत्तर देणार होतो? आमच्यापैकी एकजण म्हणाला, 'खर आहे.' दुसरा म्हणाला, 'नाहीं हो, आम्ही आपली जरा गमत करीत होतो.' पिटरसन मघाच्याच शात आवाजात म्हणाला, 'पण दुसऱ्याची झोपमोड न करता तुम्हाला खेळता नाहीं का यायच?'

आम्हा मुलाना पिटरसन हा पोलिस मनापासून आवडला. आम्हाला वाटल होत की तो आम्हाला मोटारीत कोबून चौकीवर घेऊन जाईल. पण तस काहींच झाल नाहीं. आम्ही नम्रपणे त्याला म्हणालो की, आजूबाजूच्या लोकाना मुळीच

त्रास न देता आम्ही खेळू. पिटरसन मोटारीत जाऊन बसण्यापूर्वी आमच्या नजरेला नजर भिडवून म्हणाला, 'हे पाहा मुलानो, आरडाओरड न करता खेळू असं वचन देता आहात तुम्ही मला. तुमचं वचन तुम्हीं पाळलं नाहीं तर आम्हाला कडक धोरण स्वीकारावं लागेल.' त्याचा मृदु स्वर क्षणभर करडा झाला. तो पुढे म्हणाला, 'ध्यानात ठेवा. तुमच्यासारख्या मुलाना अटक करण्याची काहीं आमची इच्छा नाही. पण तुम्ही नीट वागला नाहीत तर नाइलाजानं तुम्हाला अटक करणं भाग पडेल.' अटक करणं हा शब्द ऐकताच आमची घाबरगुडी उडाली. पोलिसानी अटक केली म्हणजे आम्ही गुन्हेगार ठरणार! आणि एकदा गुन्हेगार ठरलो की सगळंच संपलं कीं!

पोलिसाची मोटर निघून गेली. ती दूरवर गेली तसे आम्ही गवतावर बसलो आणि हलक्या आवाजात आपापसात बोलू लागलो. आम्ही सर्वांनी ठरवलं की जे काही खेळायचं असेल जे आरडाओरड न करता खेळायचं. परंतु आदल्या रात्रीं बोंबाबोंब करण्याच्या न्याय्य हक्काची भाषा बोलणाऱ्या त्या मुलाला मात्र आमचा हा ठराव मुळीच पसंत पडला नाहीं. आरडाओरड करण्याचा आपला अधिकार कुठलीहि सत्ता छिनून घेऊ शकत नाहीं, आम्ही झोपमोड करू किंवा काय वाटेल ते करू असंच त्याचं मत होतं. आणि म्हणून सभ्य मुलगा म्हणून आमच्यात खेळण्यापेक्षा न खेळलेलंच परवडलं असं त्यानं ठरवलं. पण नंतर आम्हाला कळलं की या मुलानं भलतेच 'खेळ' सुरू केले. जुगाराच्या अड्ड्यावर आणि दारूच्या गुत्त्यात तो वारंवार दिसू लागला. एक दिवस चोरी करताना तो पकडला गेला. आणि बाल-गुन्हेगाराच्या शाळेत त्याला पाठविण्यात आलं.

पुढच्या रात्रीपासून आरडाओरडा न करता खेळण्याचा आम्ही प्रयत्न करू लागलो. असं खेळणं महाबिकट काम होतं. एकदा सगळी मुलं अशीच बेसबॉल खेळत होतीं. मला काहीं कामानिमित्त पहाटे साडेसहाला उठायचं होतं म्हणून मी रात्रभर न खेळता मध्येंच घरीं गेलो. त्या रात्री काय प्रकार घडला ते मला मागाहून कळलं. बेसबॉल अगदीं रंगात आला होता. खेळण्याच्या धुंदीत आदल्या रात्री केलेला शांततेचा ठराव पोरं विसरून गेली होतीं. त्यानी एवढ्या मोठ्यानं आरडाओरडा सुरू केला की विचारता सोय नाहीं. एक कामगार आपल्या घरीं गाढ झोपला होता. या कल्लोळामुळं तो दचकून झोपेतून उठला. एका हातात एक दंडुका आणि दुसऱ्या हातात पिस्तुल घेऊन तो शिव्या घालीतच बाहेर आला. आपल्या पिस्तुलात गोळ्या भरलेल्या आहेत हे दाखविण्यासाठीं त्यानं

दोन बार हवेंत काढले. तिसरी गोळी त्याने फुटपाथवरच्या एका लाकडी फळीला मारली. त्या फळीला पडलेल्या भोकाकडे ती भेदरलेली पोर आ वासून बघत राहिली. इतक्यात तो माणूस जवळ आला. एका पोराला पकडून त्याने त्याच्या पाठीत एक रट्टा लगावला. दुसऱ्याच्या कबरेत लाथ मारली. मग त्याने आपल्या खिशातून एक घड्याळ काढल आणि ते उच्च धरून तो म्हणाला, 'कार्ट्यानो, दोन मिनिटाच्या आत जर तुम्ही घरी गेला नाहीं तर एकालाहि मी जिवत सोडणार नाही, याद राखा.' अर्ध्याअधिक मुलानी धूम ठोकली. बाकीचे तुरुतुरु चालत गेले. त्या दिवसापासून फारशी मुल खेळण्यासाठी तिथ फिरकली नाहीत आणि दिवसभराच्या कामाने थकलेली ती आजूबाजूची सभ्य माणस शात चित्तान झोपू शकली. पिस्तुलाच भय दाखविणाऱ्या त्या कामगाराचा आम्हाला असा सताप आला होता म्हणता ! फ्रॅक पिटरसन या पोलिसाविषयी मात्र 'तो फार चागला मनुष्य आहे बर ! तुम्हाला माहीत आहे का ?' अस आम्ही बोलू लागलो.

आमच्या घराच्या पूर्वेकडे चार घर सोडून एक मोकळ मैदान होत. तिथ बेसबॉल खेळायच आम्हीं ठरवल. या मैदानावर एक गरीब गाय चरत असे. आम्हीं त्या गाईला कधीच मारल नाहीं. परतु तिच्याजवळ पडलेला आमचा बॉल आणण्यासाटीं आम्ही गेलो की ती गाय बिथरून धावत सुटायची. हे पाहून त्या गाईचा मालक सतापला. त्याने पोलिसाना बोलावून आणण्याची धमकी दिली. आम्ही घाबरलो. त्या मैदानावरचा खेळ थाबवून आम्ही पुन्हा रस्त्यावर खेळू लागलो. काहीं दिवसांनी त्या माणसाने ती गाय विकल्याच आम्हाला कळल. झाल, आम्ही पुन्हा त्या मैदानाकडे वळलो.

या मैदानाच्या जवळच मिसेस् मूर या बाईच घर होत. यादवी युद्धात कामास आलेल्या एका शूर सैनिकाची ती विधवा होती. तिला सरकारातून पेन्शन मिळत असे. त्या घरात ती एकटीच राहायची. मिसेस् मूर उच होती. तिचे केस अधून मधून पिकलेले होते. ती शात होती. आपला मातीचा पाइप ओठीत असताना नाहींतर आपल्या भाज्याच्या आणि फुलाच्या बगीच्यात काम करीत असताना ती नेहमी दिसायची. तिच्या बगीच्याइतका चागला बगीचा आसपास कुठेहि नव्हता. नानाप्रकारची फुल तिथ होती. तिच्या बगीच्याच्या कुपणापासून दहा पावलाच्या अतरावरच आमचा बेसबॉल सुरू असायचा. खेळता खेळता आमचा बॉल तिच्या बगीच्यात जाऊन पडायचा. मग आमच्यापैकी एकजण त्या कुपणावरून उडी मारून बगीच्यात शिरायचा आणि बॉल शोधू लागायचा. अशा

वेळीं तो मुलगा आणि तो चेंडू याच्यामध्यें मिसेस् मूर येऊन उभी राहायची आणि मग मोठीच पचाईत व्हायची. मिसेस् मूर विचारायची, 'काय रे, माझ्या बगीच्याची नासधूस का रे करता?' मग तो मुलगा उत्तर द्यायचा, 'आता पुन्हा नाहीं अस करणार.' यावर मिसेस् मूर म्हणायची, 'बर, जा आता चेंडू घेऊन, पण पुन्हा या बगीच्याची नासधूस करायला आलात तर मला कडक व्हाव लागेल ह!' पण पुन्हा पुन्हा आमचा बॉल तिच्या बगीच्यात जाऊन पडायचाच मिसेस् मूर आम्हाला दम देण्याचा प्रयत्न करायची, पण खर म्हणजे सतापून दम देण हे तिच्या स्वभावातच नव्हत आपण पोलिसाना जाऊन सागू अस ती आम्हाला सुचवायची, पण ती कधी पोलिसातहि गेली नाहीं की मुलाच्या आईबापाना तिन कधी येऊन सागितल नाही खर म्हणजे तो बगीचा ही तिची मालमत्ता होती, आणि तिच्या परवानगीशिवाय आम्ही तिथ घुसत असल्यामुळ आमच्यावर कायदेशीर इलाज करण तिला सहज शक्य होत. पण तिन तस कधी केल नाही. तिच्यासारख्या दयाळू स्त्रिया क्वचितच आढळतील. बगीच्यात काम करता करता गाजरबटाटे आणि वाऱ्यावर डुलणारी फुल याच्याकडून तिन अनन्यसाधारण शहाणपण मिळवलं होत.

रस्त्यावर आम्ही बेसबॉल खेळत असू तेव्हा झाडूची काठी ही आमची बॅट असे. पाच सेंट किमतीचा एक रबरी चेंडू घेऊन त्याच्याभोवती आम्ही अनेक दोऱ्या गुडाळल्या होत्या. विटा आणि पत्र्याचे डबे ही आमची बेस होती. आमच्या हातात मोजे नसत. बॉल झेलताना झिणझिण्या येऊ नयेत म्हणून ग्लोव्ह्ज वापरतात हे आम्हाला कळेपर्यंत आम्ही उघड्या हातानें खेळत असू.

काहीं दिवसानी त्याच मैदानावर आम्ही मोठ्या मॅचमधून खेळतात तो बॉल घेऊन खेळू लागलो. ज्या मुलाने तो चेंडू आणला होता त्याला आम्ही विचारल, 'या चेंडूची किमत काय?' तो म्हणाला, 'दीड डॉलर.' हे ऐकून आम्हाला मोठच आश्चर्य वाटल. जो जो भेटेल त्याला आम्ही सागत सुटलो, 'थट्टा नाही. दीड डॉलरच्या बॉलने आम्ही खेळतो म्हटल.' ॲमॉस रुसी हा प्रसिद्ध खेळाडू मॅचमध्ये तशाच बॉलने खेळायचा. शिकागो टीममधला खेळाडू बिग बिल लाज तोच बॉल जोराने मारायचा. शिकागोच्या वर्तमानपत्रातल्या खेळाच्या बातम्या मी वाचू लागलो तेव्हा ॲमॉस रुसी गुगली बॉल कसा टाकायचा याच वर्णन मी मोठ्या उत्सुकतेन वाचल. काहीं दिवसानी मला कळल की दारूच्या व्यसनामुळ ॲमॉस रुसीचा खेळ पार बिघडला. ज्या लहानमोठ्या क्लबातून तो मॅच खेळत

असे त्या क्लबानी त्याला काढून टाकल. एका गॅसच्या कारखान्यात रोजी दीड डॉलरवर काम करण त्याच्या नशिबी आल. बाबाच्यापेक्षा त्याला दहा सेंट अधिकच मिळत असत, पण तरी त्याच्या या दुर्दशेच मला फार मोठ दुःख वाटे. गॅल्सबर्गमध्ये मॅचेस् होत तेव्हा तिकिटापुरते पैसे नसल्यामुळे बेरीन स्ट्रीटवरची आम्ही मुल कधी मैदानाच्या कुपणातून वाकून तर कधी झाडावर चढून हा खेळ पाहत असू

शहरातल्या खेळाडूची 'सिटी लीग' ही टीम स्थापन झाली आणि दर आठवड्याला ती एकदोन गेम खेळू लागली. तेव्हापासून गॅल्सबर्गमध्ये बेस-बॉलच्या खेळाला आणि मॅचेसना खरी रगत येऊ लागली मेनस्ट्रीटवरच्या कारकुनाची एक टीम होती. रेल्वे रस्त्यावर काम करणाऱ्या कामगाराची दुसरी टीम होती. आणखीहि दोन टीम्स गावात होत्या. एकदा व्हिक्टोरिया या गावा-तली एक टीम आमच्याशी मॅच खेळायला आली. त्या टीमच नाव आम्ही फारस ऐकल नव्हत. गेल्सबर्गमधल्या नऊ उत्तम खेळाडूची एक टीम तयार केली गेली आणि व्हिक्टोरियाच्या टीमशी मॅच खेळायच ठरल. गेल्सबर्गवाल्याना वाटत होत की आपण हा हा म्हणता त्या टीमला हरवून टाकू. परतु व्हिटोरियाची टीम जोरदार खेळली. स्प्रॅटबधू, बॉब आणि जॅक हे त्याचे उत्तम खेळाडू होते. या खेळाडूना नतर चागल्या क्लबातूनहि खेळण्याची सधि मिळाली. व्हिक्टो-रियाच्या टीमचा मध्यवर्ती क्षेत्ररक्षक चागलाच उच होता. व्हिक्टोरियाची टीम एकदोन रन्सनी पुढ होती. पहिली इनिग सपेपर्यत ती तशीच पुढे राहिली. गेल्सबर्गच्या टीमचा एक खेळाडू बाद झाला होता. उरलेले दोन खेळाडू खेळायला आले. त्यातला एकजण चागलाच तगड्या होता. त्यान एक उच टोला लगावला. परतु व्हिक्टोरियाच्या त्या उचाड्या क्षेत्ररक्षकान जोरात धावून त्या बॉलवर झडप घातली आणि जोराने तो बॉल बेसकडे फेकला. झाल, व्हिक्टोरि-याच्या टीमन विजय मिळविला. मी पाहिलेल्या एकदर रगतदार मॅचेसपैकी ही अत्यत महत्त्वाची होती अस मला वाटत.

उन्हाळ्याच्या दिवसात सकाळी आठ वाजल्यापासून मी बेसबॉल खेळायला सुरुवात करी. दुपारी जेवणाची वेळ झाली की मी धावत धावत घरी जेवायला जात असे. हातावर पाणी पडल की पुन्हा मैदानावर खेळायला हजर. सध्याकाळी अधार पडून बॉल दिसेनासा होईपर्यत आमचा खेळ चालायचा. या बेसबॉलच्या नादान मी इतका झपाटला गेलो होतों की दुसर मला काहींच सुचत नव्हत. राष्ट्रीय दर्जाचे उत्तम खेळाडू त्याच्या नावासकट, त्यानी केलेल्या विमक्रासकट

मला मुखोद्गत होते. सगळ्यात उत्तम खेळाडू कोणता याच्याविषयी माझीं मत ठरलेली होती.

हळू हळू मला वाटू लागल की मी माझी प्रॅक्टिस जर अशीच चालू ठेवली तर माझा खेळ सुधारेल आणि एखाद्या चागल्या टीममधून खेळायची मला संधि मिळेल या टीममधून माझ्या खेळाची चमक मी दाखविली की नावाजलेल्या टीम्सहि मला घेतील. जग वेळ मिळाला की मी बेसबॉलच खेळत असे.

ऑक्टोबर महिन्यातली ती एक दुपार होती. माझ वय तेव्हा सोळा वर्षाच होत. मोठ्या मॅचमधून खेळलेल्या एका खेळाडूकडून क्षेत्ररक्षणाच्या वेळी घालायचे ग्लोव्ह्ज मी आडगिन्हाइकीने विकत घेतले होते. मला त्याचा मोठा अभिमान वाटायचा. ते ग्लोव्ह्ज घालून मी मैदानावर खेळत असे. आमच्यातल्या एका खेळाडूने एक जोराचा टोला लगावला. त्या चेंडूचा झेल पकडण्यासाठी मी वेगान धावलो मोठया क्लबमधून खेळण्याची मला सधि मिळाली की असले कठीण झेल पकडून सगळ्याना दिपवून सोडायच स्वप्न माझ्या डोळ्यासमोर तरळत होत. इतक्यात माझा उजवा पाय एका खड्डयात गेला. आणि मी तोडघशी आपटलो. मी उठून बसलो आणि पाहिल तेव्हा माझ्या पायातला मोजा फाटला होता आणि रक्त वाहत होत. ज्या खड्डयात माझा पाय पडला होता त्यात बीअरची एक फुटकी बाटली होती. त्या बाटलीच्या काचेमुळे माझा पाय फाटला गेला होता.

मी लगडत लगडत डॉ. टॅगार्ट याच्या घरीं गेलो. त्यानी माझ्या पायातला बूट आणि मोजा हलकेच काढला. जखम धुवून त्यानी औषध लावल. नतर त्यानी फाटलेल्या जागीं चार टाके घातले आणि माझ्या पायाला बॅडेज बाधल. माझी ही अवस्था पाहून माझ्या आईला फारच वाईट वाटल. माझ्या बापान चिडून मला विचारल, "बेसबॉल खेळून निष्कारण वेळ फुकट घालविण्याच आता कधी सोडणार तू? केव्हा येणार तुला अक्कल?"

त्या दिवसापासून उत्तम बेसबॉल खेळाडू होण्याच माझ स्वप्न पार विरून गेल. अधून मधून कधी वेळ मिळाला की मी खेळत असे. परतु पायाला पडलेल्या चार टाक्याच्या त्या खुणानी माझ्या उत्कृष्ट खेळाडू होण्याच्या आकाक्षेपुढ कायमचा पूर्णविराम घातला.

# जत्रा आणि सर्कस

मी नऊ वर्षाचा होतो तेव्हापासून सतत तीन वर्षे आम्ही नॉक्स काउंटी जत्रेला जात असू. नॉक्स्व्ही गावाच्या बाहेरच्या बाजूच्या मैदानावर ही जत्रा भरत असे. आमच्या घरापासून चार साडेचार मैलाचे अंतर चालून मी, हस्की लार्सन आणि त्याचा भाऊ ॲल आणि इतर दोघतिघ मुलं मिळून जत्रा पाहण्यासाठी जात असू. वाटेवर खूप धूळ असायची. त्यामुळे आम्ही पायातले बूट हातात घेऊन चालत असू. धूळ नसलेली चांगली सडक लागली की पुन्हा बूट पायात घालीत असू. शेवटपर्यंत बूट न घालता चालत गेलो असतो तर गर्दीतल्या लोकांचे बुटांचे पाय पडून आमच्या पायांची सालटी गेली असती. आगगाडीचा खर्च वाचविण्यासाठी आम्ही चालत जात असू. जत्रेचं तिकीट पंचवीस सेंट होतं. तिकीट काढल्यावर आमच्या हातात थोडेसे निकेल्स शिल्लक उरायचे. या निकेलसचा उपयोग इतर खेळांचीं तिकिटं काढण्यासाठी व्हायचा.

एका माणसाजवळ बोलका एडिसन फोनोग्राफ होता. त्या बोलक्या यंत्राभोवतीं अनेक माणसं गर्दी करून उभी राहत. ग्रामोफोन ऐकण्यासाठी तिकिटाला एक निकेल पडत असे. जो तिकीट विकत घेईल त्याच्या कानाला ऐकण्याचं यंत्र लावण्यात येई. तिकीट घेऊन ग्रामोफोन ऐकणारे आश्चर्यचकित चेहरे करून गर्दीत मिसळत आणि म्हणत, “काय आश्चर्यकारक यंत्र आहे हो! ग्रामोफोनवर ब्रासबॅंड ऐकत असताना आम्हाला असं वाटत होतं की बॅंडचं पथक प्रत्यक्ष या मैदानावरच हजर आहे.” काहीजण हसत म्हणत, “मी खरंच सांगतो तुम्हाला, मोठं सुंदर यंत्र आहे. अगदीं माणसासारखं बोलतं पाहा.”

मग आम्ही एक निकेल देऊन तिकीट विकत घेत असू. ऐकण्याचं यंत्र कानाला लावलं की ग्रामोफोन सुरू व्हायचा. प्रथम एक आवाज व्हायचा, “हा बोलका एडिसन फोनोग्राफ आहे. आता तुम्ही ब्रास बॅंडची एक प्रसिद्ध ध्वनिमुद्रिका ऐकाल.” ऐकत असताना आम्ही एकमेकाच्या चेहऱ्याकडे आश्चर्यभरल्या नजरेनं पाहत असू. जणू आम्ही असंच म्हणत असू की, ‘आम्हाला सगळंच

ऐकू येतय हो! आम्ही प्रत्यक्ष ऐकतो आहोत म्हणून नाहींतर असं काहीं असत यावर आमचा विश्वासच बसला नसता.'

ग्रामोफोन ऐकून झाल्यावर पाळीव जनावराच आणि भाज्याच प्रदर्शन पाहण्यासाठी आम्ही वळत असू घोडे, कोंबडे आणि कोंबड्या, गाई बैल, डुकर इत्यादि विविध पाळीव जनावर प्रदर्शनात ठेवलेली असायची. ज्याच जनावर सर्वात उत्तम ठरेल त्याला परीक्षक बक्षीस देई. प्रदर्शनात ज्यानी आपली जनावर ठेवलेली असत ते शेतकरी इथून तिथून ऐटीत फिरताना दिसत. सर्कशीपेक्षा निराळ्या प्रकारच्च अस वातावरण इथ असे. बरेचसे शेतकरी आणि त्याचे मुलगे नवीन नवीन गोष्टी शिकण्यासाठी म्हणून मुद्दाम इथ येत. वर्षभर अधिक चागल पीक काढाव, उत्तम जनावराची पैदास करून त्याना चागल धष्टपुष्ट वाढवाव हेच त्याच काम असे. इथ आल्यामुळे त्याच्या ज्ञानात आणि अनुभवात भर पडायची. आपल्याजवळचे ठेवणींतले कपडे घालून हे शेतकरी प्रदर्शनासाठी येत असत. त्याचे स्नायू इतके भरदार आणि दणकट असत की पाहणाऱ्याला वाटायच्च हे कपडे त्याना थोडे लहानच होताहेत. त्याच्या बायका त्याच्याबरोबर येत. त्याच्याकडे पाहिल की त्या खूप कष्ट करत असाव्यात ही गोष्ट चटकन् लक्षात येई. प्रदर्शनात त्या लोणची, मुराबे असले पदार्थ ठेवीत. त्याना या गोष्टीचा फारच अभिमान वाटत असावा अस त्याच्या चेहऱ्यावरून दिसत असे. भाजीपाल्याच्या प्रदर्शनात नॉक्स काउटी गावातला सर्वात मोठा बटाटा ठेवण्यात आला होता. तो पाहण्यासारखा होता.

काही वेळान घोड्याच्या शर्यती सुरू होत. तिकिट काढणाऱ्यासाठी बाकडी टाकून बसण्याची व्यवस्था केलेली असे. आम्ही कुठले तिकीट काढायला! कुपणाच्या जवळ उभे राहून आम्ही ही शर्यत पाहत असू नॉक्स काउटी गावातले उत्तमोत्तम घोडे या शर्यतीत धावत. लाकडी आऱ्या नि उच्च चाके असलेल्या गाड्याना हे घोडे जोडले जात. त्याच्यापैकी काहीं घोडेस्वाराना आम्हीं गेल्सबर्गमध्यें घोड्याना गाडीची सवय करताना पाहिलेल होत. फ्रेड सिकॉर्ड या घोडेस्वाराला मी ओळखल.

शर्यतींच्या या खेळाच 'जगातला उड्या मारीत वेगान धावणारा एकमेव कुत्रा' हे एक खास वैशिष्ट्य होत. या आयरिश कुत्र्याला घेऊन जाताना त्याचा मालक रेडफिल्ड याला मेन स्ट्रीटवर कधी कधी पाहिल्याच मला आठवत. तो काहीं साधासुधा कुत्रा नव्हता याची आम्हाला खात्री होती. इतक्यात रेडफिल्ड आपल्या

घोड्यावर बसून रिंगणात आले. त्याच्याबरोबर तो वेगवान् कुत्रा होता. चारहि पाय वर उचलून उड्या मारीत तो तीरासारखा धावायचा. अर्ध्या मैलाच अंतर त्या कुत्र्यान धावून दाखविल. खर म्हणजे हा कुत्रा काही घोड्याइतका जलद धावत नव्हता परतु जमलेल्या गर्दीने टाळ्याचा कडकडाट करून रेडफिल्ड आणि त्याचा हा कुत्रा याच कौतुक केल. जगात इतका वेगवान् कुत्रा सापडणच शक्य नाहीं अस या प्रेक्षक समुदायाला मनापासून वाटल.

जत्रेतून परतताना एका गवताच्या गाडीत बसून आम्ही घरी आलो. घरी आल्यावर जत्रेशिवाय दुसरा विषयच आमच्या बोलण्यात नव्हता. बोलका फोनोग्राफ, जगातला एकमेव वेगवान् कुत्रा याच्याविषयी आम्हीं घरातल्या माणसाना अनेक गमती सागितल्या. तो कुत्रा मोठा गमतीचा असला पाहिजे एवढाच शेरा बाबानी दिला. एडिसन फोनोग्राफविषयी त्यानी माहिती ऐकली तेव्हा ते म्हणाले, "बॅडच पथक प्रत्यक्ष हजर नसताना बॅड ऐकू येतो म्हणतोस? मोठ आश्चर्य आहे बुवा! हे लोक आणखी काय काय शोधून काढतील कोण जाणे!" हा बोलका फोनोग्राफ नतर जेव्हा आमच्या गावी आला तेव्हा बाबानी तो ऐकण्यासाठी कितीतरी निकेल खर्च केले.

सर्कस आमच्या गावी आली तेव्हा आम्ही भलतेच खूष झालो. भल्या पहाटे चार वाजता आम्ही उठून बसत असू तोंड धुवून पावाचा बकाणा घाईघाईने भरून भरभर चालत आम्ही रेल्वेकारखान्याच्या आवारापाशी हजर व्हायचे. सकाळच्या वेळी या आवारात सर्कशीतल्या जनावराना गाडीतून उतरवण्यात येई. हत्तीच्या ताफ्यापुढे अर्ध्या चौकाच्या अतरावर एक मनुष्य घोड्यावर बसून मोठ्या आवाजात रस्त्यावरच्या लोकाना सागायचा, "हत्ती येत आहेत. आपापले घोडे नीट साभाळा." मग रस्त्याच्या दोन्ही बाजूची माणस आपल्या अवखळ घोड्याना नीट काबूत ठेवायची.

बारनम आणि बेली याच्या सर्कस कपनीपैकी बारनम या माणसाला आम्ही कधी पाहिल नव्हत पण जनावराना निरनिराळे हुकूम देत असताना बेली याना मात्र पाहिल होत. आम्ही सगळीं मुल आपापसात म्हणत असू, "बेली ही मोठी प्रेक्षणीय व्यक्ति आहे. बारनम एवढीच ही व्यक्ति मोठी असली पाहिजे यात सशय नाहीं."

यानतर धावत पळत सकाळची न्याहारी करण्यासाठी आम्ही घरी येत असू. न्याहारी सपली कीं आम्ही सर्कसच्या मैदानावर हजर! आमच नशीब जोरावर

असल कीं आम्हाला सर्कशीतले लोक मजुरीची बारीक सारीक काम सागत. हत्तीना देण्यासाठी पाणी आणायच, तबूत बसणाऱ्या लोकासाठी बाकडी लावून ठेवायची अशी हीं बारीक सारीक काम असत. तीन-चार तास काम केल की त्याच्या मोबदल्यात दुपारच्या खेळाचा पास आम्हाला मिळत असे. पण कधी कधीं अस व्हायच की आम्हाला हे कामहि मिळायच नाही आणि तिकीट घेण्यापुरते पन्नास सेटहि आमच्यापाशी नसायचे. मग आम्ही हळूच तबूच्या कनातीखालून घुसून बाकावर बसलेल्या प्रेक्षकाच्या तगड्यातून सर्कस पाहत असू. एकदा मी असाच तबूच्या कनातीखालून घुसलो. माझ अर्ध शरीर आत गेल होत इतक्यात कुणीतरी आपल्या बळकट हातानी माझी बकोटी धरल्याच मला जाणवल. त्या हातान मला उचलून जवळजवळ बाहेर फेकून दिल. त्यानतर ‘चालता हो’ अस बजावणारा करडा आवाज मी ऐकला!

मैदानाच्या मध्यभागीं सर्कशीचा मुख्य तबू असायचा आणि आजूबाजूच्या लहानलहान तबूत तिकिट लावून इतर खेळ व्हायचे. एका तबूत एक रबरासारखी कातडी असलेला मनुष्य होता. या खेळाला तिकीट नव्हत. एखादा रबर ताणावा तशी तो आपल्या गालाची आणि मानेची चामडी लाबलचक ताणून धरायचा आणि मग फटकन ती सोडून द्यायचा. ती चामडी पुन्हा आपली जागच्याजागी बसायची. तिथच एक दुसरा माणूस होता त्यान आपल्या अगावर पशु, पक्षी, झाड, जहाज इत्यादि विविध आकृति गोंदून घेतल्या होत्या. तिथच एक पौर्वात्य देशातली नृत्य करणारी मुलगी होती. आजूबाजूला जमलेले शेतकरी तिच्याकडे पाहून बावळटपणे हसत आणि ती त्याच्याकडे पाहून मद स्मित करीत असे.

दुसऱ्या एका तबूच्या दाराशी एक पिळदार मिशाचा माणूस उभा असायचा. भोवती गर्दी जमली की मोठ्या आवाजाने विनतीच्या स्वरात तो भाषण करायचा. “येथे जमलेल्या बधू आणि भगिनीनो, ऐका, ऐका! या तबूच्या आत काय आहे? नाना गमती! नाना चमत्कार!! आत येऊन पहाल, तर दिसेल तुम्हाला एक सर्व जगातला ठेंगू माणूस. या ठेंगू माणसाच नाव आहे महाराज, बोर्निओचा रानटी मनुष्य! आणि बाजूलाच उभा आहे जगातला सर्वात उचाड्या मनुष्य. इतका उच माणूस कधीं कुणी पाहिलेला नाहीं. नीट ऐका! अजून सपलेल नाहीं! आफ्रिकेच्या जगलातून—जिथ कुठलाहि माणूस जायला धजत नाहीं अशा जगलातून—आम्हीं एक प्रचड अजगर धरून आणला आहे. अबबब! केवढा मोठा अजगर! पण हे तर काहींच नव्हे. ज्यो ज्यो या मुलाला

पाहा तर खर! तो आहे माणसासारखा, पण गळ्याशपथ! त्याच तोंड आहे कुत्र्याच. समुद्रापासून चाळीस मैल आणि जमिनीपासून चाळीस मैल अशा एका जागीं हा अद्भुत मुलगा जन्मला आहे. सभ्य स्त्रीपुरुषहो! हे सगळे अद्भुत चमत्कार पाहण्याच तिकीट किती? दहा सेंट्स, फक्त दहा सेंट्स! आत्ताच आपली तिकिटं विकत घ्या. कारण मग गर्दी वाढली की निराश होऊन परताव लागेल!!"

माझ्याजवळ दहा सेंट्स आणि एक निकेल (पाच सेंट्स) एवढे पैसे शिल्लक होते. हे अद्भुत चमत्कार पाहण्यासाठी मी दहा सेंट्सच तिकीट विकत घेतल. प्रथम मीं बोर्निओच्या त्या ठेंगू माणसाला पाहिल. त्या गरीब बिचाऱ्या ठेंगू राक्षसाच्या गालावर दाढीचे खुंट अस्ताव्यस्त वाढलेले होते लठ्ठ बाई, ठेंगू माणूस, राक्षसी पुरुष या तीन अद्भुत माणसांना पाहाताना मला अस वाटल की, त्यांना निर्माण करताना परमेश्वराची कुठतरी चूक झाली असली पाहिजे, त्या-शिवाय अशी ही विचित्र माणस कशी बर निर्माण होतील? तो ठेंगू माणूस आणि बायको आपले फोटो त्यावर सही करून दहा सेंटस किंमतीला विकत होते. मी प्रथम त्यांच्याकडे पाहिल तेव्हा मला वाटल होत की, अरेरे, किती दुःखी असतील बर हे जीव! पण हे ठेंगूराव आणि त्याची बायको मोठ्या मजेत हसत होतीं, थट्टामस्करी करीत होती रेल्वेच्या कारखान्यात काम करणारे अनेक कामगार मी पाहिले, परंतु त्यांना जीवनात कधीहि न गवसलेला आनंद या विचित्र ठेंगूला आढळला होता हे मला जाणवल. त्याच जीवन केविलवाण असेल अशी जी माझी समजूत झाली होती ती साफ चुकीची होती हे मला कळून चुकल.

तो उंचाडा राक्षस सुद्धा अगदीं समाधानी वृत्तीचा दिसत होता. एखादा ज्यादा चलाख माणूस त्याच्याजवळ जायचा आणि त्याच्या उंचीबद्दल चेष्टेने त्याला विचारायचा, "काय हो, तिकडे वर हवा बिवा कशी काय?" अशा वेळीं तो उंचाड्या राक्षस एक भुवई उंचावून पुन्हा शांतपणे प्रश्न विचारणाऱ्याकडे बघायचा. असे प्रश्न त्याने अनेकदा ऐकले असले पाहिजेत, त्याच त्याला काहीं विशेष वाटल्याच दिसत नव्हत. नंतर मीं अजगर पाहिला. त्याचीहि मला कीव आली नाही. तो नरभक्षक अजगर वेटोळे करून मजेत झोपला होता. ज्या कुठल्या माणसाला त्यान गिळंकृत करून पचवल होत त्याला तो अजिबात विसरूनहि गेला होता. मीं तीनचार वेळा फिरून या चौघांना पुन्हा पुन्हा पाहिल. बोर्निओच्या त्या ठेंगू माणसाविषयी माझ्या मनात करुणेची भावना निर्माण झाली होती. त्या सगळ्या विचित्र प्राण्यात तोच अगदीं एकाकी असावा अस मला

उगीचच वाटत होत. पौर्वात्य देशातल्या नाच करणाऱ्या त्या पोरीची गणना चमत्कारात करता आली नसती. तिचा रग काळसर होता. दिसायला ती बऱ्यापैकी होती. बहुधा ती जिप्सी जमातींतली असावी.

या चमत्कारिक प्राण्याना पाहात असताना प्रथमदर्शनी माझ मन खिन्न झाल होत. अस होण्याच कारण काय याचा मी विचार करू लागलो तेव्हा मला कळल की, स्वतः मी लाजाळू असल्यामुळे अस झाल होत. माझ्या घरी असताना किवा मित्राबरोबर खेळत असताना मी मोकळेपणान वागत असे, परतु रस्त्यावरून चालताना किवा प्रार्थनेनतर गर्दीत मिसळून चर्चमधून बाहेर पडताना माझ मन शरमेन अर्धमेल झालेल असायच. मला सारख वाटत राहायच की हीं सारी माणस माझ्याकडेच पाहत आहेत, सर्वाच्या नजरा माझ्यावरच खिळून राहिल्या आहेत! खर म्हणजे हा सगळा मूर्खपणाचा प्रकार होता परतु तुम्ही लाजलात, शरमलात की अस होण हे अपरिहार्य असत. जगाच्या नजरा तुमच्या शरिरात खुपसल्या जात आहेत अस उगीचच तुम्हाला वाटत असत. ज्या विचित्र माणसाना मी पाहायला गेलो होतो त्याच्याकडे तर सगळ्याच प्रेक्षकाच्या नजरा खिळलेल्या होत्या. दिवसानुदिवस ते तसेच बसलेले असत आणि लोक त्याच्याकडे टकामका पाहत असत. आपल्यावर लोकाच्या नजरा खिळवून घेण हा त्याच्या धद्याचा अपरिहार्य भाग होता, त्यासाठी त्याना पैसे मिळत असत. सर्व लोकानी आपल्याकडेच अधिक वेळ पाहत राहाव अशी स्पर्धेची भावना त्याच्या मनात असली पाहिजे. तो अजगर आणि बोर्निओचा ठेंगू हे मात्र आपल्याकडे कुणी पाहो अथवा न पाहो अशाच बेफिकीर वृत्तीन तिथ बसले होते.

या तबूतून मी बाहेर पडलो तेव्हा माझ्यापाशी एक निकेल उरला होता. बाहेरच एक माणूस बसला होता. त्याने एका स्टॅडवर वेताच्या छड्या रोवून ठेवल्या होत्या. मृदु स्वरात तो बोलत होता, "माझ्या हातातल्या या तारेच्या कड्याची किमत फक्त दहा सेंट्स. हे कड तुम्ही कुठल्याहि वेताच्या छडीवर फेका. ज्या छडीला ते अडकेल ती छडी तुमची." तिथ मी क्षणभर थाबलो आणि पुढ झालो. दुसरा एक माणूस हसतमुख चेहऱ्याने घोषणा करीत होता, "थडगार लेमन, ताजतवान करणार लेमन, किमत फक्त एक निकेल." तिथूनहि मी पुढ सटकलो. समोरच तिसरा एक माणूस हसत हसत ओरडत होता, "वाटाणे, खरपूस भाजलेले ढगळ वाटाणे." तिथहि मी थाबलो नाहीं. माझ्याजवळचा निकेल तसाच होता!

जरा पुढ गेल्यावर जमिनीवर बैठक मारून बसलेला एक माणूस मला दिसला. याची छाती खगलेली होती. त्याचा चेहरा शात होता. तो जराहि आक्रस्ताळे-पणा करीत नव्हता. तो अनवाणीच बसला होता. तो थोटा होता. विचित्र दिसणारी हाताची खुट त्याच्या खाद्याजवळ लोबत होती. उजव्या पायाच्या दोन बोटात त्यान एक कागद धरला होता. पाय वर उचलून त्यान तो कागद माझ्याजवळ धरला आणि म्हणाला, "हा कागद वाचून पाहा" त्या स्वच्छ हस्ताक्षराचा तो कागद मी वाचून पाहिला. त्या कागदावर लिहिलेल होत, "मी एका कार्डावर सुदर अक्षरात तुमच नाव लिहून देईन. त्याबद्दल तुम्हाला दहा सेट्स द्यावे लागतील." मी त्याला म्हणालो, "माझ्याजवळ दहा सेट्स असते तर खात्रीन मी तुला ते दिले असते. पण माझ्याजवळ हा एकच निकल शिल्लक आहे." मी खिशातला निकल काढून त्याला दाखवला आणि खिसा उलटा सुलटा करून खिशात आणखी पैसे नसल्याची त्याची खात्री पटविली त्याने डावा पाय वर करून तो निकल माझ्याजवळून घेतला. मग त्याने उजव्या पायाच्या पहिल्या दोन बोटात लेखणी धरली, एका कार्डावर 'चार्लस् ए सॅडबर्ग' हे माझ नाव लिहिल आणि उजवा पाय वर उचलून ते कार्ड माझ्या हातात दिल. ते अक्षर मी पाहिल आणि मलताच खूप झाला. इतक्या सुदर अक्षरात लिहिलेल माझ नाव मी यापूर्वी कधीच पाहिलेल नव्हत. मला आनद झालेला पाहून त्या थोट्या माणसाला बर वाटेल अस मला वाटल होत. मी त्याच्याकडे पाहिल. त्याचा चेहरा पूर्वी होता तसाच शात होता. सर्कशीच्या त्या आनदी वातावरणाशी त्याचा तो खिन्न उदास चेहरा सपूर्णतया विसगत दिसत होता. ते पाहून मला अगदी रडू कोसळण्याच्या बेतात आल. मी तुमचा आभारी आहे अस मी कसबसं पुटपुटलो आणि त्याच्याकडे न पाहता धावत सुटलो!

# मित्रांबरोबर भ्रमंती

चेंबर्स रस्त्याच्या पश्चिमेकडून बेरीन रस्त्याच्या उत्तर बाजूपर्यंत घराची रांगच्या-रांग उभी होती. एका कोपऱ्यात एका लाकडी घरावर 'स्वान एच. ऑलसन आणि बंधू' अशी एक पाटी होती. हे दुकान किराणा धान्य आणि हरत-हेच्या वस्तु यांचं होतं. दुकानाचा मालक स्वान गिऱ्हाइकाशी नम्रपणे आणि फार बडबड न करता वागत असे. त्याने आपल्या हनुवटीवर पिंगट रंगाची दाढी वाढविली होती. त्याची दाढी नेहमी व्यवस्थित कापलेली असे, अस्ताव्यस्त वाढलेली ती कधींच दिसत नसे. अठराशे चौपन्न साली आपल्या वयाच्या विसाव्या वर्षी तो स्वीडनहून इथं आला. नॉक्स काउंटी गावातल्या शेतात त्याने कांहीं काळ काम केलं. अठराशे बासष्ट सालीं तो युद्धावरहि गेला. मोठेपणी या युद्धाचा मी अभ्यास केला तेव्हा सैनिक म्हणून लढणं त्यावेळीं किती जिकिरीचं होतं हे मला कळलं. तेव्हा तर मला स्वान ऑलसनविषयीं विशेषच आदर वाटू लागला. पायदळातील शिपाई म्हणून तो या युद्धात लढला जवळजवळ दोन हजार मैलांचा प्रदेश त्यानं पायींच तुडवला. पावसाच्या धारा झोडीत असताना एका खांद्यावर बंदूक आणि दुसऱ्या खांद्यावर कांबळं टाकून घनघोर युद्धात तो सामील झाला. अनेक वेळा धैर्याची शर्थ करून त्यानें नद्यानाले आणि बिकट खंदक ओलांडले. परंतु गिऱ्हाइकांना हसतमुखानें त्यांना हव्या असलेल्या मालाच्या पुड्या बांधून देताना स्वान ऑलसनला तुम्हीं जर पाहिलं असतं, तर या माणसाचं पूर्वजीवन इतकं बिकट होतं असं सांगूनहि तुम्हाला खरं वाटलं नसतं.

त्याच्या भावाचं नांव होतं वुइल्यम. त्याच्याइतक्या देखण्या मिशा आजूबाजूला कुणाच्याच नव्हत्या. दोघेहि भाऊ दुकानाच्या मागच्या खोलीत आपले कोट टांगून ठेवत, शर्टाच्या बाह्या खराब होऊं नयेत म्हणून कोपरापर्यंत काळ्या रंगाच्या स्लीव्ह्ज घालीत आणि हसतमुखानं दुकानात कामाला लागत. इतर व्यापाऱ्या-प्रमाणे तेहि सफरचंदाच्या टोपलीवर घट्ट जाळी बसवीत असत. कधी कधी बाहेरून टेहळणीवर असलेली दोनतीन पोरं ऑलसन बंधू कामात गुंतलेले पाहून

आपल्या साथीदाराला हळूच खूण करीत. मग हा साथीदार टोपलीवरची जाळी हलक्या हाताने सैल करून खिशात आणि हॅटमध्ये भरून घेता येतील तेवढी सफरचंद घेऊन धूम ठोकी.

मी सहासात वर्षाचा असताना ऑल्सनच्या दुकानात एकदा मला चांगलाच धडा मिळाला. आमच्या घरात लागणार सामान आणण्यासाठी आई मला दुकानात पाठवीत असे माझ्याजवळ एक वही देण्यात येई सामान बांधून झाल की बुइल्यम ऑलसन या वहींत मी घेतलेल्या जिनसांची नाव लिहून ठेवीत असे. वही आणि सामान घेऊन मी घरी येई. एकदा मी असाच दुकानात गेलो होतो. सगळ सामान बांधून झाल. इतक्यात मला दुकानात मिठाई ठेवलेली दिसली. माझ्या तोंडाला पाणी सुटल मी बुइल्यमला म्हणालो, "ही मिठाई मला दे." बुइल्यम म्हणाला, "तिची किंमत पांच सेंट्स आहे." मी म्हणालो, "असू दे, वहीत लिहून ठेवा." त्याप्रमाणे बुइल्यमने मला मिठाई दिली आणि वहींत नोंद करून ठेवली. मिठाई खात खातच मी घरीं गेलो. माझ्या तोंडाला लागलेली मिठाई पाहून आईने मला विचारल, "मिठाई कुणी दिली." मी म्हणालो, "दुकानदाराने दिली." आईने चिडून विचारल, "मिठाई विकत घेतलीस तू? पैसे कुठून आणलेस?" मी उत्तरलो, "मी त्याला पैसे वहींत लिहून ठेवायला सांगितले." नंतर मला आईच्या बोलण्यावरून कळल की त्या वहींत घरात लागणाऱ्या सामानाचीच फक्त नोंद करायची होती, आम्हीं वाटेल ते पदार्थ घेऊन डुकरासारख चराव म्हणून काही ती वही केलेली नव्हती. आईने माझ्या पाठीत एक धपाटा घातला आणि ती चिडून म्हणाली, "जा ते घाणेरड तोंड आधी धुवून ये. पुन्हा जर असा गाढवपणा केलास तर अस बडवून काढीन की, जन्मभर याद राहील."

पगाराच्या दिवशी ती वही घेऊन माझा बाप ऑलसनच्या दुकानात जात असे, आणि सगळा हिशेब चुकता करीत असे. हिशेब चुकता केला की बक्षिस म्हणून ऑलसन आम्हा मुलासाठी एक पेपरमिंटाचा पुडा आणि माझ्या बापासाठी पांच सेंट किंमतीचा एक चिरूट देत असे. माझा बाप हा चिरूट फक्त दर रविवारी एक किंवा दोन इंचच ओढीत असे. पुढच्या पगाराचा दिवस येईपर्यंत हा फुकट मिळालेला चिरूट तो ओढायचा. पुढचा पगाराचा दिवस आला की पुन्हा हिशेब चुकता व्हायचा आणि पुन्हा नवा चिरूट त्याला फुकट मिळायचा. माझा बाप स्वतःचे पैसे खर्च करून कधीच धूम्रपान करीत नसे. हा आयता

मिळालेला चिरूट सुद्धा फुकट जाऊ नये एवढ्याचसाठी तो ओढीत असे.

ॲालसनच्या दुकानाशेजारची गल्ली ओलांडली की, फ्रँझ नेलसन याच मटणाच दुकान लागायच. विटाच्या एकमजली घरातच हे दुकान होत फ्रँझच्या दुकानासमोर उभ राहून आम्ही मुल तो खाटीकखान्यात कधी जाणार आहे हे विचारून घेत असू त्याच्याबरोबर खाटीकखान्यात जाऊन जनावर मारताना पाहायला आम्हाला फार गमत वाटायची. हातात भली मोठी सुरी घेऊन डुकराच्या मानेवर तो घाव घालायचा. प्रथम प्रथम डुकराच्या मानेतून रक्त वाहताना पाहिल की आम्हाला कससच व्हायच. पण नतर नतर आम्हाला सवय झाली. पाणी आणणे वगैरे गोष्टीत आम्ही त्याला मदत करायचे. कधी कधी तो आम्हाला थोडस मटण किंवा कलेजी घरी न्यायला द्यायचा. मटण विकत घेऊन झाल्यावर एखाद्या गिऱ्हाइकाने वर एखाद्या कलेजीच्या तुकड्याची मागणी केली तर फ्रँझ एखाद्या कलेजीचा तुकडा हसतमुखान देऊन टाकायचा. त्याचे तो पैसे घेत नसे. फ्रँझ हाताचा सढळ होता.

फ्रँझ नेलसनच दुकान ज्या इमारतीत होत तिथच ज्युलियस शुल्झच चिरूट सिगारेटच दुकान होत त्याच्या दुकानात आणि आसपास आम्ही रेंगाळत बसलेले असायचे. त्याच्या दुकानाच्या दर्शनी खोलीत त्याची शो केस होती. वेगवेगळ्या जातीचे चिरूट, पाईप्स आणि तबाखू या शो केसमध्ये ठेवलेले असत. दुकानाचा मालक शुल्झ फारसा दुकानात नसायचाच सारा वेळ आपल्या दुकानाची जाहिरात करण्यासाठी तो बाहेरच भटकायचा. त्याची उची मध्यम होती. मिशा चागल्या भरघोस होत्या. तपकिरी रगाचा सूट तो घालीत असे. त्याच्या कोटाच्या खिशात तो आपल घड्याळ ठेवायचा. या घड्याळाची सोन्याची साखळी मोठ्या रुबाबात बाहेर रुळत असायची. तो दुकानात यायचा. हिशोबाच्या वह्यावर नजर टाकायचा आणि बॅगेत नमुन्याचा माल भरून घेऊन आपल्या कामासाठी बाहेर पडायचा. तो दुकानातून बाहेर पडताना आम्ही पाचसहा पोर तिथ रेंगाळत असायची. परतु तो आमच्याकडे पहात देखील नसे. त्यान कधी आमची नाव विचारली नाहीत की रिकामटेकडेपणान त्याच्या दुकानात आम्ही रेंगाळतो म्हणून आम्हाला दम भरला नाही. त्याच दुकान हे आमच्या लेखी क्लबची खोलीच होती. त्याला हे माहीत होत, पण त्यान कधीच हरकत घेतली नाही. स्वाभाविकच, आम्हा मुलाना तो आवडायचा.

दर्शनी खोलीला लागून असलेल्या त्याच्या दुकानाच्या मागच्या बाजूच्या खोलीत तर आम्हा पोराचा अड्डाच पडलेला असायचा. निग बोनेनबर्गर या खोलीत बसून काम करायचा. त्याचे कुटुबीय जर्मन भाषा बोलायचे. पण हा मात्र ती भाषा कधी शिकलाच नाही. तो म्हणायचा, " माझा रग काळा असल्यामुळे हे सगळे लोक मला निग म्हणतात. " ससाण्याच्या चोचीसारख त्याच नाक होत. तो काटकुळा होता त्याचा चेहरा फिकट दिसायचा. त्याच्याकडे केव्हाहि पाहिल तरी तो कसला तरी विचार करीत असलेला आढळायचा. तो वर्तमानपत्र वाचीत असे. सिगारेट वळताना आम्हा मुलाना वर्तमानपत्रात येणारी माहिती तो सागायचा आणि कुणाच कुठ चुकत आहे, शहराच्या कारभाराच धोरण कस असायला हव आणि कस नको यावर मल्लीनाथी करायचा कुठलीहि गोष्ट आवेशान तो सागू लागला की, ' मी तुम्हाला नक्की सागतो ' अस तो ठासून म्हणायचा. ही त्याची बोलण्याची विशिष्ट लकब आमच्या चागलीच परिचयाची झाली होती. कुठल्याहि विषयावर तो बोलला तरी त्याची मत ठाशीव असायची. त्याच्या मतप्रदर्शनातला हा ठाशीवपणा आम्हाला आवडायचा. निगला एकसारखी खोकल्याची उबळ यायची. शेवटी या खोकल्याच पर्यवसान क्षयरोगात झाल आणि त्यातच निग मेला. त्याच्या प्रेतयात्रेला जाऊन आलेला एक मुलगा म्हणाला, " शवपेटिकेत त्याच प्रेत मी पाहिल. मला अस वाटल की, त्याला नुकतीच झोप लागलेली आहे—इतका तो नेहमीसारखा दिसत होता. त्याच्याकडे पाहून मला रडू आवरेना. "

कामाची वेळ आणि खेळण्याची वेळ याच्या मधल्या काळात सगळी पोर त्या सिगारेटच्या दुकानात पडलेली असायची. दुकान जेव्हा बद असायच तेव्हा दुकानाच्या समोर आम्ही उभे राहून गप्पा मारत असू किवा गाणी गात असू. मजबूत हाडापेराचा जॉन् हट ग्रेन बॉयर येथल्या झाडूच्या कारखान्यात काम करायचा जॉन केरीगन हा गुबऱ्या गालाचा, तेजस्वी डोळ्याचा आयरिश मुलगा आपल्या बापाला पाण्याचे पाइप बसवण्याच्या कामात मदत करायचा. आणखी एक विलीस कॉर्कीन्स नावाचा मुलगा होता. ही आमची चौकडी मोठमोठ्यान गाणी गायची. आम्हाला गाण झकास जमत, आणि आल फील्डच कलापथक गावात येईल तेव्हा त्याला आपला कार्यक्रम ऐकवला पाहिजे असं आम्ही म्हणायचे. विलीस कधी कधी आपल बॅजो वाद्य घेऊन यायचा. मग खूपच मजा यायची.

एके दिवशी सकाळीं नऊ वाजता मी शुल्झच्या दुकानात गेलो. तो तिथे बरीच गडबड दिसली. आधल्याच रात्री कुणीतरी चोराने दुकानाची मागल्या बाजूची खिडकी उघडून पैशाची पेटी लपास केली होती. त्या पेटीत फार तर आठदहा डॉलर असतील. रात्रभर जोराचा पाऊस कोसळत होता रस्त्यावर या जोराच्या पावसामुळे फारशी माणसं नव्हती, आणि जी काही थोडी होती ती पावसाचा मार चुकवून आपल्या घरी जाण्याच्या घाईत होती. दुकानाकडे पाहायला रस्त्यावरच्या कुणाच माणसाला वेळ नव्हता त्या चोरट्याने या परिस्थितीचा नेमका फायदा घेतला असला पाहिजे. आम्हीं बऱ्याच रहस्यकथा वाचल्या होत्या. चोरीच्या जागेचे नीट निरीक्षण करून चोरीचे धागेदोरे उलगडायचे असं मी ठरवल प्रथम चोराची एखादी वस्तु चुकून तिथ राहिली गेली आहे किंवा काय हे मी पाहू लागलो पण तशी एकहि वस्तु सापडली नाही. खिडकीतून उतरून तो चोर पैशाच्या पेटीकडे चालत आला होता. चिखलाने बरबटलेल्या त्याच्या बुटाचे ठसे फरशीवर उमटले होते. प्रथम प्रथम हे ठसे चांगले दाट दिसत होते. परंतु पैशाच्या पेटीजवळ मात्र ते नाममात्र होते. याच्यापेक्षा अधिक काहीच मला आढळल नाहीं की रहस्य उलगडणारा एकहि धागा मला सापडला नाही.

इतक्यात शांत डोळ्याचा, बुटकेलासा, भरघोस काळ्या मिशाचा एक मनुष्य दुकानात आला. त्यान निळा कोट घातला होता, आणि त्याच्या कोटावर एक तारा दिसत होता. आम्ही त्याला ओळखल त्या माणसाच नाव होत मार्शल हिनमन तो पोलीसप्रमुख होता. त्याच्याबरोबर उत्कृष्ट गणवेश घातलेला एक पोलीस होता. मार्शल हिनमनच नाव आम्ही अनेकदा ऐकल होत परंतु एखाद्या गुन्ह्याचा तलास लावण्यासाठी प्रत्यक्ष काम करताना त्याला पाहण्याची आम्हाला कधीच संधि मिळाली नव्हती. मार्शल हिनमनच्या सर्व हालचालींकडे आम्ही कुतूहलान पाहू लागलो मार्शल हिनमनला दुकानात आमच्याप्रमाणेच कसलेहि धागेदोरे सापडले नाहींत. मग आपल्याबरोबरच्या पोलिसाना घेऊन तो दुकानाच्या पिछाडीच्या रस्त्यावर गेला. तिथ चिखलात त्या चोराच्या बुटाचे ठसे उमटलेले होते. हे ठसे मार्शल हिनमनने बारकाईने न्याहाळले त्याचा चेहरा विचारात गर्क झाल्यासारखा दिसला. मी माझ्या मनाशीच म्हणालो, "ह, आता आपल्याला डिटेक्टिव्हच खर कौशल्य पाहायला सापडणार." मग मार्शल हिनमनने कार्डबोर्ड मागितला. दुकानात कार्डबोर्ड नव्हता. मात्र बूट ठेवायची एक कार्डबोर्डची पेटी मिळाली. ती फाडून त्याने तिचे तुकडे केले, आणि चिखलात उमटलेल्या

बुटाच्या ठशाचं माप घेऊन त्या आकाराचे ते त्यानं कापले. अत्यंत सयपणे, धीरगंभीरपणे, त्यानं त्या चोराच्या डाव्या आणि उजव्या दोन्ही बुटाच्या मापाचे कार्डबोर्डचे तुकडे तयार केले. हे सगळ झाल्यानंतर तो पुन्हा दुकानात आला. आपल्याला कोणते धागेदोरे सापडले याविषयी तो काहींच बोलला नाही. मला मोठा प्रश्न पडला की बुटाची माप घेऊन तो करणार होता तरी काय ? मेन स्ट्रीटवर शेकडो माणस येत जात होती त्या प्रत्येकाचे बूट पाहून हातातल्या मापाशी तो ते ताडून पाहणार होता की काय ? पण हे तर केवळ अशक्य होत आणि दुसर अस की, त्याच मापाचे बूट अनेक लोकाच्या पायात असण्याचीहि शक्यता होती ! कसहि असल तरी मार्शल हिनमन चोराला पकडून देईल अशी आम्हाला खात्री वाटत होती. जाताना तो म्हणाला, “फारस महत्त्वाच काही आम्हाला सापडलेल नाहीं, पण तरीहि आम्ही प्रयत्न करून बघू ” त्यानंतर अनेक वर्ष गेली, पण शुल्झच्या दुकानात चोरी करणारा चोर कधीच सापडला नाहीं ! !

शुल्झच्या दुकानाच्या बाजला एक चाभाराच दुकान होत. या दुकानातहि आमचा तळ असायचा. आपली हत्यारं घेऊन जॉन स्विडनबर्ग इथे जोडे तयार करण्याच काम करायचा. बुटाचे सोल तयार करण्यासाठी तो प्रथम चामडं कापून घ्यायचा. मग या चामड्याला हवी तिथे भोक पाडून ठेवायचा. त्यानंतर तो थोडेसे खिळे तोंडात भरून घ्यायचा आणि एकेक खिळा तोंडातून बाहेर काढून आधी पाडलेल्या भोकात हातातल्या हातोडीनं ठोकून बसवायचा फाटका बूट शिवून घ्यायला एखाद गिऱ्हाईक आल, तर चागला जाड दोरा घेऊन जॉन ते शिवून द्यायचा. कधी कधी तो चामड्याचा नवा तुकडा घेऊन फाटलेल्या जागी ठिगळ मारायचा. जॉन आपल काम मनःपूर्वक करायचा सकाळी आठ वाजल्यापासून सध्याकाळी सहा वाजेपर्यंत तो सारखा काम करीत असे. कोळशाची शेगडी असलेली त्याची छोटी खोली ऊबदार असायची. त्यामुळे हिवाळ्यात आम्हीं त्याच्या दुकानात अनेक वेळा सापडायचे.

तो चागलाच उचापुरा होता. त्याचे खादे वाकलेले होते. त्याचा चेहरा शात आणि सौजन्यपूर्ण दिसत असे तो आवेशानं बोलू लागला की त्याचे डोळे झळाळून उठत आणि ओठ थरथर कापू लागत. जॉनच्या बोलण्यात ठराविकच विषय असत. कधीहि या, त्या विषयावरच त्याच प्रवचन सुरू असायच. तोंडात खिळे भरलेले असत तेव्हाच फक्त तो बोलत नसे जॉन हा कट्टर धार्मिक होता. धार्मिकतेच त्याच हे वेड त्याच्या बोलण्यावागण्यात ठळकपणे दिसत असे. थरथरणाऱ्या

ओठानी तो आम्हाला सांगायचा, "प्रभु येशू माझ्या हृदयात सदैव असतो. मी जेथे जातो तेथे तो माझा सांगाती होतो. मी रात्रंदिवस मनोभावे त्याची आळवणी करतो. येशू आपल्या हृदयात वास करून राहतो हा साक्षात्कार जर तुम्हाला झाला तर, बाळांनो, तुमचं पाऊल कधीहि वाकडं पडणार नाही. मला त्यानं उद्धरलं आहे. तुम्हालाहि तो उद्धरील. या साऱ्या विश्वाचा तो प्रकाश आहे. मी त्याच्यावर विश्वासून राहतो. तो माझा एकमेव आधार आहे अशी माझी मनोमन श्रद्धा आहे. त्यामुळे मला कशाचंहि भय वाटत नाही. संकटाचा अंधार पाहता पाहता वितळून जातो. मुलांनो, तुम्ही त्याची आळवणी करायला शिका. त्याच्या पवित्र चरणापुढं गुडघे टेकून तुम्ही त्याची प्रार्थना करा, त्याच्या जवळ क्षमेची याचना करा. मला तुझ्या कुशीत घे असं त्याला विनवून सांगा."
जॉनची या विषयावर बोलण्याची एक खास शैली होती. तो जे काही बोलत असे ते अंतरीच्या जिव्हाळ्याने बोलत असे. बोलता बोलता भावनेच्या भरात आला की त्याचे डोळे तळपू लागत, आवेगामुळे त्याचे ओठ थरथरू लागत. तो म्हणे, "या जगात फार काळ काही आपल्याला राहायचं नाही! प्रभु येशू माझी परत वाट पाहत आहे. त्याची माझी भेट झाली की माझ्या जीवनाचं सार्थक झालं."
जॉन नियमितपणे रोता चर्चला तो नियमितपणे जात असे. खोकल्याच्या उबळीमुळं तो हैराण व्हायचा. निगप्रमाणे तोहि शेवटी क्षयानेच मेला. निगला जॉनप्रमाणेच मरणाचं मुळीच भय वाटत नव्हतं. परंतु मरणानंतर शाश्वत सुखाच्या लोकात आपला प्रवेश होणार आहे असा अदम्य विश्वास जॉनला वाटत असे. जे सुखसमाधान इहलोकी मानव प्राण्याला कधीहि लाभणं शक्य नाही ते प्रभुपदी मिळणार आहे अशी त्याची खात्री होती.

# बारा दोस्तांचें टोळकें

एका रविवारीं दुपारीं ऑल्सनच्या दुकानासमोर आम्ही पोरें जमलों होतों. आमचें वय तेव्हां सोळासतराच्या आसपास होतें. आमचा सगळ्यांचा एक ग्रुप फोटो काढून घ्यायचा असें आमच्या टोळक्यानें ठरवलें होतें. आमचें टोळकें बारा मुलांचें होतें. आमच्यापैकीं एकजण म्हणाला, “आपली बारांची टोळी कशी दिसते तें आपण एकदां जगाला दाखवूं.” तेव्हांपासून ‘बारांची टोळी’ असें आमच्या टोळक्याचें आम्हीं नामकरणहि करून टाकलें. बारांची टोळी या नांवांतच अशी कांहीं जादू होती कीं आम्हांला वाटायचें, कसलेल्या गुंडांची, दरोडेखोरांचीच ही टोळी आहे. पण आमच्या या टोळक्यानें कधीं दुसऱ्या टोळीशीं किंवा आपापसांतहि मारामारी केली नाहीं. आमच्या टोळक्यापैकीं सातजण स्वीडिश कुटुंबांतले होते. चौघेजण नेटिव्ह अमेरिकन होते. आणि एकजण फ्रेंच होता.

खरें म्हणजे एड रोझेनबर्ग या मुलाचा अंतर्भाव आमच्या टोळक्यांत करायला हवा होता. आमच्या बारांच्या टोळीनेंच त्याला एक टोपण नांव बहाल केलें होतें. तो हाडकुळा आणि बुटकेलासा होता. पण वृत्तीनें तो सदा प्रसन्न असायचा. त्याची विनोदबुद्धि मोठी तरतरीत होती. आम्ही त्याला ‘मफा डी ग्रिट एंडि अम्पा डी ग्रट’ असें टोपणनांव बहाल केलें होतें. याच टोपणनांवानें आम्ही त्याला हाक मारीत असूं. एड रोझेनबर्ग हें त्याचें नांव आम्ही कधीं उच्चारल्याचें आम्हांला आठवत नाहीं. कांहीं दिवसांनीं मोलीन येथें एका कारखान्यांत त्याला नोकरी लागली. तो गेला तेव्हां आम्हांला चुकल्याचुकल्यासारखें वाटूं लागलें. त्या कारखान्यांतले लोक त्याला त्याच्या खऱ्या नांवानें हाक मारीत असत!

चार्ल्स उर्फ फ्रेंची ज्यूनो हा माझा जीवश्चकंठश्च मित्र होता. त्याचा बाप हाडापेरानें मजबूत होता, त्यानें दाढी वाढविली होती. चित्रांतल्या व्हिक्टर ह्यूगोसारखा तो दिसायचा. फ्रेंचीचा चेहरा आणि डोक्याचा आकार नेपोलियनसारखा होता. केसांची बट तो कपाळावर आणायचा. कोटाच्या खिशांत उजवा हात घालायचा आणि आम्हांला विचारायचा, “मी नेपोलियन नाहीं तर मी कोण आहे?”

ऑरोस येथल्या एका स्टोव्हच्या कारखान्यात त्याला नोकरी मिळाली होती. काहीं दिवसानी तो कारखाना बद पडला. आणि फ्रेंची गेल्सबर्ग येथे पुन्हा आपल्या बापाच्या घरी आला. गेल्सबर्ग येथे त्याने अनेक बारीकसारीक नोकऱ्या केल्या. पण त्या एकाहि नोकरीत त्याच मन नव्हत. काहीं दिवसानी बद पडलेला तो स्टोव्हचा कारखाना पुन्हा सुरू झाला. फ्रेंचीला तिथच पुन्हा काम मिळाल. गाण्याची आणि वाचनाची मला फार आवड होती फ्रेंचीला हे दोन्ही छद नव्हते. परतु गप्पा मारायला फ्रेंची हा मोठा छान मुलगा होता आणि त्यामुळ त्याच्या सहवासातला वेळ मोठा मजेत जायचा मेन स्ट्रीटवरून भटकत भटकत आम्ही जात असू वाटेत अर्धा डझन 'क्रीम पफ्स' घेऊन खात खात आम्ही भटकत असू.

उन्हाळ्यातल्या त्या रविवारची दुपार आमच 'बाराच टोळक' कधीच विसरणार नाही गुटझच्या दुकानासमोर आम्ही जमलो होतो. कडाक्याच ऊन पडल होत. एखाद्या भट्टीत पडल्यासारख आम्हाला वाटू लागल. आता कुठतरी पोहायला गेल पाहिजे असा आमच्यापैकी एकान बूट काढला. जवळच तीस यार्ड लाब आणि वीस यार्ड रुद एवढ एक तळ होत तळ्यात आमच्या खाद्यापर्यंत येईल एवढच पाणी होत तळाशी चिखल, विटाचे तुकडे, काचा असा सर्व तऱ्हेचा कचरा पडलेला असायचा. खर म्हणजे हे तळ आम्हाला फारस आवडत नसे. पण ऊन तर फारच तापल होत, आणि दूरवरच्या स्वच्छ तळ्यात पोहायला जाण्याइतका दम आमच्यान निघण शक्य नव्हत आणि म्हणून याच तळ्यात डुबायच आमच्या टोळक्यान ठरवल होत. सोळासतरा वर्षांची आम्ही पोर नागडी उघडी या तळ्यात डुबू लागलो, जलोप करू लागलो, की आजूबाजूला राहणाऱ्या सभ्य लोकाची मार्था भडकायची. हुशहुश करीत आम्ही तळ्याजवळ जाऊन पोचलो काठाजवळच्या गवतावर अगातले कपडे काढून बेफिकिरीन भिरकावले, आणि आम्ही धडाधड पाण्यात उड्या ठोकल्या. एड रोझेनबर्ग तेवढा पाण्यात उतरायचा होता. आम्ही मोठ्या मजेत पाण्यात डुबत होतो. इतक्यात आमच्यापैकी एकजण भेदरल्या स्वरान ओरडला, "अरे पाहा, तो बघ समोरून विली येतो आहे!" पाण्यावर डोकी काढून भेदरल्या नजरेन आम्ही तळ्यासमोरच्या रस्त्याकडे पाहिल. पाहतो तर काय, पोलिसाची मोटार आमच्या रोखान येत होती. फ्रॅंक पीटरसन, इतर पोलीस आणि त्याचा मुख्य विली याना पाहताच आमची घाबरगुडी उडाली. इतक्यात विली मोटारीतून खाली उतरला.

उजवा हात उचावून तो मोठ्यान ओरडला, "आहात तसे राहा, खबरदार हलाल तर, तुम्हाला अटक करण्यात आली आहे." बिली तसाच चालत थोडा पुढे आला आणि पुन्हा मोठ्यान ओरडून म्हणाला, "या तलावात पोहण्याची कायद्यान बंदी आहे हे तुम्हाला माहीत नाही काय? तुम्ही कायदा मोडलेला आहे निमूटपणे मोटारीत बसा आणि चला पोलीस चौकीवर" तलावाच्या काठाशी टाकलले आमचे कपडे आम्ही कसेबसे उचलून घेतले. मोटारीतच आम्ही ते कपडे आमच्या अंगावर चढवले सगळी मुलं मोटारीत होती. एड रोझेनबर्ग तेवढा नव्हता पोलीस दिसताच त्यानं रेल्वेरस्त्यानं धूम ठोकली होती

पोलिसाच्या मोटारीला छप्पर नव्हत आणि बसण्यासाठी मोटारीत लांबलचक बाकडी होती. एकमेकाच्या तोंडाकडे पाहत आम्ही मोटारीत बसलो होतो आम्ही मनातून फारच घाबरलो होतो. आता रस्त्यावर पोलिसानी अटक केलेल्या या अवस्थेत अनेक ओळखीचे लोक आम्हाला पाहणार. याचाच अर्थ आमची अब्रू धुळीला मिळणार! पोलीस इथून आम्हाला चौकीवर घेऊन जाणार आणि कोठडीत ठेवणार. मग ते आमच्यावर खटला भरणार. कोर्टात आमचा गुन्हा शाबीत झाल्यावर न्यायाधीश आम्हाला काय शिक्षा देईल देव जाणे! कायदा कठोर असतो तो कोणाचीच गय करीत नाही मोटारीत माझ्यासमोर माझा धाकटा भाऊ मार्ट बसला होता. सॅडबर्ग कुटुंबात पोलिसानी अटक केलेले असे आम्ही पहिलेच होतो. माझ्याबरोबरची इतर मुलंही प्रतिष्ठित कुटुंबातली होती. आणि हाय रे दैवा! पोलिसाच्या मोटारीतून आज आमची अशी ही वरात निघाली होती मेन स्ट्रीटवरून आमची मोटार गेली. नशीब आमच की रस्त्यावर कुणी ओळखीच माणूस भेटल नाही चौकीवर नेऊन पोलिसानी आम्हाला लॉकअपमध्ये ठेवल. आम्हाला विभागून दोन कोठड्यात ठेवण्यात आल. दोन्ही कोठड्यात आधल्या रात्री पोलिसानी धरून आणलेले दारुडे होते. नुकते कुठ ते शुद्धीवर येऊ लागले होते. कोठडीत बसण्यासाठी खुर्च्या नव्हत्या एकं उभ तरी राहायच किंवा बसायचच असल तर जमिनीवर फतकल मारून बसायच दुपारी तीन वाजता त्यानी आम्हाला लॉकअपमध्ये आणून ठेवल. सात वाजता त्यानी आम्हाला सोडून दिल आणि सांगितल की, "आता घरी जा आणि उद्या सकाळी दहा वाजता कोर्टात हॉलकॉब ह्या न्यायाधीशासमोर हजर राहा" घरी परतताना वाटेवर भेदरलेल्या आवाजात उद्या कोर्टात हॉलकॉब हा न्यायाधीश आम्हाला कसली शिक्षा देईल याची आम्ही चर्चा करीत होतो.

आमच्यापकी काहींजणाना अस वाटत होत की न्यायाधीश काहीं आम्हाला तुरुगात पाठवणार नाही. फार तर दोन डॉलर दड आणि नुकसानभरपाई म्हणून आणखी काहीं पैसे एवढीच आम्हाला शिक्षा होईल. आम्ही वर्तमानपत्रात वाचल होत की टॉम बेकम या माणसाला दारू पिऊन रस्त्यावर गोंधळ माजविल्याबद्दल जस्टिस हॉलकॉबने एवढीच शिक्षा दिली होती. बेकमला दडाखेरीज नुकसान-भरपाई म्हणून पाच डॉलर्स अधिक भरावे लागले होते. मी फारतर दड कसाबसा भरू शकलो असतो पण नुकसानभरपाईचे पाच डॉलर्स कुठून आणायचे हा प्रश्न होता. 'नुकसानभरपाईचे पाच डॉलर्स जर तुम्ही आम्हाला दिले नाहींत तर ऑगस्ट मडबगचे मुलगे तुरुगात जातील' अस जर आम्ही आमच्या बापाला सागितल असत तर तो काय म्हणाला असता याचा आम्हाला अदाज करता येईना

दुसरे दिवशी सकाळी जस्टिस हॉलकॉब याच्यापुढे आम्हाला कोर्टात उभ करण्यात आल आम्ही आमचा गुन्हा कबूल केला. जस्टिस हॉलकॉबने आमच्या एखाद्या नातेवाईकाप्रमाणे समजावणीच्या स्वरात आम्हाला सागितल की त्या तळयात पोहणे हा कायद्याच्या दृष्टीने गुन्हा होता आणि कायदा मोडण हे सभ्यतेच लक्षण नव्हे आम्ही पुन्हा त्या तळयात पोहायला जाणार नाही अस वचन त्याने आमच्याकडून घेतल आणि आम्हाला कसलीहि शिक्षा न करता सोडून दिल.

या मुक्ततेमुळे आमच्या छातीवरच प्रचड ओझ उतरल होत. वाटेवर झाल्या गोष्टीची आम्ही चर्चा केली. पोलिसानी आम्हाला पकडून लॉकअपमध्ये ठेवायला नको होत याविषयी आमच सर्वाच एकमत झाल. त्या तळयात पोहण्याला कायद्याने बदी केलेली आहे हे आम्हाला खरोखरीच ठाऊक नव्हत. कायद्यान तिथ पोहण्याला बदी करायचीच होती, तर तशी पाटी त्या तळयाच्या काठीं लावण त्यार म्हणजे पोलिसाच कर्तव्य होत. कायद्यान बदी येण्यापूर्वी कित्येक वर्षे आम्ही त्या तळयात पोहत होतो. पोलिसानी आम्हाला न पकडता, इथ पोहण्याला कायद्यान मनाई केलेली आहे अस नुसत जरी आम्हाला सागितल असत तरी आम्ही तिथे पुन्हा पोहायला येणार नाहीं अस वचन दिल असत. या पोलिसाना झालय तरी काय? हे असे चमत्कारिक का वागतात? असा आम्हाला सगळ्यानाच प्रश्न पडला

आम्ही घरी आलो. माझे आईबाप झाल्या गोष्टीबद्दल आमचा खरपूस समाचार घेतील अस आम्हाला वाटल होत. पण तस काहीच झाल नाही. अत्यत समजसपणे त्यानी या गोष्टीकडे पाहिल. आम्हाला पकडण्यात पोलिसानी मूर्खपणा

केला होता अस त्याचहि मत झाल. फ्रॅक पीटरसन हा पोलीस आमच्याच घरात दुसऱ्या मजल्यावरच्या काही खोल्या भाड्यान घेऊन राहत होता. माझी खात्री आहे की पोलीसप्रमुख विली हा जर पीटरसनबरोबर नसता, तर पीटरसनन आम्हा मुलाना मुळींच अटक केली नसती. पुन्हा तिथ न पोहण्याबद्दल आम्हाला समज देऊन त्यान सोडून दिल असत. पोलिसानी एखाद्या प्रौढ माणसाला आम्ही तुला अटक केली आहे अस जर सागितल तर तो किंचित् बावरतो, परतु तुमच वय जर सोळा वर्षाच असेल आणि पूर्वी तुम्हाला कसलीहि शिक्षा झालेली नसेल तर 'तुम्हाला अटक केलेली आहे' या पोलिसाच्या वाक्यासरशी भयान तुमची बोबडी वळल्याखेरीज राहणार नाही. आमचहि तसच झाल.

तळ्यात पोहण्यात आमच्या हातून कसलाहि दोष घडला होता अस मला अजूनहि वाटत नव्हत. माझी खात्री आहे की या बाबतीत माझ आणि मफा-डी-ग्रिट-एडि-अप्पाच एकमत होईल! पोलिसाची गाडी दिसताच कपडे सावरीत तो धूम पळाला होता. त्याचे बूट, मोजे आणि हॅट तिथच तळ्याच्या काठी पडलेली होती. आपण पळाल्यावर पोलीस आपला पाठलाग करून आपल्याला पकडतील अस त्याला वाटल होत. परतु पोलिसाच्या लेखी हा गुन्हा फारसा महत्त्वाचा नसल्यामुळ त्यानी मफा-डी-ग्रिटच्या पळून जाण्याकडे दुर्लक्ष केल होत. पोलिसाची मोटार दृष्टीआड गेली तेव्हा मफा डी-ग्रिट लपत छपत पुन्हा तळ्याच्या काठी आला आणि आपल्या राहिलेल्या वस्तु गोळा करून घरी गला. एका बाबतीत आम्हीं सर्वानी त्याला प्रशस्तिपत्र दिल: यावेळी मफा-डी-ग्रिटन आमच्यापेक्षा अधिक प्रसगावधान आणि अधिक चपळपणा दाखवला होता

आमच्यापेक्षा चारपाच वर्षांनी वडील असलेली मुल महिन्यातून एकदा एक हॉल भाड्यान घेऊन तिथ नृत्य करीत असत. साथीला ते दोन फिडलवादकांहि पैसे देऊन आणीत. आपल्या या नृत्याच्या क्लबाला त्यानी 'द गोल्डन रॉड क्लब' अस नाव दिल होत. आमच्या 'बाराच्या टोळक्यान' असाच एक नृत्याचा क्लब स्थापन करायच ठरवल. गोल्डन रॉड क्लबची आम्ही अगदी सहज बरोबरी करू शकू अस आम्हाला वाटत होत. आम्हीं सुद्धा एक हॉल भाड्याने घेतला. तसच दोन फिडलवादकाशीहि साथीचा करार केला. ज्या रात्री आम्ही नृत्य करू त्या रात्रीचा आम्हाला साधारण पचवीस सेंट्सपर्यंत खर्च येत असे. आमच्या क्लबच नाव आम्ही 'मॉनर्क क्लब' असं ठेवल. फिडलवादक नृत्यसगीत वाजवीत आणि त्या सगीतावर आम्ही वॉल्झ्, टू स्टेप, पोल्का आणि सॉटीश इत्यादि विविध प्रकारांच

नृत्य करीत असू. हॅन्सन सिस्टर्स, ॲली हार्श बार्गर, गर्टी जेन्ट या आणि इतर देखण्या मुली आमच्याबरोबर नृत्य करायला येत. रात्रीचे अकरा वाजले की फिडलवादक 'होम स्वीट होम' हे आर्त गीत वाजवू लागत.

फॅटी वेकमन, स्किनी सीली आणि मी—आम्हाला बेसबॉल खेळण्याचे अगदी वेड लागलेले होते—वसंत ऋतूत आम्ही खेळायला सुरुवात करीत असू, आणि हिवाळा येऊन बर्फ पडायला लागेपर्यंत आमच्या खेळण्याचा मोसम संपत नसे. सकाळपासून संध्याकाळपर्यंत आम्ही खेळत असू. संध्याकाळी सगळी मुले घरी परतली तरी आमचा खेळ चालत असे सगळ्यात शेवटी आम्ही मैदाना-वरून परतत असू. फॅटी वेकमनचे गाल थोडे फुगीर असले तरी तो काही लठ्ठया नव्हता. स्किनी सीली बारीक आणि काटक होता तो कृश मुळीच नव्हता. मला ते गमतीने 'कली' म्हणून हाक मारायचे. मला वाटते, चार्ली या माझ्या नावात त्यांनी त्यांच्या दृष्टीने केलेली ही सुधारणा होती. फॅटी वेकमनची आई विधवा होती. सप्टेंबर महिन्यात एका गाडीत कोबीचे गड्डे भरून फॅटी ते विकण्यासाठी घरोघर जात असे. एका गड्डयाला पाच सेंट याप्रमाणे तो ते विकी जेवण्याच्या पूर्वी एक तास अगोदर तो मैदानावर येई तेव्हा त्याचा खिसा नाण्यांनी भरलेला असायचा. स्किनी सीली हा थिएटरात काम करणाऱ्या हर्की जॉन्सन आणि कली रोझ या सुतारांना मदत करायचा. या सुतारांनी त्याला या धंद्याचे चांगले शिक्षण दिले. त्यामुळेच नंतर स्किनीला शिकागोच्या थिएटरमध्ये चांगली नोकरी मिळू शकली

कालांतराने वेगवेगळ्या स्वभावाच्या, भिन्नभिन्न आवडीनिवडी असलेल्या मुलांशी माझ्या ओळखी झाल्या. विलीस कॉकिन्स हा अशा मुलांपैकी एक. त्याचा बाप ट्रॅम ड्रायव्हर होता. दयाळू स्वभावाचा, सदा हसतमुख असलेला असा तो माणूस होता. विलीसची आई अतिशय देखणी होती. माझी आणि विलिसची ओळख झाल्यानंतर एका वर्षानेच ती क्षयाने वारली. विलीस हा तिचा एकुलता मुलगा. विलीसच्या घराण्यात गाण्याची परंपरा होती. विलीसला बँजो वाजविता येत असे. बँजोच्या तारा त्याने मला दाखविल्या. बँजो वाजवीत गाणे कसे म्हणायचे हेहि त्याने मला सांगितले

मला वाद्याची आवड होती. प्रथम प्रथम कळकाची मुरली, बँजो ही वाद्ये मी घरीच तयार करीत असे. ही वाद्ये मी वाजविण्याचा प्रयत्न करी, पण अर्थातच त्यावर फारसे काही वाजविता येणे शक्य होत नसे. सिगारेटच्या एका रिकाम्या

खोक्याचा मी घरीच बँजो तयार केला होता. मीच त्याला तारा लावल्या आणि खुट्या बसविल्या. पण बँजो नामक या खोक्यातून नावाला देखील चांगला स्वर निघेना. हळू हळू स्वस्त किमतीची वाद्य बाजारात मिळू लागली. गबिनरकडे दोन डॉलर किमतीचा बजो मिळू लागला. हा बँजो मोठा झकास होता. विलीसकडे मी त्यांच्यावर तारा छेडायला शिकला. फर्गीस स्ट्रीटवर मिसेस श्वार्ट्झ राहायची. तिला पचवीस सेंटस शिकवणीची फी देऊन मी तिच्याकडे बजोचे पहिले तीन धडे शिकलो. खर म्हणजे तिची शिकवणी चालू ठेवण्याची माझी इच्छा होती. परतु महीन्या सार्वत्रिक लाटेत शिकवणी ठेवण मला परवडण्यासारख नव्हत

विलीसचा आवाज मधुर होता. तो आपल्या गाण्यात विलक्षण गोडवा भरीत असे. त्याचा चेहरा घोड्यासारखा दिसायचा. तो लाबनाक्या होता. विनोदबुद्धीच जन्मजात देण त्याला लाभलेल होत. त्याच्या या गुणामुळ तो कुठहि गेला तरी त्याच हार्दिक स्वागत व्हायच. कुणीतरी त्याला 'बोहक' हे टोपण नाव दिल आणि तेच त्याला चिकटल.

जवळजवळ चार मैलाच्या अतरावर बूथफार्म ही जागा होती. तिथ एक तळ होत. या तळयात आमच्या गळ्याएवढ पाणी होत. आजबाजूच्या शेतात ओट, गहू, याची पिक गर्द झुलत असायची. मी आणि बोहक उन्हाळयाच्या दिवसात दहाबारा वेळा तरी बूथफार्मवरच्या तळयात पोहायला जात असू. या तळयात मनसोक्त डुबून झाल की मी आणि बोहक गप्पागोष्टी करत घरी परत येत असू. घरी परत येण्यासाठी लोम्बार्ड कॉलेजच्या आवारातून एक जवळचा रस्ता होता. तिथ एक थडगार पाण्याचा नळ होता. या नळाच पाणी घटाघट प्यायल्यानतर त्या उन्हाळयाच्या दिवसात अगदी ताजतवान वाटायच. ही जवळची वाट नको असली, तर ब्रकस्ट्रीटवरून दुसरी वाट होती. या वाटेवर जॉन ग्रचची सफरचदाची बाग होती. इथून येताना आम्ही झाडावरची चागली पिकलेली सफरचद लपास करीत असू. अगातला शर्ट काढून त्यात मावतील तेवढी सफरचद घ्यायची आणि तो शर्ट पट्टयासारखा कमरेला घट्ट बाधायचा. पोहून झाल्यावर थड पाणी पिण्यासाठी जवळच्या वाटेन जायच की सफरचद लपास करण्यासाठी लाबच्या वाटेन निघायच याच्यावर आम्ही चर्चा करीत असू

काही काळानतर कॉकिन्स कुटुब घर सोडून गेल आणि जॉडिन्स कुटुब तिथ राहायला आल. जॉडिन्स कुटुब पधरा वर्ष शिकागो येथ राहिल होत. जॉडिन्स मूळचे स्वीडिश. परतु शिकागो येथील पधरा वर्षाच्या वास्तव्यामुळे स्वीडिश

भाषा ते विसरूनच गेले होते. जॉडिन्स हा फिरता शिंपी होता. मापे घेणे, कापड कापणे आणि कपडा शिवणे ही सगळीं कामे तो करीत असे. खांदे आणि मान ताठ ठेवून तो चालायचा. चालताना त्याचे खांदे मागच्या बाजूला किंचित् झुकत. त्याच्या चालण्यात एक आगळीच ऐट होती. चालताना जणू तो म्हणत असे ' मी स्वतंत्र माणूस आहे. कुठल्याहि श्रीमंतापुढे, अमीरउमरावापुढे लाचारीने मान वाकविण्याची मला गरज नाहीं " खऱ्याखुऱ्या जहाल क्रांतिकारक विचाराचा मी पाहिलेला हा पहिलाच माणूस. जिथे कुणीहि कुणापुढे वाकत नाहीं जिथे कुणीहि कुणाचा गुलाम नाहीं अशी एक नवीन समाजरचना निर्माण झाली पाहिजे असे त्याला मनापासून वाटत असे. तो समाजवादी होता. त्याची विचारसरणी अराज्यवादी होती. गरिबांचे शोषण करणाऱ्यांची त्याला विलक्षण चीड येई. तो एक करारी शिंपी होता. आपली बायको, एक मुलगी, आणि दोन मुलगे यांची तो उत्तम काळजी घेत असे. एखादेदुसरा बीअरचा ग्लास पीत राजकारण आणि भविष्यकाळात होणारी क्रांति यावर भाष्य करीत बसणे यात त्याचे समाधान साठवलेले होते.

त्याचा मुलगा जॉन हा माझ्यापेक्षा दोनतीन वर्षांनी मोठा होता. शिकागो येथल्या एका डिपार्टमेंटल स्टोअर्समध्ये त्याने दोन वर्षे नोकरी केली होती. ' क्लॉग ' नृत्याचे पहिले तीन धडे तो शिकला होता. मी त्याच्याकडून ते शिकलो, आणि ते कधीच विसरलो नाहीं. त्याच्या वागण्या-बोलण्यावर शिकागोच्या शहरी जीवनाची गडद छाया होती—त्यात जिवंतपणा आणि बेपर्वाईची छटा होती. त्याने रूप बाचले होते. उन्हाळ्याच्या दिवसांत रात्री त्याच्या घरासमोर असलेल्या गवताच्या कुरणावर पडून आम्ही अनेक विषयांवर बोलत असू. मॅकनमूर या डिटेक्टिव्हच्या कारवायांच्या अनेक गोष्टी त्याने मला सांगितल्या. या मॅकनमूरपुढे ओल्ड कॅप कॉलियर आणि निक कार्टर हे दोन्ही डिटेक्टिव्ह सामान्य ठरतील असे आमचे दोघांचेहि मत पडले.

जॉन, त्याचा भाऊ अल्बर्ट, मार्ट, मी आणखी एक मुलगा—आम्ही सर्वांनी मिळून दोन डॉलरना एक आणि तीन डॉलर्सना एक असे दोन घोडे विकत घेतले. दोन डॉलरचा घोडा अगदी हाडकुळा होता. आमच्या ओळखीच्या माणसाकडून आम्ही दोन गाड्या काहीं काळ मागून घेतल्या आणि त्यांना हे घोडे जुपले. जवळ जवळ पन्नास मैलांच्या अंतरावर असलेल्या इलिनॉय या नदीवर या गाड्यांतून आम्ही गेलो. ही आमची छोटीशी ट्रिपच होती. मनसोक्त पोहायचे, गळ टाकून

मासे पकडायचे---वेळ मोठा मजेत गेला. गेत्सबर्गला घरी परतताना तीन डॉलर्सना विकत घेतलेला तो घोडा वाटेतच मेला. आम्ही त्याला सन्मानपूर्वक पुरून टाकल. आम्हीं सर्वांनी आपापले खिसे धुडाळले आणि पाच डॉलर्स गोळा केले या पाच डॉलर्सचा आम्ही दुसरा घोडा विकत घेतला आणि गेत्सबर्गला येऊन थडकलो. ज्या माणसाकडून आम्हीं आधी तीन डॉलर्सचा तो घोडा विकत घेतला होता त्याच माणसाला हा पाच डॉलर्सचा नवा घोडा आम्ही विकून टाकला. हा माणूस पाच डॉलर्स देऊन काही हा घोडा घेईना तेव्हा आम्हीं तो तीन डॉलर्सनाच विकला आता उरला दोन डॉलर्सचा हाडकुळा घोडा. ज्याच्याकडून आम्ही तो विकत घेतला होता त्यालाच तो आम्ही पुन्हा विकायला गेलो परंतु त्याने तो घोडा पुन्हा विकत घ्यायच नाकारल पुढे त्या घोड्याच आम्ही काय केल हे आता मला आठवत नाही एवढच आठवत की, 'हा पठ्या मोठा चांगला आहे हं' अस आम्ही त्या हाडकुळ्या घोड्याच कौतुक करीत असू

जॉनकडे विनोदी चुटक्याचा आणि गोष्टींचा चांगलाच साठा होता आपल्या बापाप्रमाणेच त्याचे राजकीय विचार क्रांतिकारक होते. एक काळ असा येईल की जेव्हा सगळे कामगार आणि शेतकरी एकजूट करून संघटित होतील आणि समाजाच शोषण करणाऱ्या भांडवलदाराकडून राजकीय सत्ता हस्तगत करतील अस त्याला मनापासून वाटत असे. ज्याना उद्याचीहि वानवा आहे असे गरीब लोक आणि ज्याच्याकडे पैसा कुजतो आहे असे गब्बर लोक याच्यातल्या संघर्षाविषयी तो तळतळून बोलत असे.

जॉनला मारामारी करताना मी कधीच पाहिल नाहीं. मला अस वाटत की हातघाईवर आलेल्या एखाद्या क्षुब्ध जमावाच नेतृत्व करण त्याच्या या स्वभावामुळ त्याला कधीच जमल नसत. आपले क्रांतिकारक विचार वादविवाद करून पटवून देण्याचा तो प्रयत्न करीत असे, परंतु या वादविवादाच पर्यवसान मारामारीत होणार नाही याची तो काळजी घेई. मानवी जीवनाविषयी त्याला विलक्षण आस्था वाटत असे. तो म्हणे, "मला या श्रीमंताचा द्वेष करणच शक्य नाही. त्या मूर्खांची मला अतोनात कीव येते. त्याच्याकडे इतका पैसा कुजतो आहे की त्या मूर्खांना त्याच काय कराव हेच समजत नाहीं. त्यामुळ अधिक पैसा मिळविण्याच्या मूर्ख हव्यासान ते सदा पछाडलेले असतात."

जॉनला मी राजकारण आणि समाजकारण याच्याविषयी अनेक प्रश्न विचारले. माझ्या जवळजवळ सगळ्या प्रश्नांची तो उत्तर देई. मी त्याच्याशी वादविवाद

करण्याच्या भरीस पडत नसे. जॉनची जनशक्तीवर विलक्षण श्रद्धा होती. लोकशक्तीचा हा प्रचंड प्रवाह वाढत वाढत जाईल आणि एक दिवस अमेरिकन जनता भांडवलशाही सत्ता उलथून टाकून समतेचं राज्य निर्माण करील असा त्याला विश्वास होता. जॉनला मताधिकार मिळालेला नव्हता. परंतु जनतावादी पक्षाला त्याचा पाठिंबा होता. जॉनच्या विचारांचे आणि व्यक्तित्वाचे माझ्यावर खोल संस्कार झाले. त्याच्यामुळेच मी विचार करायला शिकलो. या अफाट अमेरिका राष्ट्रातील राजकारण, समाजकारण, अर्थव्यवस्था, उद्योगधंदे, गुन्हेगारीचा प्रश्न या जीवनाच्या विविध अंगाची मला अधिक माहिती करून घेतली पाहिजे, त्याच्या स्वरूपाविषयी मला अधिक विचार केला पाहिजे याची जाणीव जॉनच्या सहवासामुळेच मला तीव्रतेने झाली.

# पहिला पगार

मला पहिली नोकरी मिळाली तेव्हा मी अकरा वर्षांचा होतो. त्याआधी किरकोळ काम करून मी थोडेबहुत पैसे मिळवीत असे, पण या कामाची गणना नोकरीत काहीं करता आली नसती. शाळा सुटल्यानंतर आणि दर शनिवारी हातात एक पोतं घेऊन मी रस्तोरस्ती हिंडत असे. कचऱ्याच्या पेट्या, खड्डे, सगळं मला धुंडाळावं लागे. या ठिकाणी मिळालेल्या चिंध्या, लोखंडाचे तुकडे, बाटल्या, हाडं गोळा करून मी या पोत्यात भरत असे. या प्रत्येक पोत्याबद्दल मला अठरा सेंट मिळत. ही झाली माझी कमाई. अशाच तऱ्हेची किरकोळ कामंहि इतर मुलं करीत. पण आता मला नोकरी लागली होती. मी लांब विजार वापरू लागलो होतो. दर शुक्रवारी मला रोख पगार मिळत होता.

कॅलेंडर आणि रॉडिन यांच्या इस्टेट फर्ममध्ये मला ही नोकरी मिळाली होती. मेन स्ट्रीटवर मध्यभागी कॅलेंडर आणि रॉडिन कंपनीचं ऑफिस होतं. कॅलेंडर हा बळकट बांध्याचा माणूस होता. भरघोस मिशा आणि कल्ले त्यानं ठेवले होते. त्याचं डोकं लांबोडकं होतं आणि हवा येण्यासाठी भिंतीत झरोके ठेवतात तसा त्याचा चेहरा गरगरीत वाटोळा होता. रॉडिन हा शरीरयष्टीनं कृश होता. त्याचा चेहरा पिवळसर होता आणि डोळे निळे होते.

कॅलेंडर आणि रॉडिन कंपनी चांगलीच भरभराटीला आलेली होती. त्यांचं ऑफिसहि मोठं होतं. पश्चिमेकडच्या भिंतीपासून दहा पावलांवर कॅलेंडरचं टेबल ठेवलेलं असे. रॉडिनचं फिरतं टेबल पूर्वेकडच्या भिंतीकडे होतं. या टेबलाला कागदपत्र ठेवण्यासाठी कबुतराच्या खुराड्यासारखे कोनाडे केलेले होते. हे कोनाडे कशासाठी केलेले असतात हे मला कॅलेंडर यानं समजावून सांगितलं होतं. टेबलावरच्या या खुराडेवजा खणाकडे पाहून माझ्या मनात एक मिस्किल विचार चमकून जायचा. कॅलेंडर यांना थट्टेनं मला असं सांगावंसं वाटायचं की या खुराड्यात कबुतरसुद्धा मावू शकणार नाहीं इतके ते लहान आहेत. कधी कधी मला असं वाटायचं की कॅलेंडर आणि रॉडिन ऑफिसमध्ये येण्यापूर्वी

टेबलावरच्या या कागदपत्राच्या खुराड्यात पाचसहा लहानशी कबुतर हळूच सोडून द्यावींत. ऑफिसच्या वेळी कॅलेंडर आणि रॉबिन आपल्या टेबलापाशी येऊन बसले की ही कबुतर पख फडफडावीत खोलीभर पसरतील. माझ्या मनातले हे भिस्किल विचार कॅलेंडर किंवा रॉडिन याना सागण्याचा मला कधीच धीर झाला नाहीं. परतु माझ्याबरोबर तिथ काम करणाऱ्या इतर मुलाना मी ते सागितल, त्याच्यापैकी एकजण म्हणाला, "तू जर त्याच्या टेबलात कबुतर ठेवलीस तर ते तुझ्यावर आपल्या वकिलामार्फत खटला भरतील." आम्हाला त्याच्या या शिष्टपणाची मोठी गमत वाटली. त्यानतर कित्येक दिवस आम्ही त्या मुलाला, "कस काय वकीलमहाशय, केव्हा करणार फिर्याद आमच्यावर?" अस चिडवून हैराण केल.

कॅलेंडर आणि रॉडिन यानी मला फार चागली वागणूक दिली. पहिल्याच दिवशी कॅलेंडर यानं बराच वेळ बोलून मला माझ सर्व काम समजावून दिल. त्याच्यानतर आमच फारस बोलण कधी झालच नाही. आमच बोलण व्हायच त फक्त दर शुक्रवारी. कॅलेंडर मला बोलवायचे आणि म्हणायचे, "हा घे तुझा पगार." मी म्हणायचा, "मी तुमचा आभारी आह." या बोलण्याव्यतिरिक्त दुसर काहीच बोलण होत नसे

माझ्याजवळ ऑफिसची एक किल्ली देण्यात आली होती. सोमवार ते शुक्रवार दररोज सकाळी पावणेआठ वाजता मी ऑफिसचा दरवाजा उघडत असे. ऑफिसमध्ये आल्यावर सगळ ऑफिस झाडून स्वच्छ करायच ह माझ काम. कोपऱ्यातली, कुठ एखादा लहानसा खड्डा असला तर त्यातली, सर्व धूळ काढून ती मी झाडीत झाडीत जिन्यापाशी नेत असे. हा जिना सातआठ फूट उंच होता. ही धूळ प्रत्येक पायरीवर नेऊन ती पायरी झाडीत झाडीत मी जिन्याच्या तळाशी येऊन पोचत असे. जिना जिथ सपायचा तिथच मेन स्ट्रीटचा फुटपाथ सुरू व्हायचा. ऑफिसमधला सगळा कचरा—यात धूळ, सिगरेटची थोटक, दोऱ्या, कागदाचे तुकडे सार काही असायच—झाडूच्या दोनतीन फटकाऱ्यातच मी मेन स्ट्रीटवरच्या फुटपाथवर ढकलून देत असे. रस्त्यावरहि बराच कचरा पडलेला असायचा. त्यात आमच्या ऑफिसातल्या या कचऱ्याची भर पडायची. वाऱ्याची जोराची झुळूक आली की फुटपाथवरचा हा कचरा हवेत उंच उडून रस्ताभर पसरायचा.

कचरा झाडून झाला की कॅलेंडरच्या टेबलावर असलेली पिकदाणी मी नळाखाली स्वच्छ धुवून ठेवीत असे. त्यानतर रॉडिनच्या टेबलावरचीहि पिकदाणी धुवून

ठेवायचा. सहासात आठवड्यातून एकदा या पिकदाण्याना मी छानपैकी पॉलिश करून ठेवीत असे. ऑफिस सुरू होण्यापूर्वी माझ्या या सकाळच्या कामाला मला अर्धापाऊणतास लागायचा. शुक्रवार उजाडला की मी भलताच खुषीत असायचा. मला हाक मारून कॅलेंडर माझ्या हातावर माझा पगार ठेवायचे यावेळी त्याच्या चेहऱ्यावर असा आविर्भाव असायचा की पगार द्यायला ते विसरणारच होते, पण बरं झाल आठवण आली म्हणून! हातात पडलेली नाणी घेऊन मी पळत पळत रस्त्यावर येत असे. रस्त्यावर मूठ उघडून मी माझ्या पगाराकडे तृप्त नजरेने पाहायचा. हातातले ते पचवीस सेंट्स—मला त्याचा मोठा अभिमान वाटायचा.

कॅलेंडर आणि रॉबिनच ऑफिस दुसऱ्या मजल्यावर होत त्याच मजल्यावर पश्चिमेच्या बाजूला काही खोल्या सोडून 'गलसबर्ग रिपब्लिकन रजिस्टर' या वृत्त-पत्राची कचेरी होती. हे वर्तमानपत्र विकणारे पोरे म्हणून आम्ही काही मुल शाळा सुटल्यानतर काम करीत असू. पेपर छापून झाला की प्रथम एका टेबलावर आम्ही त्याच्या घड्या घालायचे. मी जवळजवळ पन्नास ते साठ प्रतीच्या घड्या घालीत असे. घड्या करून झाल्या की मी त्या देखरेख करणाऱ्या एका माणसाकडे घेऊन जात असे. बरोबर साठच प्रती आहेत की नाही हे तो काळजीपूर्वक मोजून पाहायचा. (शिवाय माझ्यासाठी एक जादा प्रत मिळायची.) काही मुल साठ प्रती आहेत असं सागून लबाडीन अधिक प्रती घेऊन जायची आणि तो फायदा आपल्या खिशात घालायची. ही लबाडी बद करण्यासाठीच व्यवस्थापकाना अशी करडी देखरेख ठेवावी लागली होती. घड्या मोजून झाल्या की मेन स्ट्रीटपासून प्रेअरी स्ट्रीटपर्यंत घरोघर जाऊन वर्गणीदाराच्या दारात मी हे वर्तमानपत्र टाकीत असे. वर्तमानपत्राची घडी करून ती दरवाज्याच्या फटीतून आत कशी टाकायची हे मी शिकलो होतो. वर्गणीदाराचे घर जर फुटपाथला लागूनच असल, तर तेथूनच मी पेपर फेकीत असे. पण प्रेअरी स्ट्रीटवर बरेचसे श्रीमत लोक राहत असत. त्यांची घर फुटपाथपासून खूप आत असायची. या घरात वर्तमानपत्र टाकण्यासाठी मला अधिक चालाव लागे.

ज्या एका घरात मी हे वर्तमानपत्र टाकीत असे त्या घरातला एक माणूस मी पेपर घेऊन केव्हा येतो याची वाट बघत दारात उभा असायचा. मी आलो रे आलो की तो माझ्या हातातल्या वर्तमानपत्रावर झडप घालायचा म्हणाना! तो मनुष्य इतका लठ्ठ होता की, एखाद्या भल्या मोठ्या पिपासारखा तो दिसायचा. या माणसाच नाव होत क्लार्क ई. कार. रिपब्लिकन पक्षाचा प्रमुख पुढारी म्हणून

नॉक्स काउंटीमध्यें त्याच्या नावाचा वारंवार उल्लेख होत असे. देशाच्या राजकारणातहि त्याला स्थान होत. रिपब्लिकन अध्यक्षानी त्याची पोस्टमास्तर म्हणून नेमणूक केली होती पुढ तो डेन्मार्कच्या खात्याचा मंत्री झाला.

देशातल्या राजकारणाच्या बातम्या असलेल वर्तमानपत्र कार याच्या हाती देऊन प्रेअरी स्ट्रीटवरच्या इतर घरात पेपर टाकण्यासाठी मी निघत असे. कार यान्या घरानंतर ज्या घरात मी जात असे ते घर गेल्सबर्गमधल सर्वात मोठं घर म्हणून प्रसिद्ध होत अद्ययावत् पद्धतीन हे तीनमजली घर बांधण्यात आल होत जवळ जवळ ऐंशी हजार डॉलर इतका खर्च या घराला आला होता जॉर्ज ए लॉरेन्स हा गृहस्थ या घरात राहत असे. तो वकील होता. त्यान ज्या बाईशी लग्न केल होत तिची खूप मोठी इस्टेट त्याला मिळाली होती

घरोघर पेपर टाकीत टाकीत प्रेअरी रस्त्याच्या टोकापर्यंत मी जात असे. सगळ्यांचे पेपर टाकून झाले की रिपब्लिकन रजिस्टर्डची एक प्रत उरायची ती मी माझ्या घरी घेऊन जात असे या कामासाठी मला एकूण दोनअडीच मैल चालावं लागायच हवा चांगली असली की तासाभरात मी माझ काम उरकीत असे, परंतु हवा पावळी असली, चिखल झालेला असला किंवा बर्फ पडत असला की जवळजवळ दीडदोन तास मला लागायचे या कामाबद्दल मला दर आठवड्याला एक डॉलर मिळायचा. या पगारावरहि मी खूष होतो.

वर्तमानपत्र टाकण्याच्या निमित्तान माझ चालण व्हायच आणि त्याच वेळी निरनिराळ्या घराकडे अवतीभोवतीच्या निसर्गाकडे पाहण्याची मला संधि मिळायची. झाडाची आणि माझी खरी ओळख झाली ती याच वेळी. उन्हात डुबणारी, पावसात न्हाणारी, हिवाळ्यात बर्फान झाकलेली विविध झाड मी डोळे भरून पाहीं. एखाद्या घराच्या आवारातल्या बागेत टॉमॅटो आणि गाजर लावलेली असायची ती जणू खुणवून मला सांगायची की ये आणि आम्हाला तोडून ने. एखाद्या अंगणात सफरचंदाचं झाड असायचं. वाऱ्यामुळ झाडाखाली पडलेली सफरचद मी उचलून घेत असे.

वर्तमानपत्र टाकण्याच्या या नव्या व्यवसायामुळे शहरातल्या बड्या बड्या लोकाची घर मला ठाऊक झाली. त्याची नाव वर्तमानपत्रात वारंवार छापून यायची. शिकागो, पेओरिया, किवानी या शहरी काही कामानिमित्त ते गेले की ही बातमी वर्तमानपत्रात ‘वैयक्तिक’ या सदराखाली छापून यायची. आपली काम संपवून ते घरी परत आले कीं त्याच्या खिडक्यावरचे पडदे वर गेलेले मला

आढळायचे. त्याच्या गैरहजेरीत मी टाकलेली चारपाच दिवसाची वर्तमानपत्र त्याच्या येण्याची वाट पाहत तशीच दारात पडून असायची. पाऊस किंवा बर्फ पडत असला की त्याच्या दरवाजापाशी ठेवलेले पायपुसणे वर ओढून मी त्या वर्तमानपत्रावर ठेवत असे. अस केल की काहीतरी उपयुक्त काम मी मोठ्या जबाबदारीने पार पाडतो आहे अस मला वाटायच.

वर्तमानपत्रात छापून येणार 'वैयक्तिक' बातम्याच सदर जो माणूस लिहीत असे त्याला मी एकदा पाहिल. हातात एक लहानशी वही घेऊन तो मेन स्ट्रीट-वरच्या बड्या लोकान्च्या घरी जायचा. त्याना वेगवेगळे प्रश्न विचारून आपल्या वहीत तो त्याची नोद करायचा. एकदा मी त्याच्याजवळ जाऊन त्याला लिहिताना पाहिल. ज्या माणसाला तो प्रश्न विचारीत होता त्याच्या नावाच स्पेलिंग नेमक कोणत हे त्यान विचारल आणि आपल्या वहीत टिपून घेतल. या बातमीदाराला मी अनेक वेळा पाहिल. एके दिवशी मी कॅलेडर याना त्याच्याविषयीची माहिती विचारली. कॅलेडर म्हणाले, "त्याच नाव फ्रेड जेलिफ. रिपब्लिकन रजिस्टर या वृत्तपत्राचा तो बातमीदार आहे."

फ्रेड जेलिफला काम करताना पाहण्याची सधि मला मिळाली याचा मला खूप आनद वाटला. त्यानतर रिपब्लिकन रजिस्टरच्या कचेरीत आपल्या टेबलाशी बसून लेखन करीत असताना मी फ्रेड जेलिफला पाहिल. फ्रेड जेलिफ जस लिहीत असे तसच्या तस ते वर्तमानपत्रात छापून यायच. बड्या लोकाच्या नावाची स्पेलिंग फ्रेडने जशी आपल्या वहीत टिपलेली असत तशीच ती प्रसिद्ध होत असत. ते पाहून मला वाटायच की बड्या लोकाच्या नावाची स्पेलिंग जर तुम्हाला करता आली आणि ती कागदावर लिहिता आली तर वृत्तपत्राचा बातमीदार होण तुम्हाला सहज शक्य होईल

एक वर्ष तर मी पेपर विकण्याचा धदा खूपच केला. 'रिपब्लिकन रजिस्टर' या वर्तमानपत्राप्रमाणेच शिकागोतून निघणाऱ्या इतर वृत्तपत्रासाठीहि मी काम करू लागलो. शिकागोहून फास्ट मेलगाडीने ती वर्तमानपत्र येत असत. गाडी स्टेशनवर थाबली की प्लॅटफार्मवर वर्तमानपत्राचे हे गठ्ठे उतरवून घेतले जात. हे गठ्ठे उचलून आम्ही 'क्रॉकर ॲण्ड रॉबिन्स' या किराणाधान्याच्या दुकाना-समोर आणून ठेवीत असू. तिथ छप्पर असल्यामुळे पावसापासून वर्तमानपत्राचे हे गठ्ठे सुरक्षित राहत. किराणाधान्याचे हे दुकान सेमिनरी स्ट्रीटच्या पलीकडे होते.

मि. एडवर्ड्स नावाचा माणूस या सर्व वर्तमानपत्राचा एजट होता. त्याच्याच

हाताखाली आम्ही ही काम करीत असू. मेन स्ट्रीटवर एडवर्ड्सच एक मोठ दुकान होत. या दुकानात तो पुस्तक, वर्तमानपत्र आणि इतर सर्व तऱ्हेचा स्टेशनरी माल विकीत असे. त्याच्या लांबलचक पांढऱ्याशुभ्र दाढीमुळे तो सान्ताक्लॉजसारखा दिसायचा. आम्हाला आमची काम तो न चिडता समजावून सांगायचा. मुलांची जर आपापसात मारामारी जुंपली तर कोंबडी आपल्या पिलांच भांडण सोडवते तसा तो पुढे येऊन ती मारामारी सोडवायचा.

वर्तमानपत्राच्या गठ्ठयाना बांधलेले दोरे आम्ही कापून टाकीत असू. मग उन्हाळ्यातल्या सकाळी गवतावर पसरलेल्या शुभ्र ताज्या दवाप्रमाणे आमच्यापुढे 'शिकागो ट्रिब्यून', 'शिकागो रेकॉर्ड', 'शिकागो इंटर ओशन', 'शिकागो टाइम्स', 'शिकागो हेराल्ड' आणि 'शिकागो क्रॉनिकल' ही ताजी फडफडीत वर्तमानपत्र पसरलेली दिसायची. प्रत्येक मुलगा आपापल्या वाट्याची वर्तमानपत्र घेऊन ती घरोघर टाकण्यासाठी निघायचा. रिपब्लिकन पक्षाच्या 'शिकागो ट्रिब्यून' या वर्तमानपत्राची वर्गणी भरणाऱ्या माणसाच्या घरात जर चुकून डेमॉक्रॅटिक पक्षाच 'शिकागो टाइम्स' हे वर्तमानपत्र टाकल तर कोणती आफत ओढवायची हे आमच्यापैकी सगळ्याना ठाऊक झाल होत. इतर सगळ्या पेपराची किंमत दोन सेंट होती परंतु व्हिक्टर लॉसनने सुरू केलेल 'शिकागो रेकॉर्ड' हे वृत्तपत्र मात्र एक सेंटला मिळायच. एखादा 'शिकागो रेकॉर्ड' हे पत्र विकत घेणारा माणूस ते स्वस्त मिळत म्हणून ते विकत घ्यायचा की राजकीय प्रश्नाच्या दोन्ही बाजू लोकासमोर मांडून स्वतंत्र विचारसरणी मांडणार ते एक चांगल वर्तमानपत्र आहे म्हणून ते विकत घ्यायचा ह सांगण मोठ कठीण होत. एवढ मात्र खर की, ज्या ज्या घरात दोन वर्तमानपत्र विकत घेतली जात त्यात शिकागो रेकॉर्ड हे पत्र अगदी हटकून असायचच. माझी वर्तमानपत्राची जवळ जवळ पन्नास गिऱ्हाइक होती. 'मेयर कॉर्टर हॅरिसन याचा शिकागोत भीषण खून' अशासारखी एखादी सनसनाटी बातमी आली की माझ्या दहावीस प्रती अधिक खपायच्या.

आमच काम संपल की, आम्ही दुपारी एक वाजता एडवर्ड्सच्या दुकानात परत येत असू. वर्तमानपत्र विकून आलेले पैसे एडवर्ड्सजवळ दिले की आमच्यापैकी पाचसहाजण मिळून आम्ही खाना घेण्यासाठी एका हॉटेलात जात असू. या हॉटेलात आमचे खाण्याचे पदार्थ ठराविक असत. बनपाव आणि तळलेल अंड असा आमचा खास बेत असायचा. आम्हाला सपाटून भूक

लागलेली असायची. गप्पा मारीत मारीत आम्ही खाद्यपदार्थांचा समाचार घेत असू. घामाच्या पैशाचे आम्ही खात होतो आणि म्हणूनच खिशातले पैसे काढून बिल देताना आमची छाती अभिमानाने फुलून यायची. आमच्यापैकी काहीजण ठिगळ लावलेल्या विजारी घालून येत असत. परंतु आम्ही मेहनत करून पैसे मिळवतो, आमची भाकरी आमच्या घामाची असते, या जाणिवेने आम्ही प्रौढ माणसं आहोत असं आम्हा पोरांना वाटायला लागायचं.

हे मुख्य काम सांभाळून कुठं बटाट्याच्या बागेत पाणी घाल, कुठं कुणाची बागेतली जमीन खणून दे अशी किरकोळ कामं करून मी महिन्याकाठी आणखी चार डॉलर्स मिळवीत असे.

आणखी एक मोठं गमतीचं असं किरकोळ काम मी करीत असे. या कामाचे पैसे मिळत असत, पण आमच्या लेखी ते खेळातच जमा होतं. शहरात इंग्लिश जातीच्या चिमण्या इतक्या वाढल्या होत्या की त्यांच्या त्रासानं लोक अगदी कटाळले होते. जो एक चिमणी मारून देईल त्याला एक सेंट इनाम मिळेल असं सरकारनं जाहीर केलं होतं. मी जवळ जवळ तीस चाळीस चिमण्या मारल्या. दोन काठ्या आणि रबर यांची मी एक बेचकी तयार केली होती. बेचकीत दगड घालून मी चिमण्या मारीत असे. शंभर दगड मारावे तेव्हा कुठं माझ्या हाती एखादी चिमणी लागत असे. काही दिवसांनी माझ्या शेजारी राहणाऱ्या एक्सेल जान्सन या स्वीडिश मुलानं मला सांगितलं की बेचकीपेक्षा किंवा दारूची पावडर असलेल्या बंदुकीपेक्षा एअरगननंच पाखरं चांगली मारता येतात. एक्सेल जॉन्सन मला म्हणाला की, पक्ष्यांना अनेक मैलांवरूनसुद्धा बंदुकीच्या दारूचा वास नेमका येतो आणि त्यामुळं ते उडून जातात. इतक्या दूरच्या अंतरावर या पक्ष्यांना बंदुकीच्या दारूचा वास कसा काय येत असेल याचा मी बराच वेळ विचार करीत होतो!!

# दुधाच्या गाडीवर

अठराशे ब्याण्णवचा ऑक्टोबर महिना. माझं वय चौदा वर्षांचं होतं. माझी आई मला पहाटे साडेपाचला उठवीत असे. न्याहारी तयार असायची. न्याहरी करून दोन-अडीच मैलाच्या अंतरावर असलेल्या जॉर्ज बर्टनच्या घरी मी जात असे. जॉर्ज बर्टनच्या दुधाच्या दोन गाड्या होत्या. चालत न जाता वाटेत मिळणाऱ्या ट्रॉलीमधून मी गेलो असतो, तर चालण्याचे अर्धेअधिक श्रम मला वाचविता आले असते. पण त्यासाठी दर वेळी एक निकेल खर्च करावा लागला असता. हा निकेल वाचविण्यासाठी मी दोन-अडीच मैलांचं हे अंतर पायीच चालून जात असे.

या ऑक्टोबर महिन्यात एकदा अकस्मात माझा घसा फार दुखू लागला. घसा इतका दुखत होता की मला दोन दिवस बिछान्यात पडून राहावं लागलं. आजारी असल्यामुळे मी कामावर येऊ शकलो नाही असं मी जॉर्ज बर्टनला सांगितलं. जॉर्ज बर्टनच्या संशयी नजरेवरून माझं हे सांगणं त्याला खोटं वाटलं असं मला जाणवलं. दोन दिवसांच्या रजेनंतर जरी मी कामावर रुजू झालेलो असलो तरी अजूनहि माझा घसा दुखत होता आणि खूप अशक्त वाटत होतं. परंतु बर्टनला मात्र मी हे मुळीच सांगितलं नाही.

त्याच आठवड्यात मार्टचाहि घसा दुखू लागला. नंतर मार्टपेक्षा लहान असलेल्या दोन भावडांचे घसे दुखू लागले. फ्रेडचं वय होतं दोन वर्षांचं आणि एमिलचं सात. वयाच्या मानानं एमिल चांगलाच सुदृढ होता. आम्ही दोघं अनेक वेळा कुस्ती खेळत असू. त्याचं माझं अनेक बाबतीत जमायचं.

स्वयपाकखोलीतच फक्त शेगडी होती. म्हणून आम्ही या सर्व आजाऱ्यांचे बिछाने स्वयंपाकखोलीत हलवले. मार्ट, फ्रेडी आणि एमिल या तिघांचे बिछाने एकत्र घातले होते. त्यांचे घसे अधिकाधिक दुखू लागले आणि त्यांना अशक्त-पणाहि बराच येऊ लागला. डॉक्टर विल्सनला बोलावून आणायचं म्हणजे दीड डॉलर 'व्हिजिट फी' द्यावी लागली असती. तरीहि मी मेन स्ट्रीटवर असलेल्या

डॉक्टर विल्सनच्या दवाखान्यात गेलो आणि त्याना ताबडतोब घरी घेऊन आलो. तो शहरातला एक प्रसिद्ध डॉक्टर होता. विल्सन घरी आला. चमच्यान या निघाची जीभ खाली दाबून त्यान त्याचे घसे पाहिले. मग माझ्या आईबापाकडे पाहून डॉक्टर विल्सन गभीर चेहरा करून म्हणाला, "हा डिफ्थेरिया आहे."

दुसरे दिवशी दुपारी आरोग्य खात्याच्या मुख्य अधिकाऱ्यानी आमच्या घरावर डिफ्थेरिया (घटसर्प) अस लिहिलेला एक बोर्ड लावला घटसर्प हा सासर्गिक रोग असल्यामुळे लोकानी आमच्या घरी येऊ नये यासाठी ही जाहीर सूचना होती. दुसरे दिवशी सकाळीं मी जॉर्ज बर्टनच्या घरी कामावर रुजू झालो. मी जर गैरहजर राहिलो असतो तर सबळ कारण असून सुद्धा बर्टनचा माझ्यावर विश्वास बसला नसता हे मला ठाऊक होत. कामावर रुजू झाल्याबरोबर माझ्या घरात घटसर्पाची लागण झाली आहे आणि मुख्य आरोग्य-अधिकाऱ्यानी लोकाना तशी सूचना देणारा फलक माझ्या घरावर लावला आहे हे मी बर्टनला सागितल. त्याने ते सगळ निर्विकारपणे ऐकून घेतल, एक चकार शब्दहि तो बोलला नाहीं. तेव्हा नेहमीप्रमाणे दुधाची भाडी घेऊन रतीब घालण्यासाठी मी निघालो दुधाचा रतीब घालण्याच माझ हे काम सकाळी सात वाजल्यापासून दुपारी एक वाजेपर्यंत चालू असायच. एव्हाना शहरातल्या बऱ्याच लोकाना आमच्या घरात घटसर्पाची साथ सुरू झाल्याच माहीत झाल होत. मी दूध घालायला गेलो तेव्हा काही बायकानी मला घाबरल्या स्वरात स्पष्टपणे विचारल, "तुमच्या घरात घटसर्पाची लागण झाली असताना तू आमच्या घरी येऊन दुधाचा रतीब घालण योग्य आहे अस तुला वाटत का?" मी त्याना स्पष्ट सागून टाकल की माझ्या घरीं डिफ्थेरिया असल्याच मी बर्टनला सागितलेल होत, परतु यावर तो काहीच बोलला नाही. याचाच अर्थ असा की मी रजा घेण त्याला आवडल नसाव. माझ स्पष्टीकरण ऐकून घेऊन त्या बायका म्हणत, "ते कसहि असो, तू दुधाचा रतीब घालण हे काहीं आम्हाला योग्य दिसत नाही."

तिसऱ्या दिवशी डॉक्टर विल्सन पुन्हा आमच्या घरी आला. त्याने रोग्याना तपासून पाहिल आणि त्याच्या प्रकृतीत काहीहि सुधारणा झाली नसल्याच त्यान सागितल. गभीरपणे मान हलवून तो म्हणाला "ती मुल बरी होतील अशी आशा बाळगण एवढच आपल्या हाती आहे. कदाचित् ते बरे होतील किंवा त्याची प्रकृति अधिकहि बिघडेल. सध्याच्या परिस्थितीत मी कसलीच खात्री देऊ शकत नाही." सध्याकाळची उन्ह उतरू लागली होती. एमिल आणि फ्रेडी

याच्या चेहऱ्यावर खिडकीतून आत येणार ते ओसरत ऊन पसरल होत. ते दोघेहि डोळे मिटून निश्चल पहुडले होते. इतक्यात फ्रेडीचा श्वासोच्छ्वास थाबला. माझी आई जवळ आली. तिने त्याच्या कपाळाला आणि हाताला हात लावून पाहिल तिच्या डोळ्यातून अश्रू ओघळू लागले. हुदका दाबलेल्या आवाजात ती म्हणाली, "फ्रेडीच अग थडगार पडलय् सपल सार." आम्हीं एमिलकडे पाहिल त्याची प्रकृति एरव्ही सुदृढ असल्यामुळे या आजारातून तो डोक वर काढील अशी आम्हाला आशा वाटत होती. पण हळूहळू त्याचाहि श्वास मद होत गेला आणि अर्ध्या तासानतर एमिलन श्वास घेण थाबवल. माझ्या आईन त्याच्या शरिरावर हात ठेवला. दुःखाच्या भारामुळे तिच सार शरीर थरथरत होत. तिन एक हुदका दिला आणि ती आर्त स्वगत म्हणाली, "अरे देवा, एमिलसुद्धा आम्हाला सोडून गेला!"

दुःखाच्या त्या आघातान आमच सार कुटुब हादरल. दिवाणखान्यात मध्य-भागी असलेल्या टेबलावर आमच बायबल होत. ते टेबल आणि ते बायबल तिथून हलवून दिवाणखान्याच्या कोपऱ्यात ठेवल गेल आणि त्या टेबलाच्या जागी दोन शवपेटिका ठेवण्यात आल्या आमचे शेजारी आणि स्नेही हातात फुल घेऊन या शवपेटिकेभोवती जमले. फ्रेन्स आणि होम्स ही आमची स्नेही असलेली कुटुब या जग सोडून गेलेल्या दोन चिमण्या जीवापुढ खिन्नपणे दिवाणखान्यात उभी राहिली. रे. कार्लनी ब्लॅड यानी स्वीडिश भाषेत प्रार्थना म्हटली. 'हे प्रभु येशू, मम आत्म्याचा प्रियकर तू' हे गीत करुण स्वरात गायिल गेल. शवपेटिका उचलणाऱ्याची नेहमीच्या सरावाची घाईघाईची हालचाल सुरू झाली. शवपेटिका उचलल्या गेल्या तेव्हा माझी आई रडू लागली. कसलाहि आक्रस्ताळेपणा त्या रडण्यात नव्हता. दुःखाचा तो उमाळा पराकोटीच्या सयमान ती व्यक्त करीत होती. 'देवा, एमिल आम्हाला सोडून गेला' अस जेव्हा ती प्रथम म्हणाली तेव्हा दुःखाच्या आवेगान तिच शरीर घुसळल्यागत झाल होत. पण यावेळी मात्र तस काहीं झाल नाही. विलक्षण सयमान तिन हा प्रचड आवेग शवपेटिका उचलण्याच्या वेळी आवरला असला पाहिजे. मी आणि मार्ट रडलो नाही. आम्ही आमच्या डोळ्यात अश्रू येऊ दिले नाहीत. आमचे चेहरेहि आम्हीं गभीर ठेवले होते. खर म्हणजे, शवपेटिका उचलताना आम्हाला रडू कोसळायला हव होत. परतु आम्ही ते आवरू शकलो याच कारण आपल्या रात्री आणि नतरच्याहि दोन रात्रीं आम्ही दोघ झोपायला गेलो की अंथरुणात गुपचुप

ओक्साबोक्सी रडत असे. झोपी गेल्यानंतरहि मध्यरात्री आम्हाला अचानक जाग येत असे आणि पुन्हा रडू कोसळत असे. प्रेतयात्रेबरोबर आम्ही दोघहि गेलो होतो. जमीन खणून आत त्या शवपेटिका ठेवल्या गेल्या तेव्हा, "राख मिळते राखेला। माती मिळते मातीला" हे शब्द कुणीतरी उच्चारलेले आमच्या कानावर पडले. त्या दोन छोट्या शवपेटिका जमिनीत ठेवल्या गेल्या, आणि त्यावर मूटमूठ माती टाकली गेली. फ्रेन्स आणि होम्स कुटुंबातली माणसं दुःखानं भागवलेल्या चेहऱ्यानं आमच्या कुटुंबातल्या माणसांचं सांत्वन करीत होती.

काही वेळानं एका घोड्याच्या गाडीत बसून आम्ही घरी परतलो. सारं संपलं होतं. दोन चिमण्या जीवांनी आपली इहलोकीची यात्रा संपविली होती. काळाचं चक्र सारखं फिरत राहणार होतं. फ्रेडी आणि एमिल यांच्यासाठी ते थांबणार नव्हतं. फ्रेडीचं वय दोनच वर्षांचं होतं. त्याचा मला लागावा तितका लळा अजून लागलेला नव्हता. पण मी आणि एमिल कितीतरी वर्षं एकत्र राहिलो होतो, खेळलो बोललो होतो. यापुढं एमिल आपल्यातून कायमचा गेला या जाणिवेनं मला विलक्षण ओक ओक आणि भकास वाटू लागलं. एमिल जर जगला वाचला असता तर तो कसा झाला असता याचं चित्र मी कल्पनेनं रंगवू लागलो.

दोन दिवस मी बर्टनकडे कामाला जाऊ शकलो नाही. कामावर रुजू झालो तेव्हा त्याचा चेहरा पूर्वीसारखाच निर्विकार होता. भावना तर सोडाच, पण उपचार म्हणून देखील सांत्वनाचे दोन शब्द त्याच्या तोंडातून निघाले नाहीत.

बर्टनचा चेहरा चिचोळा होता. आपल्या पिंगट रंगाच्या मिशांना अधून मधून पीळ देण्याची लकब होती. त्याची बायको फारच देखणी होती. तिच्या दर्शनानं त्याचा चेहरा उजळायचा. त्याच्याजवळ दोनतीन वेगवान घोडे होते. वेगानं धावणाऱ्या घोड्यांचा त्याला शोक होता.

एमिल आणि फ्रेडीच्या मृत्यूनंतर डॉक्टर, प्रेतयात्रेचे सामान विकणारे, शव-पेटिका उचलणारे या सगळ्यांनी आपापल्या बिलांनी आम्हाला घेरून टाकलं. या बिलापायी माझ्या बापाच्या पगारातला बराच मोठा भाग कापला जाऊ लागला. आता आमच्या कुटुंबात आम्ही सातजणच राहिलो. शाळेची फी, कपडे, पुस्तकं, सगळा घरखर्च याच्या जोडीला आता ही थकलेली बिलं आली होती. हे सगळे पैसे वेळच्या वेळी भरले नसते, तर आमचं घर विकण्याची पाळी माझ्या बापावर आली असती. माझी बहीण मेरी हिचं हायस्कूलमधलं आता शेवटचं वर्षं होतं. पूर्वीपेक्षा अधिक नीटनेटके कपडे तिला देणं माझ्या आईबापांना भाग होतं. जॉर्ज

बर्टन मला महिन्याला बारा डॉलर्स पगार देत असे. माझ्या या पगारामुळे आमच्या कौटुंबिक खर्चाला बरीच मदत व्हायची. ते हिवाळ्याचे दिवस होते. कडाक्याची थंडी पडायची. कामावर जाण्यासाठी मला अडीच-तीन मैल चालावं लागे खर म्हणजे थंडीचे बूट घेण्याची मला फारच आवश्यकता होती. परंतु माझ्या तुटपुंज्या पगारातून बुटासाठी दोन डॉलर्सची रक्कमसुद्धा बाजूला काढणं मला शक्य नव्हतं पहाटे साडेपाच वाजता उठून त्या कडाक्याच्या थंडीतून मी कुडकुडत जात असे. थंडीच्या माऱ्यामुळे पायातलं रक्त गोठून नसन् नस मुंजल्यागत ठणकू लागे तरीहि रस्त्यातून मी तसाच रखडत, फरफटत कामावर जात असे वाटेत एखाद्या किराणाधान्याच्या दुकानासमोर किंवा एखाद्या घरासमोर शेगडी पेटवून माणसं उबेला बसलेली असत. मी थंडीत काकडत जात असलेला पाहून ती दयाळू माणसं मला हाक मारीत. शेगडीच्या उबेत पाच मिनिटं मला बसू देत. त्या माणसांनी ही माणुसकी जर मला दाखविली नसती तर त्या थंडीत खात्रीनं माझ्या पायांना काहींतरी विकार झाला असता, आणि बराच काळपर्यंत पायांचं ते दुखणं मला पुरलं असतं.

एकदा कामावर हजर होण्यास मला दहा मिनिटं उशीर झाला. थंडीचे बूट घालून जॉर्ज बर्टन आपल्या दुधाच्या गाडीपुढं बसला होता. मला उशिरा आलेला पाहून कपाळाला आठ्या घालून तो म्हणाला, "आज उशीर झाला तुला." मी त्याला म्हणालो, "थंडीनं माझे पाय फार गोठून गेले होते. वाटेत एका घरासमोरच्या शेगडीपुढं उबेसाठी पाच मिनिटं थांबणं मला भाग पडलं" यावर बर्टन म्हणाला, "पण तू माझ्यासारखे थंडीचे बूट का घेत नाहीस?" मी बर्टनला म्हणालो, "आमच्या घरची आर्थिक परिस्थिति चांगली नाही. थंडीच्या बुटासाठी दोन डॉलर खर्च करणं आम्हाला कसं परवडणार?" यावर बर्टन तिरसटपणे 'हूं' एवढंच म्हणाला मी काय बोललो हे जणू त्याला काहीच कळलं नव्हतं—आणि माझी खात्री होती, ते त्याला कधीच कळणं शक्य नव्हतं.

दुसऱ्याला गाणं म्हणून दाखविताना किंवा स्वतःशी गुणगुणताना मी बर्टनला कधीहि पाहिलं नाही. एखादा गमतीदार चुटका सांगून खुल्या दिलानं हसताना मला तो कधीच आढळला नाही. वर्तमानपत्रातली किंवा शहरातली एखादी चटकदार बातमी वाचून वा ऐकून त्यावर मित्रमंडळींत खमंग खुसखुशीत बोलणं त्याला मुळीच माहीत नव्हतं. आपल्याला आवडणारे स्त्रीपुरुष, दूध घेणाऱ्या गिऱ्हाइकांच्या गमतीजमती, संगीताच्या मैफली, वाद्य यांपैकी कशातहि

बर्टनला रस नव्हता. जॉर्ज बर्टनच्या या शुष्क सुरकुतल्या वृत्तीकडे पाहिलं कीं कधी कधी मला वाटायचं की या माणसाच्या जीवनात बाल्य नावाची गोष्ट कधीच नसली पाहिजे. कधी कधी मी त्याच्याशी काहीतरी विषय काढून बोलण्याचा प्रयत्न करीत असे, परंतु अशा वेळीं तो काहींतरी तिरसट वाक्य बोलून मला गप्प बसवायचा किंवा असा मख्ख, निर्विकार चेहरा करून बसायचा की जसं काही माझं त्याच्याशी बोलणंच झालं नव्हतं रेसचा घोडा चालवणाऱ्या एका माणसाशी मात्र, रस्त्यावर थांबून तो दहापधरा मिनिटं बोलायचा. कधीहि भेटले तरी घोडा हा एकमेव विषय त्याच्या बोलण्यात असायचा

आपण दुधाचा धंदा करतो ही गोष्ट बर्टनला कमीपणाचीहि वाटत नसे किंवा तिचा त्याला अभिमानहि वाटत नसे. त्याच्याजवळ असलेल्या दोनतीन घोड्यांचा मात्र त्याला अभिमान वाटायचा. दुधाचा धंदा चांगला बरकतीला आला, तर आणखी घोडे विकत घ्यायचे आणि धावण्याचा जगाचा विक्रम मोडणाऱ्या घोड्याचा मालक म्हणून नाव कमवायचं अशी त्याची आकांक्षा होती मी मात्र नेहमी म्हणत असे की या माणसाला मुलांशी कसं बोलावं हे मुळीच कळत नाहीं. आणि ज्या माणसाला मुलाशी बोलता येत नाहीं त्याला घोडा हा प्राणी कधींहि हाताळता येणार नाही —असा माणूस उमद्या घोड्याची पैदास कधीच करू शकणार नाहीं.

जॉर्ज बर्टनचा सुतकी चेहरा दररोज पाहणं माझ्या अगदी जिवावर यायचं. त्याचं दर्शनसुद्धा नको असं मला सारखं वाटायचं. अठराशे ब्याण्णव सालच्या सुरुवातीला एके दिवशी बर्टननं मला माझा पगार दिला. माझा पगार मी घेतला आणि त्याला म्हणालो, "उद्यापासून मी तुमचं काम सोडलं." त्यावर तो म्हणाला, "ठीक आहे. सोडलं तर सोडलं. माझं त्यात काहीच नुकसान नाहीं!" त्याला चांगलं सणसणीत उत्तर द्यावं असं माझ्या मनात आलं होतं, परंतु मी एक चकार शब्दहि बोललो नाहीं. मी माझे खांदे वर उडवले. औपचारिक स्वरात 'गुड बाय' म्हटलं आणि तिथून तडक चालता झालो.

# अन्नासाठीं दाही दिशा....

सेमिनार स्ट्रीटवर एका लाकडी बिल्डिंगमध्ये एक पत्रेवाल्याचं दुकान होतं. दुकानावर, 'येथे सर्व तऱ्हेची पत्र्याची कामें केली जातात' अशी पाटी लावलेली होती. या पत्रेवाल्याला मी अनेक वेळा दुकानात येताजाताना पाहिलं होतं. मध्यम उंचीचा तो माणूस होता. किंचित सैल कपडे तो अंगावर घालीत असे. डोक्यावर कोंबल्यासारखी दिसणारी एक पातळशी हॅट तो घालायचा. त्याचे केस वाढलेले असायचे. हॅटला पडलेल्या भोकातून केसाचे झुपके बाहेर डोकावत. त्यानं दुकान उघडून वर्ष-दीड-वर्ष झालं होतं. आजूबाजूचे लोक पत्र्याचीं कामं करून घेण्यासाठीं त्याच्याकडे येत असत.

ऑक्टोबर महिन्यात एके दिवशी मी तडक त्याच्या दुकानात गेलो आणि 'मला नोकरीवर ठेवता का?' असं त्याला विचारलं. त्या माणसानें मला तू पूर्वी कुठं काम करीत होतास किंवा या कामाचा तुला पूर्वीचा अनुभव काय असा-सारखा एकहि प्रश्न मला विचारला नाही. मला नोकरी हवी आहे असं मी सांगताक्षणीच, 'उद्या सकाळीं सात वाजल्यापासून तू कामावर यायला लाग' असं त्यानें मला सांगितलं. मी त्याच्याकडे बघतच राहिलो. नंतर तो पुढें म्हणाला, "उद्या सकाळीं बरोबर सात वाजता कामावर हजर हो. मी तुला दर आठवड्याला तीन डॉलर्स पगार देईन." त्यानं मला माझं नावहि विचारलं नाहीं. त्याचं नांव काय हेहि मला ठाऊक नव्हतं.

दुसरे दिवशी सकाळी सात वाजता मी त्याच्या दुकानापुढें हजर झालो. दुकानाला कुलूप होतं. एक तास मी तसाच खोळंबून उभा राहिलो. आठ वाजण्याच्या सुमारास घोड्याच्या गाडींत बसून तो आला मग आम्ही या गाडींत छपरावर बसविण्याचे पत्रे भरले आणि त्याच गाडीतून ब्रॉडस्ट्रीटवर राहणाऱ्या ऑसगुड या गेल्सबर्गमधील प्रसिद्ध फोटोग्रॉफरच्या घरीं गेलो. ऑसगुडच्या स्वयंपाकखोलीच्या छपरावरील जुने पत्रे काढून त्या जागीं नवे पत्रे टाकण्याचं काम होतं. भिंतीला शिडी लावून आम्ही वर चढलो आणि हळूहळू

छपरावरचे जुनाट झालेले पत्रे काढून खाली आणून टाकले.

दुपारचे बारा वाजले तेव्हा माझा हा नवा मालक मला म्हणाला, "आता काम पुरे मी आता घरी जातो." आम्ही काम थांबविल. माझा मालक घरी निघून गेला मी माझ जेवण घरून आणलच होत. तिथ बसून मी माझ जेवण केल जवळजवळ दोन वाजता माझा मालक परत आला तो पीत असावा अस मला पूर्वी उगीचच वाटल होत, परंतु यावेळी मात्र माझी खात्री झाली. तो माझ्या जवळ आला तेव्हा त्याच्या तोंडच्या उग्र भपकाऱ्यावरून मी ओळखल की स्वारी यथास्थित व्हिस्की झोकून आली आहे. पुन्हा आम्ही भिंतीला शिड्या लावल्या आणि छपरावर नवे पत्रे टाकण्याच काम सुरू केल शिडीवर चढताना मद्याचा अमल वाजवीपेक्षा थोडा अधिक झाल्यामुळ त्याचे पाय लटलटत होते एकदा त्याचा पाय शिडीवरून घसरला देखील, परंतु त्याच्या हाताची पकड बळकट असल्यामुळे तो वाचला नाहीतर खर म्हणजे तो खालीच कोसळायचा. आम्ही दोनतीन पत्रे छपरावर बसवले असतील नसतील. दोन वाजता आमच काम सुरू झाल होत चार वाजण्याचा सुमार झाला तेव्हा माझा मालक म्हणाला की, आता काम पुरे, चला घरी

दुसरे दिवशी सकाळी बरोबर सात वाजता मी दुकानापुढे हजर झालो. दुकानाला कुलूपच होत मला दोन तास माझ्या मालकाची वाट पाहत ताटकळत उभ राहाव लागल. नऊच्या सुमाराला घोड्याच्या गाडीतून तो आला. व्हिस्कीचा भपकारा त्याच्या तोंडाला येत होता. तिथून आम्ही ऑसगुडच्या घरी गेलो. आणखी तीनचार पत्रे छपरावर बसवले बारा वाजता त्यान काम थांबविल आणि तो म्हणाला, "आजच्या दिवसाच आपल काम झाल" ते ऐकून मला हायस वाटल, कारण त्या दिवशी त्याने इतकी व्हिस्की झोकली होती की त्याला नीटपणे शिडीवर चढताहि येत नव्हत एकदा तर तो छपरावरून खाली घसरण्याच्या बेतात होता. दुसरे दिवशी सकाळी मी सातला न हजर होता आठ वाजताच आलो. दहा वाजेपर्यंत मी ताटकळत वाट पाहिली तरीहि तो आला नव्हता. मग मी मेन स्ट्रीटवर बराच वेळ भटकलो. अकरा वाजता मी पुन्हा येऊन पाहिल, पण दुकानाला कुलूपच होत. आणखी तासभर वेळ काढून मी बारा वाजता परत आलो. तरीहि दुकानाच कुलूप आपल होत तसच होत.

त्याचक्षणी पत्रेवाल्याच्या या नोकरीला रामराम ठोकण्याच मी ठरवल. मला त्याची कीव आली. त्याच्याकडे मी झाल्या दिवसाचा पगार सुद्धा मागायला

गेलो नाहीं. कारण तो बुडायला आला होता हे मला निश्चित ठाऊक होत काहीं आठवड्यानतर मी सहज तिथे गेलो तेव्हा ते पत्र्याच दुकान कायमच बद झाल्याच मला आढळल 'येथे पत्र्याची सर्वतऱ्हेची कामे करून दिली जातील' ही पाटी तिथे दिसत नव्हती आणि दिसणारहि नव्हती.

त्यानतर पॉप हे पेय तयार करणाऱ्या कारखान्यात बाटल्या धुण्याच काम मला मिळाल मी कामाला लागलो तेव्हा उन्हाळ्याला सुरुवात झाली होती. या नोकरीच भवितव्य काय हे मला पुरत ठाऊक होत. मागल्या पानावरून पुढे चालू असाच एकूण हा प्रकार होता ह काम विलक्षण कटाळवाण होत सकाळ सध्याकाळ त्याच त्याच बाटल्या त्याच त्याच पद्धतीन धुवायच्या--कसलाहि बदल इथे समवण शक्य नव्हत. नोकरीला लागलो तेव्हा मालकान मला सागितल की कामाच्या वेळात लागेल तेवढ पॉप तू पिऊ शकतोस मी बाटल्यावर बाटल्या पॉप पिण्यास सुरुवात केली. चवथ्या दिवशी मी पॉप पिण सोडून दिल मला वाटत आयुष्य-भर पुरेल इतक पाप मी पिऊन घेतल दोन आठवडे मी काम केल आणि ही नोकरी सोडून दिली. या कामातला सकाळ सध्याकाळ जाणवणारा तोचतोपणा मला केवळ असह्य वाटला.

हिवाळा आला तेव्हा हार्व एम क्रेग याच्या औषधाच्या दुकानात मी नोकरीला राहिलो. दुकानाची एक चावी माझ्याजवळ असे

सकाळी सात वाजता येऊन मी सगळ दुकान झाडून स्वच्छ करीत असे हिनमन याच्याकडे औषध तयार करण्याच काम होत. तो साडेसात वाजता येत असे. तळघरात जाऊन मी औषधाच्या खोलीतल्या बाटल्या व्हिस्की आणि रम यानी भरून आणून ठेवत असे. पोर्टवाइन हे मद्य मी प्रथम इथेच चाखल. माझ्या अपेक्षेपेक्षा त्याची चव चागली होती असे मला आढळून आल परतु याचा माझ्या शरिरावर वाईट परिणाम होईल अशी धास्ती माझ्या मनात होतीच. त्यानतर मी व्हिस्कीची चव पाहिली. व्हिस्की काही आपल्यासाठी नाही असे मी ठरवून टाकल. औषधाच्या खोलीतल्या वेगवेगळ्या बाटल्यात मी सल्फ्युरिक आणि म्युरिॲक ॲसिड, टरपेटाइन इत्यादि औषध भरून ठेवत असे.

नऊ वाजले की हार्वे क्रेग दुकानात येत असे. त्याची बायको सहसा त्याच्या-बरोबर असायचीच. इलिनॉय येथील सुप्रीम कोर्टाचे न्यायाधीश ए. एम्. क्रेग याचा तो मुलगा. दिसायला तो बराचसा आपल्या वडिलासारखा होता. मला आणि हिनमनला तो स्नेहपूर्वक वागवीत असे. मात्र तो दुकानात आला की

आमचा हास्यविनोद आणि अघळपघळ गप्पा एकदम बंद व्हायच्या. हार्वे क्रेगची बायको बुटकेली पण देखणी होती. दुपारच्या आत ती घरी परत जात असे.

हिनमनबरोबर काम करणं मला आवडायचं. शिडशिडीत बांध्याचा, काळसर वर्णाचा, रेखीव मिशांचा हिनमन, एडगर ॲलन पोसारखा दिसे. हिनमन हसला की त्याचं हास्य त्याच्या डोळ्यावाटेहि उतू जायचं. औषध तयार करण्याचं काम त्याला आवडत असे आणि तो ते मनःपूर्वक करीत असे. या विषयावर त्याचं वाचनहि उल्लेखनीय होतं. अद्ययावत औषध त्याच्या माहितीचं असत. त्याची विनोदबुद्धि अतिशय तल्लख होती. एकदा एका दुकानात घडलेली एक गमतीची गोष्ट त्यानं मला सांगितली. उन्हाळ्याचे दिवस होते. एका रविवारी एक मुलगा एका दुकानात आला आणि दहा सेंट्स किमतीचा 'ॲसाफेटिडा' हिंग मागू लागला. दुकानातल्या नोकरांनी ती बाटली काढली. दहा सेंट किमतीचा हिंग जोखला आणि पुन्हा शेल्फवर चढून ती बाटली ठेवून दिली. हिंग बांधून त्यांनी तो त्या मुलाच्या हातात दिला. मुलगा म्हणाला, "माझ्या नावाचं बिल करून द्या." कारकुनानं विचारलं, "तुझं नाव काय?" मुलगा उत्तरला, "माझं नाव ऑगस्ट शिमेल्डरफर (August schimmelderfer)" ते नाव ऐकताच तो कारकुन एकदम चिडून ओरडला, "आधी चालता हो. दहा सेंट्स एवढ्या कमी मोबदल्यात ॲसाफेटिडा आणि शिमेल्डरफर या दोन शब्दांची लांबलचक स्पेलिंग लिहिण्याची माझी मुळीच तयारी नाहीं!"

औषध तयार करायच्या खोलीत एक भलं मोठं पुस्तक होतं. वेब्स्टरच्या डिक्शनरी-शिवाय एवढ्या दांडग्या ग्रंथाला मी पूर्वी कधीच हात लावला नव्हता. या ग्रंथाचं नाव 'धी फार्माकोपिया' असं होतं. या ग्रंथात सर्व औषधांची नावं आणि त्यापासून येणारे गुण यांचं यथासांग वर्णन होतं. अधूनमधून हा जाडजूड ग्रंथ मी चाळीत असे. या ग्रंथराजातल्या कांहीं ओळी वाचायच्या आणि त्यांचा अर्थ कळला नाहीं की हिनमनला प्रश्न विचारायचा असा माझा क्रम चालला होता. परंतु हिनमन माझ्या प्रश्नांच्या भडिमारानं कधीहि वैतागला नाहीं. आपलं ज्ञान जमेल तेवढं दुसऱ्याला द्यावं—विशेषतः तरुण मुलांना द्यावं असं त्याला फार वाटायचं.

त्यानंतर जाहिरातींचं वर्तमानपत्र काढण्याचा मी धंदा केला. जॉन जॉडिन्सने माझ्या डोक्यात ही कल्पना भरवली. जाहिरातींची अनेक वर्तमानपत्रं त्याच्या-जवळ होती. 'कम्फर्ट' नावाचं एक वर्तमानपत्र त्यानं मला दाखवलं. या

वर्तमानपत्राचे एक लक्ष वर्गणीदार होते. दुसर कुठलच वर्तमानपत्र एवढ खपत नसे. कम्फर्टमध्यें औषध, कोंबड्या, चाकुसुऱ्या, खेळणी, वाद्य, स्वस्त घड्याळ —अशा सर्वतऱ्हेच्या जाहिराती असत. अशी जाहिरातीची वर्तमानपत्र काढून अनेकानी खूप पैसा केल्याच जॉनन मला सांगितल. जॉनने दहा डॉलर्सना छापण्याच लहानस यत्र आणि थोडाफार टाइप विकत घेतला होता. या छोट्या यत्रात पाच्च वाय चार इचाचा कागद छापून निघे. माझ्याजवळची तीन डॉलर्सची शिल्लक मीं या धद्यात गुतविली. मी आणि जॉन दोघहि भागीदार होतो. जो काहीं फायदा होईल तो दोघानी अर्धा अर्धा वाटून घ्यायचा अस आमच ठरल होत.

जाहिरातीच वर्तमानपत्र सुरू करायच आमच नक्की ठरल. जॉन म्हणाला, "हे पाहा, जाहिरातीशिवाय आपल्या वर्तमानपत्रात आपण काहींच छापणार नाही, तेव्हा इतरत्र आपल वर्तमानपत्र खपेल अशी आशा धरण्यात काही अर्थ नाही. आपल्या वर्तमानपत्राची किमत आपल्याला एक सेंट देखील ठेवता यायची नाही तेव्हा तेच नाव आपण आपल्या वर्तमानपत्राला ठेवू." आम्हीं आमच्या वर्तमानपत्राच नाव ताबडतोब 'नॉट ए सेंट' अस ठेवल. आम्हीं आमच्या वर्तमानपत्राच्या साठ प्रती काढीत असू. नॉट ए सेंट चे एकूण दोन अक निघाले. आमच्या या वर्तमानपत्रात आम्ही कोणकोणत्या जाहिराती छापल्या होत्या ते सगळ काहीं मला नीटस आठवत नाहीं. परतु एक सेकडहॅड वॉटरबेरी घड्याळ, काही सेकडहॅड सुऱ्या आणि पुस्तक या तीनच जाहिराती माझ्या लक्षात राहिल्या आहेत. आमच्या वर्तमानपत्रासाठी लागणारा पोस्टाचा खर्च देखील आम्हाला परवडेना. काहीं प्रती आम्ही आमच्या मित्राना देत असू, आणि उरलेल्या घरीच ठेवत असू. घरात ठेवलेल्या या गठ्ठयाकडे पाहून आम्ही प्रकाशक आहोत अस छाती पुढें काढून आम्ही म्हणत असू. आमच वर्तमानपत्र छापण्याच काम आम्ही गोठ्यात गवत साचवून ठेवण्याच्या खोलीत करीत असू. थडीच्या दिवसात हात नुसते गारठून जायचे. मग धावतपळत घरात जायच. शेगडीपुढे उभ राहून अग थोड शेकवून घ्यायच, आणि पुन्हा गोठ्यात येऊन छपाईच्या कामाला सुरुवात करायची. कधीतरी अचानक वर्तमानपत्राचा आमचा हा धदा भरभराटीला येईल आणि आम्ही खोऱ्यान पैसा ओढू अस आम्हाला वाटायच. दोन अंक निघाल्यानतर आमच वर्तमानपत्र बद पडल. वर्तमानपत्र सुरू करायच ठरवताना आम्ही जसे हसलो होतो तसेच मनमोकळे-पणान हे वर्तमानपत्र बद पडल्यावरहि आम्ही हसलो.

वर्तमानपत्राचा धंदा संपला. आता मीं कुंभारकीच्या धंद्यात शिरायचं ठरवलं. डे स्ट्रीटच्या पूर्वेला एका कुंभाराचा लहानसा कारखाना होता. चाक फिरवून भांड्यांना आकार देणारे कामगार तळमजल्यावर असत. चाकावर माती टाकून त्याला मनाजोगता आकार देण्याचं काम मोठं हुन्नरीचं असे. ही कला तुम्हांला अवगत झाली की कुंभारकीच्या धंद्यातलं मोठंच रहस्य तुमच्या हातीं लागलं असं म्हणायला हरकत नाहीं. चाक फिरवणाऱ्या माणसाच्या जवळच मातीचा गोळा तयार करून देणारा मनुष्य असतो. मी हा गोळा तयार करून देण्याच्या कामावर राहिलों होतों. जें भांडं तयार करायचं त्याच्या वजनाची माती एका लाकडी तराजूवर जोखून प्रथम मी घेत असे हा मातीचा गोळा तळहातावर धरून त्याला बोट न लावता तो हवेंत उचलायचा आणि एका ताणलेल्या तारेवर त्याचे बरोबर दोन भाग करून ते फळीवर टाकायचे. मातीचा गोळा हवेंत उचलल्यामुळें मनगटावर ताण पडायचा. आठवडाभर माझं मनगट ठणकत होतं. पण नंतर मला सवय झाली, आणि मातीचे गोळे करणाऱ्या इतर कामगारांपैकींच मी एक आहे असं समजून मी सहजगत्या तें काम करूं लागलों. चाक चालवणारा माणूस हे तयार केलेले गोळे लोखंडाच्या फिरत्या चाकावर टाकायचा. चाक फिरता फिरता या मातीवर पाणी शिंपडून हातातल्या थापटण्यानें आकार द्यायचा. हळूहळू भांडं तयार झालं की तें सुकत ठेवण्यासाठीं मी तें घेऊन जात असें. भांडं सुकलं की कारखान्याच्या बाजूला असलेल्या भट्टींत ते भाजण्यासाठीं जायचं. याच कारखान्याच्या वरच्या मजल्यावर आणखीहि कांहीं कुंभार होते, परंतु ते साच्यांत माती घालून भांडीं बनवीत चाकावर माती घालून भांडी करणाऱ्या कुंभाराइतकं कौशल्याचं हें काम नव्हतं एके दिवशीं सकाळींच मला कळलं कीं आमच्या कुंभारशाळेला आग लागली. कारखान्याजवळ जाऊन पाहतों तर काय, तो कारखाना आधल्या रात्रीं अग्नीच्या भक्ष्यस्थानीं पडला होता. अजूनहि भिंती धुमसत होत्या. धुराचे लोट संथपणें आकाशांत जात होते. माझा कुंभारकीचा व्यवसाय इथंच संपला—आणि तोहि कायमचा!

मुख्य रस्त्यावरून जॉर्ज या तलावाकडे जाणारा रस्ता खडकाळ टेकडीवजा होता. ट्रॉली गाड्या या रस्त्यावरून नेणं आणणं मोठंच बिकट होतं. हा रस्ता वाहतुकी-साठीं नीट करायचा असं सर्वांनीं ठरवलं. माणसं खेचरांचे तांडे घेऊन कामाला लागली. मला इथें पाणी आणणाऱ्या पोऱ्याचं काम मिळालं. पाण्याच्या पपावरून दोन दोन बादल्या पाणी भरून मी आणीत असें. दर बादलीबरोबर दोन जस्ताची

भाडी असत. मी पाणी भरून आणल की कामगार म्हणायचे, "ह, मला दे बघू थोड पाणी. आता थोड इकडे टाक" केवळ माणसानाच पाणी द्यायच असत तर हे पाणी आणणाऱ्या पोऱ्याच काम मला परवडल असत, परतु ओझी वाहणाऱ्या त्या खेचरासाठीहि मलाच पाणी आणाव लाग एखाद्या खेचराने बालदीला तोड लावल की एका सपाट्यात ते ती बादली रिकामी करून टाकी वाण्याच्या जागेपासून बऱ्याच दूर अतरावर हा पाण्याचा पप होता—जवळजवळ शभर यार्ड म्हणा ना. पुढे रस्ता नीट झाल्यावर माझ हे कामहि सपल.

विन्फिल्ड स्कॉट कॉव्हन या माणसान जॉर्ज तलावात एक बोटक्लब सुरू केला होता. तलावाच्या आसपास ट्रॉली गाड्या याबत असत. इथेच त्यान एक छोटेस उपाहारगृहहि उघडल होत. एका उन्हाळ्यात मी तिथ नोकरी केली. विन्फिल्ड कॉव्हन आपल्या कामाच्या बाबतीत वाजवीपेक्षा फाजील दक्षता बाळगीत असे. हे कस होईल? ते कस होईल? या चिंतेचा भार सारखा त्याच्या डोक्यावर असायचा. कुठ थोडस काही चुकल की त्या लहानशा चुकीमुळ सगळच बिघडणार आहे अस वाटून त्याची धावपळ सुरू व्हायची. तलावात फिरण्यासाठी लोकाना होड्या आणि वल्ही काढून द्यायची हे माझ काम होत. एका होडीसाठी तासाला पचवीस सेट्स भाडे पडायच या कामाबरोबरच उपाहारगृहातले आइस्क्रीम, केक्स, सरबत इत्यादि जिन्नस विकण्याच कामहि मी करीत असे. बॉर्बीट या माणसाची एक छोटीशी स्टीमबोट होती. दहाबारा माणस तिच्यात बसू शकतील एवढी ती होती तलावाच्या टोकापर्यंत जाऊन यायच भाडे माणशी पचवीस सेट होत. नॉक्स काउटी शहरात इतकी सुदर बोट दुसरी नाही याविषयी लोकाच एकमत होत हे पूर्ण सत्य होत. कारण नॉक्स काउटी विभागात दुसरी बोटच मुळी नव्हती. बॉर्बीटच्या या बोटीच नाव होत 'लेडी वॉशिंग्टन'. कधी कधी त्याची सर्व बोट उतारूनी भरून जाई. पण कधी कधी मात्र एकहि उतारू तिच्या बाजला फिरकत नसे. बॉर्बीट चागला उचापुरा, बळकट बांध्याचा, चपळ माणूस होता. कोणत्या परिस्थितीत काय करायच हे त्याला नेमक ठाऊक असे. पूर्वी त्यान पोलिसात काम केलेल होत अस मी ऐकल. माझी खात्री आहे की बॉर्बीट हा त्या वेळी उत्कृष्ट पोलीस असला पाहिजे. त्याची आणि माझी चागली गट्टी जमली.

सारखी कुरकुर आणि चिंता करणाऱ्या विन्फिल्ड कॉव्हनची नोकरी सोडताना मला मुळीच वाईट वाटल नाही, परतु बॉर्बीटचा सहवास मात्र यापुढे आपल्याला मिळणार नाही याची मला खत वाटली. मी जाताना तो मला म्हणाला की, हिवा-

ळ्यात रात्रीच्या वेळी पहारेकऱ्याचं काम त्याला मिळण्याचा संभव आहे. मी पुन्हा भेटेन असं त्याला सांगितलं, परंतु त्याची माझी पुन्हा कधीच भेट झाली नाही.

उष्णतामान शून्यावरून पंधरावर आलं की जॉर्ज तलावात बर्फ-साठवणीचा हंगाम सुरू व्हायचा. रात्री सात वाजल्यापासून पहाटे सहा वाजेपर्यंत रात्रपाळीचे कामगार तिथं काम करू लागायचे. बर्फाचा थर चांगला बारा ते अठरा इंच जाड असायचा. मला इथं तराफेवाल्याचं काम मिळालं. कापलेल्या बर्फाचा पंधरा फूट लांब आणि दहा फूट रुंद तराफा ढकलत ढकलत बर्फ जिथं साठविलं जाई त्या घरात घेऊन जायचा असं हे काम होतं. बर्फाचा हा तराफा बर्फ घरात आणल्यानंतर त्याच्या लहानलहान लाद्या करण्यात येत आणि त्यावर भुसा पसरून उन्हाळ्यासाठी तो साठविण्यात येई.

थंडीचे बूट आणि गरम कपडे माझ्याजवळ होते, त्यामुळं इथं काम करायला मला फार आवडायचं. हवा चांगली खुसखुशीत असायची. काम करता करता वर नजर करून पाहिलं की, नक्षत्रांनी मोहरलेलं आकाश दृष्टीला पडायचं. कधी कधी तुटलेल्या उल्केची झळाळत जाणारी बाणासारखी रेषा दिसायची. यापूर्वी मी कधीहि रात्रपाळीचं काम केलेलं नव्हतं. रात्रपाळीच्या या कामामुळं मला आकाशाकडे, निरनिराळ्या ताऱ्याकडे, त्यांच्या विशिष्ट जागाकडे डोळे भरून पाहण्याची संधि लाभली. कधी कधी या विराट नक्षत्रसृष्टीकडे पाहताना मला वाटायचं की या प्रचंड विश्वापुढं माणूस हा प्राणी किती क्षुद्र आहे! रात्रीच्या वेळी बर्फाचे तराफे ढकलीत आम्ही कामगार येऊ लागलो की त्या अंधारात एकमेकाच्या नावांनी हाका मारून 'पडलात तर थंडगार पाण्यात पडाल रे' अशा सावधगिरीच्या सूचना आम्ही एकमेकांना देत असू.

बर्फाचे तराफे ढकलण्याचं काम मी एक आठवडा केलं. दुसऱ्या आठवड्यात माझी नेमणूक बर्फघरात झाली. इथं आणलेल्या तराफ्याच्या तीन फूट लांब आणि दोन फूट रुंद लाद्या तयार करून त्या ओळींनं रचून ठेवायच्या हे माझं काम होतं. लोखंडाच्या काठीनं या जड लाद्या ढकलून ओळींनं रचाव्या लागत. हे काम अंगमेहनतीचं होतं. एखाद्या खेचरासारखे इथं कष्ट करावे लागत. लाद्या ढकलून ढकलून माझी पाठ आणि खांदे ठणकू लागले होते. हे काम माणसाचं नसून यंत्राचं किंवा खेचराचंच आहे याविषयी मला मुळीच संशय उरला नाही. पहिल्याच दिवशी सकाळीं मी रात्रपाळी संपवून घरीं गेलो तेव्हा माझं अंग मनस्वी ठणकू लागलं होतं. कशीबशी मी माझी न्याहरी उरकली आणि बिछान्यावर जाऊन पडलो.

मी झोपण्याचा खूप प्रयत्न केला परतु साऱ्या शरीराला जबर ठणका लागल्यामुळे दुपार उलटली तरी माझ्या डोळ्याला डोळा लागेना दुपारनतर मला जरा झोप येऊ लागली. तरी स्नायूना कळ येऊन मी तीनचार वेळा तरी अवचित जागा झालो. कामाला निघण्याची वेळ झाली अस म्हणून आईन मला उठवल, त्या वेळी आपण नुकतेच झोपत आहोत अस मला वाटत होत. कसली झोप आणि कसल काय! तसाच धडपडत उठलो आणि कपडे करण्याच्या तयारीला लागलो.

दुसऱ्या रात्री काम करता करताच मी विलक्षण थकलो थोडीशी विश्राति मिळावी म्हणून मी हळू हळू काम करू लागलो. आमच्या मुकादमाच्या नजरेतून ही गोष्ट सुटली नाही माझ्याजवळ येऊन तो हलक्या आवाजात मला म्हणाला, "भरभर त्याच्या टकल, सडबर्ग" ही गोष्ट त्याने जर माझ्या अगावर खेकसून मला सागितली असती तर तिथल्या तिथे कामाचा राजिनामा देऊन मी परतलो असतो परतु त्या देखरेख करणाऱ्या माणसाने विलक्षण आर्जवाने मला हे सागितल. दुसर अस की मी त्याच्या लेखी नुसताच एक निर्जीव नबर नव्हतो. त्याने माझे नाव घेऊन मला हाक मारली होती म्हणजे मला तो व्यक्तिशः ओळखत होता कामावर जाण्यासाठी ज्या स्वरात माझी आई मला हाक मारून उठवीत असे तशाच स्वरात त्याने मला भरभर काम करण्याची सूचना दिली होती त्या माणसाविषयी मला मनोमन आदर वाटला कधी काळी अशा तऱ्हेच्च इतर कामगारावर देखरेख करण्याच काम जर माझ्या वाट्याला आल तर मी त्याच्यासारखाच माणुसकीन वागेन आणि बोलेन अस मी ठरवल. सकाळचे सात वाजले की एकदाच हे काम सपेल आणि मग पुन्हा म्हणून मी या गुरासारखे कष्ट करावे लागणाऱ्या नोकरीवर येणार नाही अस मी ठरवल. पण इतक्यात तो मुकादम माझ्याजवळ आला आणि म्हणाला, "भरभर काम कर, सॅडबर्ग. आता थोडेच दिवस राहिलेत हा हगाम सपला कीं आपली सगळ्याचीच सुटका होणार आहे." या त्याच्या वाक्याने या कष्टाच्या कामाकडे पाहण्याची माझी दृष्टीच बदलली. मी घरी आलो तेव्हा मी स्वस्थपणे जेवू शकलो माझ अंगहि पूर्वीइतक ठणकल नव्हत, आणि मला झोपहि चागली लागली. तो आठवडा सपला की बर्फ-साठवणीचा हगाम सपल्यामुळे आपोआपच ते कामहि थाबणार होत. या कामाचे मला दर रात्रीला एक डॉलर आणि पचवीस सेंट्स मिळत असत. इतके पैसे मला पूर्वी दुसऱ्या कोणत्याहि कामाचे मिळालेले नव्हते. हें काम करीत असताना एक गोष्ट माझ्या लक्षात आली ती अशी कीं, अनाठायीं

कष्ट न घेता सहजपणे काम कसं करावं हे कौशल्य मला अवगत नव्हतं. माझ्या बरोबरच्या इतर कामगारांनी पूर्वी रेल्वे रस्त्यावर वेगवेगळ्या तऱ्हेची मजुरीची कामं केलेली होती. माझा बाप मी घरी एखादं काम करताना सांगत असे, "शॉली, सावकाश काम कर रे, धडपड चावपळ करू नकोस." माझ्या बापानं सांगितलेलं हे सूत्र माझ्या बरोबराच्या इतर कामगारांना त्यांच्या पूर्वीच्या अनुभवामुळं अवगत होतं. त्यामुळं माझ्याइतकंच काम करूनहि ते मात्र माझ्याइतके थकत नसत.

वयाच्या सोळासतराव्या वर्षी वुइल्यम्स नावाच्या माणसानं तयार केलेल्या रेसच्या मैदानावर मी वारीकसारीक मजुरीची कामं केली होती. घोड्यांना पाणी दाखवणं, त्यांचा घाम पुसून त्यांना स्वच्छ करणं अशाप्रकारची ही कामं असत. रेसचा हंगाम सहा आठवड्यांचा असे. तोंवर माझं काम चाले. मला या कामा बद्दल अर्धा-पाव डॉलर मिळत असे. त्यातून मीं फार तर दहा डॉलर जमवले असतील. परंतु पगाराबरोबरच मला रेसचा पासहि मिळायचा. मी कोणत्याहि रेसला केव्हांहि जाऊन बसू शकत होतो. याच वेळीं मी अनेक नावाजलेल्या घोड्यांना शर्यतींत धावताना पाहिलं.

सी. डब्ल्यू. वुइल्यम्स हा गृहस्थ आयोवाहून गेल्सबर्गला आला होता. आयोवा येथे त्याचं पतंगाच्या आकाराचं रेसचं मैदान होतं. काही लोक म्हणत की, पतंगाच्या आकारापेक्षाहि या मैदानाचा आकार इंग्रजी आठ या आकड्या सारखाच होता. वुइल्यम्स हा प्रथम टेलिग्राफ ऑपरेटर म्हणून नोकरीला होता.

एकदा त्याच्या डोक्यात काय शिरलं कुणास ठाऊक, त्यानं दोन घोड्या विकत घेतल्या. लोकांना अर्थातच हे मूर्खपणाचं वाटलं. पण जागतिक विक्रम मोडणारे एक्स्टेल आणि अलटन हे घोडे याच घोड्यांपासून आले. अठराशें एकूणनव्वद साली एक्स्टेलनं जागतिक विक्रम मोडून नवा विक्रम प्रस्थापित केला. एका क्षणात त्याचं नाव जगभर झालं. एका कंपनीनं तो घोडा एकशेपन्नास हजार डॉलर्सना विकत घेतला. असं म्हणतात की, एवढी प्रचंड किंमत यापूर्वी कुठल्याहि घोड्याला आलेली नव्हती.

वुइल्यम्स अठराशें चाऱ्याण्णवमध्ये गेल्सबर्गला आला. नॉक्सव्हिले रोडवर एकशेबारा एकर जमीन विकत घेऊन त्यानं एक नव्या पद्धतीचं रेसचं मैदान आखलं. या मैदानावर वर्षातले सहा आठवडे रेसचा हंगाम सुरू असायचा. जगात नावाजलेले घोडे या मैदानावर धावायचे. अॅलिक्स या घोडीनं जागतिक विक्रम मोडल्याचं मी याच मैदानावर पाहिलं.

त्या दिवसापासून देशातल्या घोड्यांचा षोक असलेल्या लोकांच्या नजरा गेल्सबर्गकडे वळू लागल्या. वुइल्यम्स हा या आकर्षणाचा केंद्रबिंदु होता. घोड्यांची पैदास करणाऱ्या आणि त्यांना शिक्षण देणाऱ्या लोकांच्या क्षेत्रात वुइल्यम्सने फार मोठं नाव कमावलं ठिकठिकाणचे घोड्यांची पैदास करणारे लोक त्याला भेटण्यासाठी गेल्सबर्गला येथं येऊ लागले अनेक शर्यती जिंकणाऱ्या उत्तम घोड्यांच्या अंगात वुइल्यम्सच्याच घोड्यांचं रक्त खेळत आहे हे सर्वांना ठाऊक होतं

हळूहळू रेसचा हा धंदा बसत चालला. वुइल्यम्सने आपले सगळे घोडे चांगल्या किंमतींना विकून टाकले आणि ते पैसे त्याने इतरत्र गुंतविले. वुइल्यम्सची एक आठवण माझ्या मनात सदैव घोळत राहिली. ऑक्टोबर महिन्यातली ती एक सकाळ होती वातावरणात थोडंसं धुकं होतंच. आपल्या ॲलर्टन या घोड्यावर बसून वुइल्यम्स त्यानेच आखलेल्या त्या रेसच्या मैदानावरून धीमेपणाने जात होता. तो ॲलर्टनला दामटीत नव्हता—त्याला सावपणे चालवीत होता. पूर्वीचा प्रचंड वेग त्या नावाजलेल्या घोड्यापाशी आता उरलेला नव्हता, परंतु त्याचं रक्त मात्र नंतर नावाजलेल्या अनेक घोड्यांच्या अंगात होतं तेच त्याचं भूषण होतं, तीच त्याची पदवी होती

# काम आणि गंमत

एकदा रात्री ऑपेरागृह पेटल्याची बातमी कुणीतरी आम्हाला येऊन सांगितली. मेनस्ट्रीटच्या कोपऱ्यावर मी तसाच धावत गेलो, आणि ते पेटलेले थिएटर पाहत उभा राहिलो. मध्यरात्रीपर्यंत ते ज्वाळांचे तांडव पाहत मी तसाच उभा होतो. थिएटर अग्नीच्या भक्ष्यस्थानी पडताना मला पाहवेना. अनेक सुंदर आठवणी त्याच्याभोवती गोळा झाल्या. किकापू जातीच्या रेड इंडियन्सचीं युद्धगीत आणि त्यासोबत केलेलीं त्यांचीं नृत्यं मी याच थिएटरमध्ये पाहिलीं होतीं. मला आठवलं, तीं गीतं ऐकून आल्यानंतर आम्ही घरी येऊन तसं अनुकरण करण्याचा प्रयत्न करीत असू. या रेड इंडियन्सच्या कंपनीचा मालक एक गोरा माणूस होता. स्टेजवर येऊन मधूनमधून तो 'चमत्कार गुण देणाऱ्या' काही औषधांची जाहिरात करायचा. तो सांगायचा, "तुम्हाला जर संधिवाताचा त्रास होत असेल तर आमच्याजवळ मिळणारं किकापू रेडइंडियन सर्पाचं तेल दुखणाऱ्या जागेवर चोळा. पोटात दुखत असेल तर याच तेलाचे दोन चमचे पोटात घ्या. एकदा अनुभव घ्या आणि खात्री करा." त्याचं ते जाहिरातीचं भाषण आम्ही पोरं घरी येऊन त्याच्या विशिष्ट लकबीने म्हणत असू.

या जळत असलेल्या स्टेजवरच मी पूर्वी डॉक्टर ओ लियरी याचं भाषण ऐकलं होतं. भाषणाला तिकिट लावलेलीं नव्हतीं. शाकाहारी भोजन हेच आरोग्यवर्धक असतं, मांसाहाराचा त्याग करणं आवश्यक आहे या विषयाचं प्रतिपादन डॉक्टर ओ लियरी आपल्या भाषणातून करीत असे. आमच्या गावात त्यानं जवळजवळ चार आठवडे मुक्काम ठोकला होता. या वास्तव्यात शाकाहाराची कैफियत मांडणारी एक व्याख्यानमालाच त्यानं दिली. मांसाहार केल्यामुळं शक्ति क्षीण होते आणि दिवसभर थकवा आल्याची भावना होत राहते असं त्यानं सांगितलं होतं. 'तुम्ही शाकाहार करून पाहा, तुमच्या उत्साहात आणि शक्तीत प्रचंड वाढ होईल' असा त्यानं निर्वाळा दिला होता. त्याच्या या भाषणाचा माझ्या मनावर इतका परिणाम झाला की जवळ जवळ दोन आठवडे

मीं मासाशन करण्याच सोडून दिल. परतु शाकाहार करूनसुद्धा पूर्वी जस मला थकल्यासारख वाटायच तसच आताहि वाटू लागल मी पुन्हा मासाहार घ्यायला सुरुवात केली मासाहारापासून मला कधीहि कसला अपाय झाला नाही स्वाभाविकच, डॉक्टर ओ लियरीच सगळ तत्त्वज्ञान मी पार विसरून गेलो.

याच थिएटरमध्ये मीं गॅलरीच दहा सेटच तिकीट काढून मेस्मेरिझमचे प्रयोग पाहिले होते. प्रयोग करणारा मनुष्य आपल्यापुढे एका माणसाला उभा करायचा. त्याच्या डोळ्यात तो टक लावून पहायचा. काही काळान तो समोरचा माणूस स्टेजवरच्या गालीच्यालाच पाणी समजून तिथ पोहायला लागायचा. दुसरा एक असाच चमत्कारिक प्रयोग त्यानं केलेला मी पाहिला होता. एका जिवत माणसाच डोक एका टेबलावर आणि पाय दुसऱ्या टेबलावर ठेवल गल त्याच्या शरिराचा मधला भाग त्या अवस्थेत एखाद्या लाकडाच्या ओडक्यासारखा ताठ राहायचा. मग मेस्मेरिस्ट त्या धडावर एक दगड ठेवायला सागायचा वेल हॅालकॉम आपला हातोडा हातात घेऊन या दगडावर जोरजोराने घाव हाणायचा काही वेळानं तो दगड फुटून जायचा इतके सगळे होत असताना त्या माणसाचे शरीर तसच ओडक्यासारख ताठ असायचे एवढे झाल्यावर तो मेस्मेरिस्ट पुन्हा हातवारे करून त्या माणसाला म्हणायचा, “ह आता चालू लाग.” आश्चर्य अस की लगेच तो स्टेजवर उभा राहून टाळ्याच्या कडकडाटात प्रेक्षकाना लवून मुजरा करायचा लोकाना हा प्रयोग खूपच आवडायचा प्रयोग पाहून झाल्यावर आम्ही म्हणायचे, “हा काहीं चमत्कार नव्हे परतु आश्चर्य वाटायला लावणारी हातचलाखी मात्र या माणसाजवळ निश्चित आहे.”

थिएटर माझ्या डोळ्यापुढे भराभर पेटत असलेल मी पाहत होतो. त्या ज्वाळाप्रमाणेच माझ्या मनात अनेक आठवणी एकामागून एक उसळत होत्या. गटिसबर्गच्या युद्धाची चित्र मी येथे पाहिल्याच मला आठवल. एका विशिष्ट क्रमान हीं चित्र पडद्यावर चिकटविली जात आणि मग एकामागून एक हे पडदे सोडण्यात येत. एकामागून एक दिसणाऱ्या या चित्रातून युद्धाच सर्व वातावरण उभ राहत असे. अधूनमधून हातात लाब काठी घेतलेला एक माणूस काही मुद्दे आम्हाला स्पष्ट करून सागायचा. चित्राचे हे पडदे अगदी मलिन झाले होते. हीं चित्र लाब काठी हातात घेऊन दाखविणाऱ्या माणसाची दाढी इतकी तेलकट होती की तिचा रग कोणता आहे हे सागण मोठ कठिण गेल असत. चागले कपडे घालून एखाद्या माणसाने झोपून द्याव आणि तेच चुरलेले, सुरकुतलेले

कपडे घालून बाहेर पडावे तसा तो माणूस दिसायचा बोलता बोलता मध्येच त्याचा आवाज फाटत असे. तो जे काही सांगत असे तेच अनेक प्रयोगांना त्याने सांगितल्यामुळे एखादी निर्जीव रेकॉर्ड लावावी तसे तो बोलत होता. ऐकणाराला सारखे वाटत राहायचे की हा बोलतो आहे खरा, पण याचे चित्त मात्र कुठेतरी दुसरीकडेच आहे. त्या माणसाची ती केविलवाणी अवस्था पाहून मला त्याची दया यायची

शेक्सपीयरचे 'हॅम्लेट' नाटक मी याच स्टेजवर पाहिले होते. नाटकाच्या शेवटी होणारे द्वंद्वयुद्ध पाहण्याचेच मला कुतूहल होते एरव्ही त्यावेळी मला त्या नाटकात विशेष रस वाटला नाही याच स्टेजवर मी जॉन पीटर ॲल्टगेल्ट यांचे भाषण ऐकले इलिनॉयचा गव्हर्नर म्हणून निवडून येण्याची त्याची इच्छा होती. त्याची अनेक चित्रे आणि व्यंगचित्रे, त्याच्यावरचे स्तुतिनिंदापर लेख मी वृत्तपत्रांतून वाचलेले होते विलक्षण आवेशात हातवारे करीत आपल्या भाषणाने तो विरोधकांना भरडून काढत असला पाहिजे अशी माझी त्याच्याविषयी कल्पना झाली होती परंतु प्रत्यक्ष मी भाषण ऐकले तेव्हा मी थक्कच झालो भाषणाच्या सुरवातीला ॲल्टगेल्ड जसा उभा होता तसाच तो शेवटपर्यंत उभा राहिला होता कसल्याहि तऱ्हेचे आक्रस्ताळे हातवारे तर सोडाच, पण आपल्या दीड तासाच्या भाषणात त्याने एकदाहि हात वर उचलला नाही एकदोनदाच त्याने एक मुद्दा समजावून सांगताना आपला हात किंचित् वर केला होता—आजारी माणसाच्या कपाळाला ताप पाहण्यासाठी लावतात तसा तो अत्यंत शांतपणे बोलत होता आम्ही त्याच्याचप्रमाणे त्याचे विचार शांतपणे समजून घ्यावे अशी त्याची अपेक्षा होती त्याचे विचार सगळेच मला पटले असे नव्हे, परंतु त्याच्या भाषणाच्या विशिष्ट शैलीमुळे त्याने माझ्या मनात एक प्रकारचा विश्वास निर्माण केला. आणि त्याच्यापेक्षा त्याचे विरोधकच मला अधिक संशयास्पद वाटू लागले.

नवे थिएटर ब्रॉड स्ट्रीटवर उभारण्यात आले. काही काम नसले आणि काय करावे असा प्रश्न पडला की मी या थिएटरकडे जात असे हे नवे थिएटर अगदी अद्ययावत् पद्धतीने बांधलेले होते. ब्रॉडवेहून येणाऱ्या कुठल्याहि नाटक कंपनीचे नाटक होण्याइतका या थिएटरमधला रंगमंच मोठा होता त्यामुळे ब्रॉडवेहून दौऱ्यावर निघालेली कुठलीहि नाटक कंपनी काही दिवस तरी गेल्सबर्गला मुक्काम करातच असे.

थिएटरमधील बारीकसारीक काम मी करीत असे. या कामाबद्दल मला थोडे-

फार पैसे मिळत, पण बहुधा नाटकाचा पासच मला कामाच्या मोबदल्यात मिळे रंगमंचावर ऑस्कर जॉन्सन सुतारकाम करीत असे. सर्वजण त्याला हम्की या टोपणनावानेच ओळखत आमच्याकडून घाईच्या वेळी भरभर काम झाली नाहीत की तो आमच्या अंगावर ओरडत असे आम्हाला ओरडण्याचा त्याला अधिकार आहे असंच आम्ही मानत असू. चार्ल्स रोज हा नेपथ्याची व्यवस्था पाहायचा सगळेजण त्याला कली याच टोपणनावाने ओळखीत असत. नेपथ्यविभागाची सगळी काम त्याला बिनचूक ठाऊक होती. त्याच्या कामाच्या बाबतीत कुठलाहि मुद्दा वादविवाद करून तो पटवून देऊ शकत असे आपल्या हाताखालच्या लोकाकडून कशी काम करून घ्यावी हे त्याला फारच चांगले कळत असे. त्यामुळे त्याचे हुकूम पाळायला आम्हाला मनापासून आवडायचे. नाटकात बारीकसारीक काम करायला नेहमीच काही माणसं लागतात अशी माणसं नाटक कंपनीच्या दाऱ्यावर नसतात ज्या ज्या गावी नाटक कंपनी जाईल त्या त्या गावातल्या काही माणसाना रोजगारीच्या बोलीवर कामावर घेतल जात कधी कधी मलाहि ही काम करण्याची संधि मिळे एकदा नाटकात एक आग लागल्याचा प्रवेश होता त्यावेळी स्टेजवर आरडाओरडा करीत सर्व सामान उचलून धावाधाव करणाऱ्या लोकात मी होतो !!

नाटकातला एक प्रवेश संपून पडदा पडला की दुसऱ्या प्रवेशाच्या तयारीसाठी पडदे बदलण, स्टेजवर नवीन फर्निचर आणून त्याची मांडामांड करण इत्यादि काममुद्धा मी करीत असे हे काम संपल्यावर स्टेजच्या मागल्या बाजूला आम्ही उभे राहत असू अशा वेळी स्टेजवर प्रवेश करणारे विख्यात नट आणि नटी आम्हाला अगदी जवळून पाहायला मिळत एखादा विनोदी काम करणारा नट गमतीचा पोशाख घालून गंभीर चेहरा करून आपल्या प्रवेशाची वाट पाहत उभा असे. क्षणार्धात तो रंगमंचावर प्रवेश करी. झगझगीत प्रकाशात उभा राहून तो वेडीवाकडी तोंड करीत, विदूषकी पद्धतीने हातवारे करी आणि प्रेक्षकात मोठा हशा पिकत असे. कधीकधी एखादा नट रंगमंचावर प्रवेश करण्यापूर्वी हलक्या आवाजात आपल्या भाषणाच्या प्रारंभीची वाक्य पुटपुटत असताना दिसे. आपल काम संपल्यावर हे नट धापा टाकीत, घामाने चिंब भिजून स्टेजच्या मागच्या बाजूला परत येत.

रंगमंचावरील मंडपात बसून नाटकातले पडदे टाकण्याचं आणि वर ओढण्याचं कामहि कधीकधी आम्ही करीत असू. इशारा झाला की ठरलेला पडदा वर ओढून

घ्यायचा आणि दुसरा खालीं सोडायचा. चुकून जर नको असलेला पडदा आम्ही सोडला तर कधी आम्हाला चांगलाच दम देत असे. पडदे सोडण्याचं काम करीत असताना अधून मधून आम्हाला नाटक पाहायला सापडे. पण गाणीं मात्र आम्हाला सगळीं ऐकायला मिळत.

'ऑनेस्ट हार्ट्स ॲण्ड विलिंग हॅण्ड्स' या नाटकात जॉन एल सलिव्हन या नटाचं काम मी याच वेळीं अगदी जवळून पाहिलं. सलिव्हन स्टेजवर अगदी सहजपणे प्रवेश करीत असे. प्रेक्षकांची त्याला जराहि भीति वाटत नसे. एका प्रवेशात चिंताग्रस्त होऊन तो टेबलापाशीं बसलेला आहे असा प्रसंग होता. हाताचे दोन्ही कोपर टेबलावर टेकून त्यानं आपले पंजे हनुवटीखालीं ठेवले होते. संकटातून बाहेर पडण्यासाठीं आता बुद्धीची शर्थ केली पाहिजे असा भाव त्याने आपल्या चेहऱ्यावर हुबेहूब आणला होता. अतिशय हलक्या आवाजात पण विलक्षण स्पष्ट उच्चार करून तो पुटपुटला, "आता मला या गोष्टीचा नीट विचार केला पाहिजे." त्याची वाक्य उच्चारण्याची लकब अशी होती की त्याचा प्रत्येक शब्द श्रोत्यांना ऐकू गेला असला पाहिजे. त्यालाहि त्याबद्दल विश्वास वाटत होता. नाटक संपल्यावर नटांची ओळख प्रेक्षकांना करून देण्याच्या वेळी तो श्रोत्यांना उद्देशून एक छोटंसं भाषण करी. भाषणाच्या शेवटीं जनतेला रुबाबात कुर्निसात करून 'मी जनतेचा नम्र सेवक जॉन एल. सलिव्हन' अशी आपली ओळख करून देऊन तो परत फिरत असे.

एकदा फ्री जॉन नॅन्सेन याचं भाषण थिएटरमध्ये झालं. नॅन्सेनचे अनेक लेख मी मासिक पुस्तकांमधून वाचले होते. मी त्याच्या भाषणाला जाऊं शकलों नाहीं. कारण भाषणासाठीं ठेवलेलं पन्नास सेंट्सचं तिकीट काढणं मला परवडलं नसतं. स्टेशन-वर गाडींतून उतरताना मात्र मी नॅन्सेनला अगदी जवळून पाहिलं होतं. हेन्री स्टॅन्ले याचंहि भाषण याच थिएटरमध्ये झालं होतं. स्टॅन्लेलाहि मी स्टेशनवर गाडीतून उतरताना पाहिलं होतं. स्टॅन्ले मला नॅन्सेन इतका आकर्षक वाटला नाही. स्टॅन्लेला एक प्रसिद्ध लेखक म्हणून मी ओळखत होतो. परंतु माझ्या दृष्टीनं नॅन्सेन हा त्याच्याहून अधिक महत्त्वाचा माणूस होता. जीवनात झगडणाऱ्या असंख्य माणसांना प्रेरणा देण्याचं सामर्थ्य नॅन्सेनमध्ये होतं.

या थिएटरमध्ये काम करीत असताना अनेक प्रसिद्ध नाटकं मी पाहिलीं. त्यात बरीच 'नाटकी' नाटकं असायचीं. एखादं घर गहाण पडलेलं असायचं आणि सावकार घरातल्या माणसांना त्रास देत असायचा. अखेरीस त्याची फजीती

व्हायची. एखाद्या माणसान मृत्युपत्र केलेल असायच आणि त्याच्या मृत्यूनतर सगळे वारस ते शोधीत राहायचे यादवी युद्धावरील बहुतेक सर्व नाटकात राष्ट्रराज्य पक्षाचा हेर आणि बडवाल्यापैकी एखादी तरुणी याच प्रेम दाखवलेल असायच शेवट मात्र नेहमीच लग्नात व्हायचा. अनेक प्रसिद्ध वक्त्याना आणि नटनटीना अगदी जवळून बघण्याची सधि मला या थिएटरात लाभली. जेव्हा मला थिएटर मध्ये काम नसे तेव्हा बरेच वेळा तिकीट काढून मी वाद्यसगीताचे कार्यक्रम ऐकण्यासाठी इथे येत असे वाद्यवादनाचे कार्यक्रम करणारे कलावत आपला सच बरोबर घेऊन रस्त्यावरून जाऊ लागले की मी मोठ्या कुतूहलान त्याच्याकडे पाहत असे अॅल फील्ड या विख्यात वादकाचा मी एकहि कार्यक्रम कधी चुकविला नाही बॅन्जो वादनात अॅल फील्डचा हात धरणारा कुणीहि नाही अस माझ मत होत त्याचा कार्यक्रम ऐकला की तिकिटाचे पैसे भरून निघाले अस मला वाटायच स्टेजच्या अगदी जवळच्याच ज्याची तिकिट असत त्याना सभ्यपणे बसून सगळे कार्यक्रम ऐकावे लागत परतु मागच्या बाजूला बसलेले लोक मात्र कुडुम कुडुम आवाज करीत वाटाणे खात बसू शकत कार्यक्रम आवडला की ते मोठ्याने वाहवा करू शकत किंवा कार्यक्रम भिकार होतो आहे अस वाटल की मोठ्या मोठ्यान 'मिआॅऊ मिआॅऊ' असा आवाज करून ते हुर्योहि करू शकत. स्टेजच्या जवळ बसलेल्या माणसाना मात्र यापैकी काहीच करता येत नसे

# धंदा शिकण्यासाठीं

घरची आर्थिक परिस्थिति चांगली असल्यामुळे अनेक काम करून मी मिळवीत असलेल्या पैशाचा माझ्या कुटुंबाला फार मोठी मदत होत असे माझ्या घरच्या लोकांना या गोष्टीची जाणीव होती मला शिक्षणाची आवड आहे, परंतु परिस्थितीमुळे मी शाळेत जाऊ शकत नाही या गोष्टीची माझ्या आईबापांना मनःस्वी हळहळ वाटत असे शाळेतली शेवटली परीक्षा मेरी पास झाली परीक्षेची प्रमाणपत्र देण्याचा मोठा समारंभ होत असे या समारंभाच्या दिवशी चांगले स्वच्छ शुभ्र कपडे घालणं मेरीला आवश्यक होतं माझ्याजवळ माझ्या वेतनातले काही डॉलर्स शिल्लक होते या पैशातून मी तिला समारंभासाठी कपडे शिवून दिले हे नवे कपडे घालून समारंभाच्या दिवशी तिने स्टेजवर जाऊन प्रमाणपत्र हातात घेतलं आणि समोर बसलेल्या प्रेक्षकांना लवून अभिवादन केलं तेव्हा ती किती छान दिसली म्हणून सांगू! हा डिप्लोमा मिळाल्यावर लवकरच मेरीला एका शाळेत महिना तीस डॉलर पगारावर शिक्षिकेची नोकरी मिळाली.

मेरीला शाळेत लागणारी पुस्तकं मी अधूनमधून चाळत असे. वॉशिंग्टन आयर्विंगचं 'स्केचबुक', 'इव्हॅनहो' आणि 'धिस स्कार्लेट लेटर' ही तिच्या जवळची पुस्तकं वाचून मी तिच्याशी चर्चा करीत असे मग मेरी मला या काव्यग्रन्थाविषयी तिचे शिक्षक वर्गात जे बोलत असत ते सर्व सांगत असे. मी या वेळी वाचलेल्या पुस्तकांत मला जॉन फिस्क या लेखकाने लिहिलेलं 'सिव्हिल गव्हर्नमेंट इन धी युनायटेड स्टेट्स' हे पुस्तक अतिशय आवडलं. हा एक महान् ग्रंथ आहे असं माझं मत झालं. कायदा, शासनसंस्था, इतिहास याविषयींच्या विविध प्रश्नांवर जॉन फिस्कने प्रकाशझोत टाकले होते कर म्हणजे काय? कर आकारण्याचा अधिकार कुणाला असतो? कर आकारणं आणि दरोडेखोरी करणं यांत फरक काय? पोलीस गणवेश का वापरतात? शासनसंस्था म्हणजे काय? इत्यादि अनेक प्रश्नांची उत्तरं मला प्रथमच जॉन फिस्कच्या या पुस्तकात मिळालीं. इंग्लिश मॅग्नाचार्टा आणि युनायटेड स्टेट्सची राज्यघटना यांचा पहिला परिचय

हेच पुस्तक वाचीत असताना मला आला हे पुस्तक वाचल्यापासून या विषया वरच वाङ्मय वाचण्याची मला गोडी लागली. 'गटसबर्ग ईव्हिनिंग मेल' या वृत्तपत्रात वॉल्टर वेलमन राजकीय प्रश्नावर लेखन करीत असे. त्याची शैली स्वच्छ आणि सुबोध होती इतक्या कठिण विषयावर लक्षावधि लोकाना सहज समजेल इतक सुबोध लेखन वॉल्टर वेलमन कस काय करू शकतो याच मला आश्चर्य वाटे जॉन फिस्कच पुस्तक वाचून शासनसंस्थेच्या कायदा करणारी, कायद्याची अमलबजावणी करणारी आणि न्यायदान करणारी अशा तीन शाखा असतात हे मला कळल होत या तीन शाखाच तपशीलवार स्वरूप वॉल्टर वेलमनच लेखन वाचीत असताना मला आकळल

मी अनेक काम करीत होतो परन्तु एक ना धड भाराभर चिंध्या अशीच माझी गत झाली होती. ही धावपळ सोडून कोणत्यातरी एका व्यवसायात लक्ष घालून तो व्यवसाय शिकावा कस मला आता वाटू लागल. प्लबर, सुतार, रगारी- या अनेक लोकाना मी त्याच्या व्यवसायाविषयी विचारल. परतु या सर्वांनीच सध्याच्या काळात नोकरी मिळण मोठ कठिण आहे असच मला सागितल अनेक अनुभव असलेली माणमच मुळी वेकार होती अशा परिस्थितीत माझ्यासारख्या नवशिक्याला कोण काम देणार? एक दिवस मला कोणीतरी सागितल की युनियन हॉटेलच्या केशकर्तनालयात हलकीसलकी काम करणाऱ्या एका पोऱ्याची जरूरी आहे. मी माझ्याशीच म्हणालो की, केशकर्तन हा व्यवसाय काहीं वाईट नाहीं. हे काम करणाऱ्या कारागीराला प्रवास करण्याची सधि मिळते कुठल्याहि शहरात जाऊन तो काम करू शकतो शिवाय अशीहि शक्यता असते की, ज्या माणसाची तुम्ही दाढी करता तो मनुष्य जर बडा असला तर तुमच्यावर खूष होऊन आपल्या वशिल्यान तो तुम्हाला कुठहि एखादी चागली नोकरी सहज देऊ शकतो

युनियन हॉटेलच्या सलूनमध्ये आठवड्याला तीन डॉलर्स पगारावर मी काम पत्करल. या तीन डॉलर्सव्यतिरिक्त, येणाऱ्या गिऱ्हाइकाच्या बुटाना पॉलिश केल्याबद्दल आणि बक्षीस म्हणून मला काही पैसे मिळत असत दररोज सकाळी सलूनच्या काळ्यापाढऱ्या लाद्याच्या जमिनी मी ओल्या फडक्यान स्वच्छ पुसून काढीत असे. पावसाळ्याच्या दिवसात बुटाच्या चिखलामुळे जमीन अधिकच खराब व्हायची : त्यामुळे दुपारी पुन्हा एकदा मला जमीन धुवून काढावी लागत असे. आठवड्यातून एकदा रस्त्याला लागून असलेल्या सलूनच्या खिडक्या साबणाच्या

पाण्यान मी स्वच्छ धुवून काढी. खुर्च्यांच्या समोरचे आरसे आठवड्यातून तीन वेळा आरसा धुण्याचं एक विशिष्ट द्रव्य वापरून मी स्वच्छ करीत असे

हम्फ्री हा या सलूनमधला मुख्य कारागीर होता. तोच सलूनचा चालक होता. पहिल्या खुर्चीच काम तो करीत असे. दुसऱ्या खुर्चीवर जॉन हा कारागीर काम करायचा. तो चांगलाच उंच होता त्याने मिशा ठेवल्या होत्या. तिसऱ्या खुर्चीवर गुळगुळीत चेहऱ्याचा, रेशमी सोनेरी केसाचा फ्रॅंक बायकॉफ हा कारागीर काम करायचा तो चांगल नृत्य करीत असे. त्याच्या हालचाली-वरूनच त्याला नृत्य येत असा कुणालाहि कयास बांधता आला असता शनिवारी आणि सुटीच्या आधी सलूनमध्ये खूप गर्दी व्हायची अशी विशेष गर्दी असली म्हणजे चौथ्या खुर्चीवर हम्फ्रीचा अठरा वर्षाचा मुलगा काम करीत असे दुकानात सर्व क्षेत्रातले मोठमोठे लोक येतात तेव्हा दुकान नेहमी झाडून पुसून लख्ख ठेवल पाहिजे असं मला हम्फ्रीने पहिल्याच दिवशी सांगून ठेवल होत हम्फ्री हा एक अतिशय सभ्य गृहस्थ होता गिऱ्हाइकाला खूष ठेवण्या साठी कस हसाव, कस वागाव, कस बोलाव ही कला हम्फ्रीला चांगलीच अवगत होती. "कस काय हिग्गिसाहेब, ठीक चाललय ना आपल?" असं एखाद्या गिऱ्हाइकाला कधी तो आस्थेने विचारायचा, तर कधी दुसऱ्याला "मिस्टर हॅगन जोन्स, मी नुकतीच तुमची आठवण काढली होती. अगदी वेळेवर आलात बघा!" असं तो स्नेहपूर्ण आवाजाने म्हणायचा. सलूनचा चालक या नात्याने आपल काम तो चोख बजावीत असे. त्याच्या हाताखाली काम करणाऱ्या सर्व कारागीराना हम्फ्रीविषयी आदर वाटायचा. सकाळचे अकरा वाजले आणि खुर्चीत बसलेल गिऱ्हाईक दहापधरा मिनिट उठणार नाही असं वाटल म्हणजे मी दुकानाच्या मागल्या बाजूच्या जिन्याने युनियन हॉटेलच ऑफिस ओलांडून हॉटेलच्या बारमध्ये जात असे. हॉटेलतर्फे सलूनच्या कारागीराना इथे विनामूल्य जेवण मिळायचं. जेवण उरकून मी पुन्हा सलूनमध्ये येत असे. सॉलोमन कॉलिंच आणि हेन्री कार्ट हे दोघे जर्मन ज्यू सलूनचे मालक होते. त्यांच्याविषयी मला कृतज्ञता वाटत असे. ही कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी मी त्यांच्या बुटाना मनःपूर्वक पॉलिश लावीत असे.

युनियन हॉटेलमध्ये मोठमोठे नट, वाद्यवादक आणि वक्ते राहण्यासाठी येत. हॉटेलच्या कचेरीत असलेल्या रजिस्टर पुस्तकात लिहिलेली या मोठमोठ्या लोकाची नाव मी मोठ्या कुतूहलाने वाचीत असे.

सहा जानेवारी अठराशे पचाण्णव या दिवशी जनरल फिलिप सिडने पोस्ट मरण पावला. याच दिवशी माझा अठरावा वाढदिवस होता त्याच्या प्रेतयात्रेला अनेक पुढारी, राजकारणी, मुत्सद्दी, सैन्याधिकारी अशी बडीबडी माणसं आली होती. युनियन हॉटेलच्या सलूनमध्ये त्या दिवशी खूप गर्दी झाली होती. हॅट ठेवण्याच्या स्टॅंडवर वेगवेगळ्या तऱ्हाच्या हॅट्स दिसू लागल्या या दिवशी माझं बूटपॉलिशचं साहित्य घेऊन मी सलूनच्या दाराशी उभा राहिलो. अनेक बड्या बड्या लोकांच्या बुटांना मी पॉलिश केलं. या दिवशी मला एकूण एक डॉलर चाळीस सेंट एवढे पैसे मिळाले एका दिवसात इतके पैसे मला कधीच मिळाले नव्हते.

फिलिप सिडने पोस्ट या व्यक्तीला मी रस्त्यातून जाताना पाहिलं होतं. पण त्या वेळी हा कुणी थोर पुरुष असेल याची मला मुळीच कल्पना नव्हती फिलिप पोस्ट बळकट बांध्याचा, वाटोळ्या चेहऱ्याचा मनुष्य होता त्याचं नाक सरळ, धारदार होतं. कपाळाच्या वर त्याला थोडंसं टक्कल होतं हनुवटीवर त्याने थोडीशी दाढी ठेवली होती. ती दाढी इतकी लहान होती की मुद्दाम होऊन बारकाईने पाहिल्याशिवाय ती नजरेत भरत नसे. फिलिप पोस्ट हा एक अप्रतिम योद्धा होता हे मला नंतर कळलं. अठराशे एकसष्ट झाली अब्राहम लिंकनने सेनाभरती-साठी लोकांना आवाहन केलं त्याचवेळी फिलिप पोस्टने आपलं नाव सैन्यात दाखल केलं. अनेक ठिकाणी झालेल्या घनघोर युद्धात त्याने फार मोठा पराक्रम गाजवला. आणि ब्रिगेडियर जनरलच्या जागपर्यंत तो चढत गेला. शेवटी त्याला कर्नलहि करण्यात आलं.

व्हिएन्ना येथे तेरा वर्षं कॉन्सल जनरलचं काम केल्यानंतर फिलिप पोस्ट अठराशे एक्याण्णवशी साली पुन्हा गल्सबर्ग येथे आला. एकदा जनरल पोस्ट आणि त्याचे दोन मित्र युनियन हॉटेलच्या केशकर्तनालयात आले होते. त्या तिघांनीहि सलूनमध्ये दाढी करून घेतली, नंतर जनरल पोस्टने आपल्या बुटांना माझ्याकडून पॉलीश करून घेतलं. ज्याच्या बुटांना मी पॉलिश करीत होतो तो केवढा मोठा मनुष्य आहे याची त्यावेळी मला जराहि कल्पना नव्हती. जनरल पोस्टची योग्यता त्या वेळी जर मला माहीत असती तर माझ्याजवळचं सगळ्यात उत्तम पॉलिश काढून मी त्याच्या बुटांना माझं सारं कौशल्य पणाला लावून ते लावलं असतं.

शनिवारी केशकर्तनालयात मी सर्व तऱ्हेची कामं करीत असे. सलूनला लागूनच एक स्नानगृह होतं. या स्नानगृहात आठ टब्स होते. गरम पाण्याचीहि सोय इथं

केलेली असे. ज्या गिऱ्हाइकाना गरम पाणी लागेल त्याच्यासाठी मी टब गरम पाण्याने भरून ठेवीत असे स्नानासाठी पचवीस सेंट्स द्यावे लागत. दोनतीन गिऱ्हाइक स्नानगृहात नियमित येत असत स्नान करतेवेळीं ते मला बोलवीत आणि माझ्याकडून ब्रशन आपली पाठ चोळून घेत या कामाबद्दल मला चागली बक्षिसी मिळे.

एकदा सलूनमध्ये काम करीत असताना मी चागलाच घोटाळा केला माझी ही चूक बरेच दिवसपर्यंत सलूनमधल्या कारागिराच्या थट्टेचा विषय होऊन बसली होती. एक रुबाबदार गिऱ्हाईक सलूनमध्ये आल होत केस दाढी करून घेतल्या-नतर त्याने माझ्याकडून बुटाना पॉलिश करून घेतल. तो कमीत कमी एक निकेल तरी टिप देईल अस त्याच्या पोषाखाकडे पाहून वाटत होत. मी त्याच्या कोटावर आणि विजारीवर ब्रश फिरवला मग हॅटच्या स्टॅडवर ठेवलेली त्याची सिल्कची हॅट मी घेतली आणि तिच्यावर ब्रश फिरवू लागलो यापूर्वी सिल्कची हॅट मी कधीच हाताळली नव्हती. त्या गिऱ्हाइकान केसदाढीच बिल हम्फ्रीला दिल आणि मी त्याच्या हॅटवर ब्रश फिरवीत असताना तो माझ्याजवळ आला. आपल्या हॅटवर मला ब्रश फिरवीत असलेला पाहून तो गृहस्थ एकदम माझ्यावर किंचाळला, "मूर्खा, हे काय चालवल आहेस तू?" त्याच्या सतापाच कारण माझ्या ताबडतोब ध्यानात आल. सिल्कच्या हॅटवर कोणता ब्रश फिरवावा या बाबतीतल माझ अज्ञान त्याच्या क्रोधाला कारणीभूत झाल होत. त्याचा तो अवतार पाहून मी अगदी घाबरून गेलो. क्षमेची याचना करणारे शब्द मी भीतभीत पुटपुटलो सलूनमधल्या कारागिराना हसू येत होत, पण त्यानी ते अत्यत प्रयत्नपूर्वक आवरून धरल होत. इतक्यात हम्फ्री माझ्याजवळ आला आणि अतिशय कडक स्वरात मला म्हणाला, "चार्ली, सिल्कच्या किंवा सॅटिनच्या हॅटवर मऊ केसाचा ब्रश फिरवायचा असतो हे खर म्हणजे तुला माहीत असायला हव." इतक्यात त्या गिऱ्हाइकान माझ्या हातातली आपली हॅट हिसकावून घेतली आणि ती आपल्या हातात अशा तऱ्हेने धरली की जणू काहीं मी त्याच्या हातातून ती ओढून घेऊन ती फाडूनच टाकणार होतो. बूटपॉलिश केल्याबद्दल त्याने माझ्या हातावर एक निकेल ठेवला आणि तो तरतरा चालत सलूनच्या बाहेर गेला. आता पुन्हा म्हणून या सलूनमध्ये कधी पाय ठेवणार नाहीं असच त्याच ते चालण जणू काय सागत होत. दुसऱ्या दिवशीच मी सिल्क आणि सॅटिनच्या हॅटवर फिरविण्यासाठी मऊ केसाचा ब्रश आणून ठेवला. या नव्या ब्रशाचे केस

इतके मऊ होते की, तुमच्या हातावरून तो फिरवला असता तरी तो फिरल्याचं तुम्हाला जाणवलं नसतं. या प्रसंगानंतर सलूनमध्ये येणाऱ्या गिऱ्हाइकांच्या सिल्कच्या हॅट्स मी सगईत हाताने साफ करू लागलो. पूर्वीच्या अनुभवामुळे मी शहाणपणा शिकलो असे सलूनमधले कारागीर म्हणू लागले.

सलूनमधले कारागीर आपापसात बोलताना बहुधा वस्तऱ्याविषयी बोलत. ते बहुतेकजण वेड ॲंड बुचर कंपनीचा वस्तरा वापरीत असत. वस्तरा तयार करणाऱ्या माणसाचं नाव बुचर म्हणजे खाटीक असावं या योगायोगाचं मला मोठं हसू आलं. हे कारागीर सलूनमध्ये येणाऱ्या वेगवेगळ्या गिऱ्हाइकांना गमतीची टोपणनावं ठेवीत असत आणि आपापसात त्यांच्याविषयी बोलत असताना या टोपणनावाचा उल्लेख करूनच बोलत. राठ दाढीच्या एका माणसाला त्यांनी खारीच्या शेपटीचं त्याच्या दाढीशी साम्य असल्यामुळे 'खार' असं नाव ठेवलं होतं. एकदा श्री. खार सलूनमध्ये येऊन गेले. ते गेल्यावर ज्या कारागिराने त्यांची दाढी केली तो गमतीने म्हणाला, "केली बुवा याची एकदाची दाढी. पुन्हा पुन्हा ब्रश चोळून मला त्याच्या गालावर फेसाचा डोंगर रचावा लागला. सहा वेळा मी वस्तरा फिरवला लपाटण्यावर. त्याच्या दाढीचे खुंट कापता येत नाहीत, ते तोडावे लागतात!" आठवड्यातून दोनतीन वेळा इतर केशकर्तनालयात माझ्यासारखंच पोऱ्याची कामं करणारी इतर मुलं मला भेटत. आम्ही सगळे एकत्र भेटलो म्हणजे धंद्याच्या गोष्टी बोलत असू. कोणतं काळं पॉलिश सर्वांत चांगलं, राठ बूट असले तर त्याला पॉलिश करण्यापूर्वी पॉलिशचे दोन थर त्यांच्यावर चोळावे लागतात, गिऱ्हाइकाकडून एका निकेलऐवजी दहा सेंट्स काढायचे असले तर त्याच्याशी हसून कसं बोलावं इत्यादि अनेक विषय आमच्या बोलण्यात येत असत. या मुलांपैकी एका मुलाचं नाव होतं हॅरी वेब. तो पॉलिश करून झाल्यावर गिऱ्हाइकाकडे मंद स्मित करून पहायचा. या त्याच्या अदबशीर वागणुकीमुळे त्याला गिऱ्हाइकाकडून बक्षिशी म्हणून एखादा निकेल अधिक मिळत असे. इतर मुलं आणि मी हॅरीला म्हणत असू, "आमच्यापेक्षा तुला बक्षिशी अधिक मिळते याचं कारण म्हणजे--एक तर तुझा पोषाख अकपक असतो. आणि दुसरं असं की तू अतिशय देखणा दिसतोस." कधी कधी असं व्हायचं की एखादं गिऱ्हाईक हॅरीला बक्षिशी न देताच निघून जायचं. अशा वेळी हॅरी उपहासपूर्ण स्वराने 'थॅंक यू' असं म्हणायचा. एकदा हस्कीनं त्याला अशा उद्धट स्वरात गिऱ्हाईकाशी बोलताना पाहिलं आणि करड्या स्वरात तो त्याला म्हणाला, "हे

पाहा हॅरी, तुझ काम एकूण फार चागल असत, पण अशा तऱ्हेन सलूनमध्ये येणाऱ्या गिऱ्हाइकाशी तू जर वागू लागलास तर तुला कामावरून दूर करण मला भाग पडेल.''

हॅरी आणि केशकर्तनालयात काम करणारी इतर सर्व मुल रविवारच्या दिवशी झकपक पोषाक करीत आणि फिरण्यासाठी बाहेर पडत. दुपारच्या वेळीं ते सगळे ब्राउन्स हॉटेलमध्ये जेवण घेत. जेवणाला पन्नास सेट पडत असत. त्याच्या दृष्टीन रविवार हा चैनीचा दिवस असे हॅरी बेड ड्रम फार चागला वाजवीत असे एकदा बेरीन स्ट्रीटवरच्या मैदानावर रात्री आम्ही जमलो असता हॅरी आपला ड्रम घेऊन आला. त्याचा हात ड्रमवर अतिशय जलद चालत असे. ड्रम शिकण्यासाठीं तो मेहनतहि खूप घ्यायचा आम्हा सगळ्या मुलाना अस वाटायच की आपल्याजवळहि एक ड्रम असावा आणि हॅरीइतक चागल आपल्याला वाजवता याव उत्तम ड्रम शिकून कधीतरी एखाद्या बॅडच्या पथकात आपण सामील व्हाव आणि खूप प्रवास करावा अशी हॅरीची आकाक्षा होती

एकदा हॅरी शिकागोला गेला आणि तिथे भरणारी मोठी जत्रा तो पाहून आला अठरारो ऱ्याण्णव सालची गोष्ट. असेच एकदा रात्री आम्ही मैदानावर जमलो होतो शिकागोला पाहिलेल्या जत्रेच वर्णन हॅरी आम्हाला सागत होता. जत्रेला जाण्याची इच्छा असूनहि पैशाच्या दृष्टीन ते परवडणार नसल्यामुळे आम्ही जाऊ शकत नव्हतो. आम्ही हॅरीला जत्रेविषयी अनेक प्रश्न विचारीत होतो आणि त्याने दिलेली उत्तरे ऐकून आमचे कुतूहल भागवीत होतो.

हिवाळा ओसरून वसत ऋतूला सुरुवात झाली होती हवेत फुलाचा गध दरवळत होता. वातावरण प्रसन्न होत केशकर्तनालयातल्या या कामावर माझ चित्त लागत नव्हत हे काम आपल्यासाठी नाही अस सारख माझ मन मला सागत होत. याच वेळीं सॅम बालो या माणसान माझ्या जीवनात प्रवेश केला. गाल्व्हा गावाजवळची आपली शेत-जमीन विकून बार्लोने ते पैसे दुधाच्या धद्यात गुतविले होते मध्यम उचीचा, बळकट बाध्याचा, किंचित् खादे खाली झुकलेला, जाडजूड मिशाचा, सॅम बार्लो सदा हसतमुख असायचा. त्याची ही वृत्ति प्रकट करणारा त्याचा आवाजहि मला आवडायचा. बार्लोला फिडल चागल वाजवता येत असे.

एक दिवस मी फुटपाथवरून चाललो असताना बार्लोने आपली दुधाची गाडी थाबविली आणि मला हाक मारली. आपल्याकडे नोकरी करायला तू तयार आहेस

की काय अस त्यान मला विचारल. महिन्याला बारा डॉलर्स पगार आणि त्याच्या बरोबरच घरी जेवण त्यान मला कबूल केल. बार्लो हा माणूस मला आवडला होता. शिवाय, तो मला बारा डॉलर्स अणि घरगुती जेवण द्यायला तयार होता. त्याची नोकरी मी पत्करली असती तर मला मोकळ्यावर काम करायची संधि मिळणार होती. सलूनच्या चार भितींतल्या वातावरणाला मी अगदी कटाळलो होतो. मी तावडतोब बार्लोला होकार दिला हम्फ्रीकडे गेलो आणि त्याला म्हणालो, "तुमच्या सलूनमध्ये काम करीत असताना तुम्ही मला फार चागल वागवलत. तुमच काम सोडून जाताना खर म्हणजे माझ्या जिवावर येतय पण ते सोडल्याखेरीज मला गत्यतर नाहीं, कारण केशकर्तनालयातल हे काम माझ्यासाठी नाही याविषयी मला सशय उरलेला नाहीं"

# पुन्हा एकदां दुधाच्या धंद्यांत

दररोज सकाळी साडेसहा वाजता मी वेरीन स्ट्रीटवरून चालत चालत नॉक्स कॉलेजचं आवार ओलांडून कॉलेजच्या जुन्या बिल्डिंगच्या फाटकापाशी येत असे. तिथे अठराशे अठ्ठावन्न साली झालेल्या लिंकन आणि डग्लस यांच्या वादविवादाच्या स्मृत्यर्थ एक स्तंभ उभारण्यात आला होता ऑक्टोबर महिन्यातल्या त्या थंडीच्या रात्री वीस हजार लोकांच्या समुदायाला उद्देशून लिंकन म्हणाला होता, “ज्याला गुलाम ठेवायचे आहेत त्याला ते विकत घेण्याचा अधिकार आहे असे म्हणताना डग्लस जणू आपल्याभोवतीची नैतिकतेची ज्योत विझवून टाकीत आहे.” त्या स्तंभावर कोरलेलं अब्राहम लिंकनचं ते वाक्य मी तिथे उभा राहून किती वेळा वाचलं असेल याची गणतीच नाही उन्हाळा, पावसाळा, बर्फवृष्टी करणारा हिवाळा साऱ्या ऋतूंत मी हे वाक्य वाचीत होतो

तिथून पुढे मी चालत चालत सॅम्युएल बार्लोच्या घरापाशी येत असे. आल्या-बरोबर घोड्याची पागा स्वच्छ करून मी तिथल्या घोड्यांच्या पायाला दुखापत झाली असेल तिथे चिखल थापीत असे. हे झाल्यावर एक घोडा मी गाडीला जुंपी. बिल वॉल्टर्स दुधाचा रतीब घालण्यासाठी शहराच्या उत्तर भागात जायचा. मी, बार्लो आणि बार्लोकडे काम करणारा हॅरी हॉर्ट दक्षिण भागात जात असू

सॅम बार्लोकडे काम करीत असताना जॉर्ज बर्टनकडे काम केलेल्या दिवसाची मला आठवण झाली. बार्लो हा जॉर्ज बर्टनपेक्षा अगदी निराळ्या प्रवृत्तीचा माणूस होता. कधी कधी मी आणि हॅरी दुधाची गाडी घेऊन जात असू त्यावेळी बार्लो हातात दोन गॅलनची दुधाची चरवी घेऊन पायीच जायचा. “दूध घेणाऱ्या कुठल्याहि गिऱ्हाइकाने कसलीहि तक्रार केली तरी ती सहानुभूतिपूर्वक ऐकून घ्या, तुच्छतेने तिच्याकडे पाहू नका” असं सॅम बार्लोने आम्हाला सांगितलं होतं मला आठवलं की जॉर्ज बर्टन लोकांना आपण दुधाचा रतीब घालतो म्हणजे त्यांच्यावर उपकार करतो आहोत अशाच भावनेने वागायचा. बार्लोने आम्हाला सांगून ठेवलं होतं की, कुठेहि एखादं घर रिकामं होऊन तिथं नवे

भाडेकरू राहायला आलेले दिसले की, ताबडतोब त्यांना जाऊन भेटा आणि आमच्याकडून दूध घ्या असं त्यांना आर्जवानं सांगा. अशी नवी गिऱ्हाइकं हटकून आम्हालाच मिळत असत. ऑक्टोबर महिन्यात गुरांच्या चाऱ्याचा तुटवडा पडू लागला की, एका डॉलरला अठरा पावशेरांची तिकिटं आम्ही देत असू. उन्हाळ्यात अठरांची वीस तिकिटं होत. जूनपासून सप्टेंबरच्या मध्यापर्यंत आम्ही दिवसातून दोन वेळा रतीब घालायचे. उन्हाळ्यात सकाळी घातलेलं दूध रात्रीपर्यंत टिकत नसल्यामुळं आम्हाला दोनदा रतीब घालावा लागे. या दिवसांत मला आणि बालीला आठ गॅलनचे दुधाचे हंडे दोन वेळा धुवावे लागत असत. हंडे धुवून झाल्यानंतर बालीच्या बायकोनं आणि मुलीनं तयार केलेलं झकास जेवण आम्ही जेवत असू.

एका घरात फ्रॅंक बुलार्ड हा रेल्वेड्रायव्हर राहत असे. त्याच्या मुलीला डॉक्टरांनी गाईचं दूध —आणि तेही एका ठराविक गायीचंच— प्यायला सांगितलं होतं. गाईच्या दुधाचा हा रतीब मी बुलार्डच्या घरी घालीत असे. बुलार्डचं नाव मी वृत्तपत्रातून अनेकदा वाचलं होतं. जागतिक विक्रम मोडणारी वेगवान् आगगाडी त्यानं हाकली होती. घराच्या आवारात आणि कधी कधी जेवणाचा डबा घेऊन बाहेर जाताना मी त्याला अनेकदा पाहत असे. बुलार्डच्या घरी एका ठराविक गाईचंच दूध देण्याचा ——इतर गाईंचं दूध त्यात मिसळू न देण्याचा——आम्ही कटाक्षानं प्रयत्न करीत असू. पण कधी कधी नजरचुकीनं दुधाच्या चरव्यांची अदलाबदल व्हायची आणि बुलार्डच्या घरी मिसळीचं दूध आम्हाला द्यावं लागायचं. बुलार्डच्या मुलीच्या प्रकृतीवर याचा वाईट परिणाम झाल्याचं आमच्या कधी कानी आलं नाही.

दुधाचा हा रतीब घालतानाच माझ्या आयुष्यातलं पहिलं वहिलं स्वप्नाळू प्रेम मी केलं. ज्या मुलीच्या प्रेमात मी पडलो होतो तिचा चेहरा रात्रंदिवस माझ्या डोळ्यांपुढून हलत नसे. ॲकॅडेमिक स्ट्रीटवर तिचं घर होतं. दुधाचं भांडं आणि तिकीट ते घराच्या पडवीत ठेवीत असत. ते तिकीट मी काढून घ्यायचो आणि माझ्या पावशेराच्या भांड्यात दूध मापून ते त्या भांड्यात ओतायचो. दुधाचा रतीब मी घालीत असताना ती मुलगी स्वयंपाकखोलीच्या खिडकीपाशी उभी राहून माझ्याकडे टक लावून पाहायची. मी जर कधी खिडकीकडे नजर टाकली तर ती मागल्या पावलीच पळून जायची. आठवड्यातून दोनतीन वेळा दुधाचं भांडं पडवीत ठेवलं नसल्याचं मला आढळून यायचं. अशा वेळी पडवीत उभा राहून मी ‘दूध’ असा पुकारा करायचो. माझा आवाज ऐकला की, दुधाचं भांडं हातात घेऊन मंदस्मित करीत ती बाहेर यायची. भांडं खाली ठेवून ती ‘एक

कार्ट' एवढेच शब्द उच्चारायची आणि मी तेवढं दूध घातलं की निघून जायची. पण मी जर कधी मृदु स्वरात 'गुडमॉर्निंग' म्हणालो तर तीहि कोमल आवाजात 'गुडमॉर्निंग' म्हणायची. तिचे ते शब्द एखाद्या आशीर्वचनाप्रमाणे मी मनात साठवून घेत असे. कधी कधी मी थोडा धीर करून म्हणायचा, 'आज सकाळ मोठी प्रसन्न आहे' किंवा 'आज थंडगार वारे वाहताहेत' अशा वेळी ती 'होय, खरं आहे' एवढेच शब्द उच्चारायची. परत जाताना, मला जर तिच्याशी दोनतीन मिनिटं बोलण्याची संधि मिळाली तर मी बोलणार तरी काय असा विचार माझ्या मनात यायचा.

माझं हे पहिलं प्रेम प्रथमपासूनच विरून जाणाऱ्या एखाद्या स्वप्नासारखं होतं. ती आणि मी एकदाच जेव्हा जोडीनं फिरायला गेलो तेव्हाच हे प्रेम क्षीण होत चालल्याचं मला जाणवलं. उन्हाळ्यातल्या एका रात्री मी नॉक्स स्ट्रीटवर चर्चमध्ये प्रार्थनेसाठी गेलो. तिथं ती मला भेटली. प्रार्थनासभा संपल्यावर मी तिच्याजवळ गेलो आणि तिला म्हणालो, "मी तुझ्या घरापर्यंत तुला पोचवायला आलो तर चालेल का?" ती म्हणाली, "अवश्य." चांदणं पडलं होतं. चर्चपासून चौदा चौकांच्या अंतरावर तिचं घर होतं. चालता चालता मी तिला म्हणालो, "चांदणं किती छान पडलं आहे नाही!" ती नुसतंच 'होय' म्हणाली. नंतर एक चौक अंतर आम्ही एक शब्दहि न बोलता चाललो. मग मी तिला म्हणालो, "यावेळी उन्हाळ्याचा कडाका चांगलाच जाणवला!" यावरहि ती नुसतंच 'होय' म्हणाली. पुन्हा एक चौक अंतर आम्ही न बोलता चालून गेलो. मग मी तिला पुन्हा म्हणालो, "चर्चमध्ये त्या माणसानं प्रार्थनागीत किती सुरेख म्हटलं, नाही?" पुन्हा उत्तरादाखल नुसतंच 'होय' आणि पुन्हा एक चौक अंतर अबोलपणे चाललो. त्यानंतर काहीतरी बोलायचं म्हणून मी म्हणालो, "अधूनमधून फूटपाथवरच्या लाकडी फळ्या सरकलेल्या असतात. अशा वेळी पावलं अगदी जपून टाकावी लागतात."

माझ्या उजव्या हातात तिचा डावा हात कोपराच्या जरा वर होता. मी रस्त्यानं चालत होतो. एखाद्या मुलीला तिच्या घरी पोचविताना तिचा हात असाच हातात धरून चाललं पाहिजे असं मी ऐकलं होतं आणि पाहिलंहि होतं. माझा हात लज्जेनं थरथरत होता. मला उगीचच वाटत होतं की मी ज्या तऱ्हेनं तिचा हात हातात घेतला होता ते तिला आवडत नसावं. थोडा वेळ तसं चालल्यानंतर माझा हात लाकडाचाच आहे असं मला वाटू लागलं. तिचा हात सोडून माझा हात

काही काळ मोकळा करावा अशी तीव्र इच्छा माझ्या मनात निर्माण झाली. पण मी तस केल मात्र नाही मी तस केल असत तर मला त्याच काहीतरी कारण सागाव लागल असत, आणि काय कारण सागाव हे माझच मला समजत नव्हत. चालता चालता मध्येच मला वाटल की उत्कटतेने तिला सागाव—"तुला मी पहिल्यादा पाहिल तेव्हापासून मी तुझा ध्यास घेतला. तुला खर वाटत ना हे? खरच, रात्रदिवस तुझा चेहरा माझ्या डोळ्यापुढून हालत नाही मी दूर असलो तरी मला सारख वाटत की तू माझ्याजवळ आहेस—अगदी जवळ आहेस" पण अस म्हणण्याच्या ऐवजी मी तिला विचारल, "तुझे वडील ट्रेन कडक्टर आहेत ना? कस काय रुचत हे काम त्याना?"

तिच घर आल फाटकापाशी मी तिचा हात सोडला. आणि 'गुडनाइट' म्हणून मी तरातरा पावल टाकीत तिथून निघालो—जस काही मला अत्यत निकडीच काम होत. ती माझ्याकडे दरवाज्यात उभी राहून पाहते आहे किवा नाही हेहि मी पाहिल नाही. तिच आणि माझ जमण्यासारख नाही. आमच्या तारा जुळू शकणार नाहीत असच माझ्या मनाने ठरवल होत. रस्त्यावर आलो तेव्हा मला एकच समाधान झाल होत. इतका वेळ लाकडासारखा घट्ट झालेला माझा लाजाळू हात पुन्हा सजीव, मोकळा झाला होता.

चार्लीकडे जवळजवळ मी अठरा महिने काम केल महिन्याकाठी बारा डॉलर्स आणि जेवण हेच माझ वेतन कायम होत. एके दिवशी मी चार्लीला पगारवाढ करण्याविषयी सागितल. सध्याच्या परिस्थितीत ते परवडण्यासारख नाही अस त्याने मला उत्तर दिल. मी त्याला म्हणालो, "चार्ली, तू मला इतक चागल वागविल आहेस, तुझ्याविषयी मला इतका आदर वाटतो की हे काम सोडून जाण अक्षरशः माझ्या जिवावर येतय पण मी तरी काय करू? एवढ्या वेतनावर माझ भागायचच नाही." चार्ली म्हणाला, "चार्ली, तू जाणारच असलास तर जा. जे घडायच ते घडणारच. तू अतिशय चागला मुलगा आहेस गेल्या वर्षा दीड-वर्षाच्या तुझ्या सहवासात माझा काळ मोठ्या सुखान गेला. इथून गेल्यावर अधून-मधून तू आमच्याकडे अवश्य ये" चार्लीन सागितल्याप्रमाणे अधूनमधून मी त्याच्या घरी जात असे. मी गेलो की तो आपल्या एडिसन फोनोग्राफवर नव्या नव्या ध्वनिमुद्रिका मला ऐकवी. 'कवि आणि शेतकरी' ही ध्वनिमुद्रिका अनेक वेळा ऐकली तरी मला कटाळा येत नसे—ती पुन्हा ऐकावीशी वाटे. चार्ली जिवत असेपर्यंत त्याची आणि माझी मैत्री टिकून राहिली होती.

# घरट्याबाहेर

कालाचं चक्र सारखं फिरत होतं बाल्य संपून मी तारुण्यात प्रवेश केला दुःखाचे, कटुतेचे अनेक प्रसंग माझ्या जीवनात कोसळले होते पण हे दुःख, ही कटुता केवळ माझ्याच वाट्याला आली होती काय? मी विचार करू लागलो तेव्हा मला आढळून आलं की, जगातल्या सगळ्या स्त्रीपुरुषाच्या वाट्याला हे आलं होतं या दुःखाशी न भिता दोन हात करणं यातच खरं पुरुषार्थ आहे. असं झगडता झगडताच नवं सामर्थ्य प्राप्त होतं होरेशियो ॲल्जर या लेखकाची काही पुस्तकं तसंच 'टॉम धी बूट ब्लॅक' आणि 'फ्रॉम रॅग टु रिचेस' ही दोन पुस्तकं माझ्या वाचनात आली होती आल्जरच्या पुस्तकातील नायक मोठे भाग्यवान् होते. त्याच्या पुस्तकात एखादी श्रीमंत सुंदर तरुण स्त्री घोड्यावर बसली असताना घोडा अकस्मात् उधळायचा. अशा वेळी आमचा हा नायक धोक्यात जीव घालून राजकन्येची या प्राणांतिक संकटातून मुक्तता करायचा. मग ती सुंदर स्त्री त्याच्या प्रेमात पडायची. शेवटी त्याचं तिच्याशी लग्न व्हायचं आणि तिची सगळी संपत्ति त्यालाच मिळायची नंतर या नायकाचं जीवन म्हणजे गुलाबाच्या पाकळ्याचीच शय्या असं व्हायचं

नशीब नावाची गोष्ट जीवनात असते हे अगदीच नाकारता येणार नाही परंतु मला एवढं कळलं होतं की चांगलं नशीब जर तुमच्या वाट्याला आलं नाही तर झगडून तुम्हाला ते मिळवलं पाहिजे ऑयुडा या लेखकाचं 'अण्डर टू फ्लॅग्ज' हं पुस्तक माझ्या वाचनात आलं होतं. जीवनाच्या घोर संग्रामात या पुस्तकाचा नायक सगळं काही गमावून बसला होता फक्त त्याचा घोडाच त्याच्यापाशी उरला होता. पण जराहि न डगता तो वीरासारखा अखेरपर्यंत झुंजत राहिला. ऑलिव्ह श्रायनर या लेखकाचं 'धी स्टोरी ऑफ् ॲन आफ्रिकन फार्म' हे पुस्तक मी वाचलं. या पुस्तकाच्या प्रत्येक पानापानावर दुःखी जीवाची आर्त कहाणी होती. हे प्रबळ दुःख या माणसाच्या जीवनात असूनहि त्याच्या आयुष्यात गीताचा मंद प्रवाह होता कधीहि भंग न पावणार, न खुरटणार असं प्रगाढ

प्रेम त्याच्या जीवनात होत. या माणसाच्या जीवनाची कहाणी वाचून, माझ्या अवतीभोवतीच्या माणसांची जीवन पाहून मी विचार करू लागलो. मला कळल की माझ्यापेक्षाहि कितीतरी पटींनी अधिक दुःख ज्यांच्या वाट्याला आल आहे अशी माणस या जगात होती तरीहि त्यांच्या डोळ्यासमोर ध्येय होती, संघर्षानं व्यापलेल्या त्यांच्या जीवनातहि स्वप्न होती, ध्वाडण होत, आशानिराशा होत्या मला झगडल पाहिजे ही माझी जाणीव तीव्र झाली

माझ वय आता एकोणीस वर्षांच होत. आता माझी गणना प्रौढात होत होती माझ्या जीवनात प्रचंड असंतोष भरून राहिला होता मी अनेक काम केली, अनेक धंदे केले, परंतु माझ्या भवितव्याची वाट त्याच्यापैकी कशातूनहि उलगडताना मला दिसली नव्हती या जीवनात काही मित्र मी जमा केले होते परंतु मुलींच्या सहवासात मात्र अजूनहि मला आत्मविश्वासान वावरता येत नव्हत त्यांच्याशी कस बोलाव, कस वागाव ह मला या मुली माझ्या आयुष्यातून जाईपर्यंत कळत नव्हत माझी जोडीदारीण मला कुठच सापडली नव्हती.

याचवेळी स्वातंत्र्यासाठी, लोकसत्तेसाठी झगडणाऱ्या क्यूबा येथील लोकांची कहाणी मी वाचली. स्पॅनिश जनरल वायलर यांनी या क्यूबातील स्वातंत्र्याची तहान लागलेल्या जनतेवर अनन्वित अत्याचार केले होते आणि तरीहि आपल छोटंस सैन्य जमवून स्वातंत्र्याच्या भावनेनं पेटलेली ही माणस जुलमी सत्तेविरुद्ध प्राणपणानं लढत होती. या स्वातंत्र्यसैनिकांच जीवन मला विलक्षण प्रेरक वाटल त्यांना जाऊन मिळाव आणि त्यांच्या स्वातंत्र्याच्या लढ्यात सामील व्हाव अशी तीव्र इच्छा माझ्या मनामध्ये पेटली. त्यांच्या सैन्यात भरती होण्याची जर त्यांनी हाक दिली असती आणि मला तशी संधि मिळाली असती तर मी निश्चितच त्या स्वातंत्र्ययुद्धातला एक शिपाई म्हणून लढला असता. पण माझी ही आकांक्षा कधीच फलद्रूप झाली नाही.

अठराशे शहाण्णव आणि अठराशे सत्त्याण्णव ही दोन वर्ष माझ्या आंतरिक जीवनात विलक्षण खळबळ माजली होती. मला काय होत होत ह सांगण मोठ कठिण आहे. आंतरबाह्य जग आणि मन यांत युद्धाचा प्रसंग रात्रंदिवस ओढवला होता. ज्या शहरात मी राहत होतो त्याचा एकाच वेळी मला ओढाहि वाटत होता आणि तिटकाराहि वाटत होता तिथले लोक मला हवेहि होते आणि नकोहि होते. मला माझ्याविषयी कधी विलक्षण सहानुभूति वाटायची, कधी तिरस्काराची प्रचंड लाट माझ्या मनात उसळायची. परस्परविरोधी भावनांच्या द्वंद्वात माझ मन

सापडल होत. कसल तरी दुःख माझ्या मनात सलत होत—आणि मला कळल होत की या दुःखाच मूळ बाहेरच्या जगात नाहीं, ते माझ्याच मनात आहे मी धडपडत होतो खरच, काय हव होत बर मला ?

अठराशे सत्याण्णवच्या जूनमध्ये कॅन्सास येथे जाऊन गव्हाच्या शेतात काम करायच मी ठरवल मध्येच धंदेवाईक भटक्या व्हाव असहि मला वाटे भीक मागत, लहानसहान चोऱ्या करत भटकण्याचा धंदा करणाऱ्या अनेक भटक्यांशी माझी ओळख झाली होती काहीहि करायला मी तयार होतो. पण जियला प्रत्येक माणूस, जिथल्या जमिनीचा प्रत्येक इंच नी इंच माझ्या ओळखीचा होता, ते माझ राहत गाव सोडून मला कुठतरी दूर दूर जायच होत

गेल्सबर्गपासून मी फारसा दूर गेलो नव्हतो एकदाच बाबांनी मला आगगाडीचा पास दिला होता तो पास घेऊन मी एकटाच पन्नास मैलावर पेओरिया येथील जत्रा पाहण्यासाठी गेलो होतो एकट्यान तो प्रवास करताना मला किती मोकळ वाटल होत ! वाटत होत की, मी जगप्रवासालाच निघालो आहे. घरी परत आल्यावर पेओरियाचे लोक कसे दिसले याचा वर्णन करून सागण्याखेरीज मला दुसर काही सुचत नव्हत

एका वर्षापूर्वीच मी माझ्या आयुष्यात अगदी पहिल्याप्रथम शिकागोला जाऊन आलो होतो. तेव्हा माझ वय अठरा वर्षांच होत माझ्याजवळ एक डॉलर आणि पन्नास सेंट एवढी शिल्लक होती, आणि कित्येक महिने बाबांची मनधरणी करून मी गाडीचा पास मिळविला होता. एक चाकू, दोऱ्याचा एक तुकडा, माझा पाइप आणि तंबाखू आणि दोन रुमाल एवढच माझ सामान होत जॉन जॉर्डिनने कमीत कमी पैसे खर्च करून शिकागो शहरात कस राहाव याविषयीच आपल अनुभवसिद्ध तंत्र मला पढवल होत. माझ्या खिशातला दीड डॉलर शिल्लक असेपर्यंत मला शिकागोमध्ये राहण शक्य होणार होत. क्लार्क स्ट्रीटवरच्या पिट्सबर्ग ज्यो या माणसाच्या स्वस्त हॉटेलात मी जेवत होतो पाच सेंटमध्ये इथे जेवण मिळत असे. सकाळसंध्याकाळ एकच जेवण असायच

साउथ स्टेट स्ट्रीटवरच्या एका हॉटेलात दुसऱ्या मजल्यावरच्या खोलीत मी राहत असे. एका रात्रीच पचवीस सेंट भाड मला द्याव लाग. खोलीतली जमीन लाकडी होती. खिळखिळा झालेला एक लोखंडाचा पलग खोलीत होता. पलगावरच्या बिछान्यावर अनेक दिवस वापरलेली एक मळकी चादर होती. विझलेल्या काड्या आणि कचरा याचा ढीग कोपऱ्यात पडलेला होता. कपडे टागण्यासाठी

खोलीतल्या भितीला खिळे ठोकलेले होते. एका अधाऱ्या जागेत पाण्याचा नळ होता तिथ जाऊन मी माझे कपडे आणि तोंड धूत असे.

शिकागोमधील माझ्या वास्तव्यात मी अनेक करमणुकीचे कार्यक्रम पाहिले. जॉन जार्डिनने शिफारस केलेल एकहि नाटक मी चुकवल नाही पूर्वी जी वर्तमानपत्र विकण्याच काम मी केल होत त्याच्या कचेऱ्याहि मी पाहिल्या व्हिक्टर लॉसनच्या 'शिकागो रेकॉर्ड' आणि 'डेली न्यूज' या पत्राविषयी मला विशेष आदर होता. या वृत्तपत्राच्या कचेरीत जाऊन व्हिक्टर लॉसनची भेट घ्यावी आणि त्याच्याशी बोलाव असं मला खूप वाटत असे पण तिथे गेलोच तर त्याच्याशी काय बोलायच ह मात्र मला कळत नव्हत

रस्तोरस्ती मी अनेक मैल भटकलो त्या प्रचंड उत्साहाच्या भरात इतक चालून गेलो तरी मला थकवा कसा तो जाणवला नाही इथून तिथून जाणारी माणस, घोड्याच्या गाड्या, ट्रॅमगाड्या यानी रस्ते कस गजबजून गेले होत. तिसऱ्या दिवशी दुपारी एका हॉटेलसमोर मी थाबलो 'किरकोळ काम केल्यास मोफत जेवण मिळेल' अशी पाटी तिथ लावलेली होती. या हॉटेलात मी जेवून घेतल. खिशात फक्त दीड डॉलर बाळगून मी तीन दिवस शिकागो शहर पाहून घेतल होत. घरी आलो तेव्हा शिकागो शहराची रगतदार वर्णन मी घरातल्या माणसाना सागितली. माझ्या घरातल कुणीहि शिकागोमध्ये गेल नव्हत माझे आईवडील फक्त गाडी बदलताना तेवढे काही मिनिटच शिकागोला उतरले होते. घरी आलो तेव्हा मला बर वाटल. माझ्या बिछान्यावर आता स्वच्छ चादर होती पिट्सबर्ग ज्योच्या हॉटेलातील जेवण आता नव्हत--माझ्या आईच्या हातचा रुचकर स्वयपाक मी आता खाणार होतो पण एवढ सगळ असूनहि माझ मन शिकागो शहरातल्या त्या गजबजलेल्या रस्त्यावर, त्या वाहनाच्या धावपळीकडे सारख जात होत घरात सगळ सुख असूनहि पुन्हा जर शिकागो शहरातल्या या गर्दीत मला मिसळता आल तर किती बर होईल अस मला पुन्हा पुन्हा वाटायच.

अखेर मी निर्णय घेतला. घर सोडायच आणि दूर दूर भटकायच वाट फुटेल, पाय नेतील तिथ जायच अस मी ठरवून टाकल. माझ्या भ्रमतीचा हा बेत मी घरात सागितला तेव्हा तो कुणालाहि आवडला नाही ह मला कळून चुकल. बाबाच्या चेहऱ्यावर नापसती स्पष्ट दिसत होती. उलट, माझ्या आईला गहिवरून आल— मला जवळ घेऊन माझा मुका घेताना तिच्या डोळ्यातून घळघळ अश्रू ओघळू लागले. मी दुपारच जेवण केल आणि सर्वाना रामराम करून घराबाहेर

पटलो. सॅटिनचा काळा शर्ट, कोट, पॅंट, बूट, मोजे आणि हॅट. एवढं अंगावर घालून मी तडक निघालो. याव्यतिरिक्त माझ्याजवळ कपडे नव्हते. माझ्या खिशात साबणाचा एक तुकडा, वस्तरा, फणी, छोटासा आरसा, दोन हातरुमाल, सुईदोरा, पोटरबेरीचं घड्याळ, चाकू आणि माझा पाइप, थोडा तंबाखू एवढंच सामान होतं. तीन डॉलर आणि पंचवीस सेंट एवढे पैसे मी जवळ बाळगले होते. जूनच्या शेवटच्या आठवड्यातली एक दुपार होती. झळझळीत प्रकाश पडला होता. हवेत थोडा गारवा होता. सॅन्टाफी स्टेशनच्या पश्चिमेच्या बाजूला एक मालगाडी सिग्नल नसल्यामुळे थांबली होती. गाडी सुरू झाली. थोड्या वेळानं त्या धावत्या गाडीत उडी मारून मी चढलो आणि एका डब्यात घुसलो. डब्याच्या दारांशीच कडीला हात धरून समोर पसरलेल्या निसर्गाकडे पाहत मी उभा राहिलो. ज्वानीच्या भरात डोलणाऱ्या शेताचे विस्तीर्ण पट्टे समोर पसरले होते. मिसिसिपी नदीवरच्या पुलावरून आगगाडी गेली तेव्हा अनेक दिवस ती नदी पाहण्याची माझ्या डोळ्याची तहान शांत झाली. माझ्या बापाखेरीज माझ्या घरातल्या कुणीहि ही नदी पाहिली नव्हती.

फोर्ट मॅडिसन येथं गाडीचा वेग थोडा कमी झाला तेव्हा मी बाहेर उडी टाकली. मी थोडं चीज विकत घेतलं आणि मिसिसिपी नदीच्या विस्तीर्ण पात्राकडे पाहत काठाशी बसून राहिलो. एका लहानशा बोटीचा कॅप्टन मला म्हणाला की, बोटीवर एका कामगाराची जरूर आहे. कामाच्या मोबदल्यात केओकुकपर्यंत प्रवास करता येईल. मी ते काम पत्करलं. मी केओकुकला उतरलो. एका कालव्याच्या काठी हिरव्यागार गवतावर वर्तमानपत्राच्या घड्या पसरून मी मोकळ्यावर झोपलो. कालव्याच्या पाण्यानं मी माझं तोंड धुतलं. माझ्या खिशात साबण होताच. जवळच्या रुमालानं मी तोंड स्वच्छ पुसलं. इतक्यात समोरून एक माणूस आला. त्यानं मला विचारलं, "काय भटकायला निघालात ना?" मी म्हणालो, "होय." मग आम्ही दोघे थोडंसं चालून पुन्हा गवतात एके ठिकाणी बसलो. नव्यानंच ओळख झालेला तो माणूस म्हणाला, "माझ्याजवळ तीन पाव आहेत." एका घरात त्याला एक जेवण आणि हे तीन पाव मिळाले होते. पावाच्या कापी करून त्याला लोणी लावलेलं होतं आणि त्यात तळलेल्या मासांचे दोन तुकडे ठेवलेले होते. खाता खाता मी म्हणालो, "चला, जेवण आणि न्याहारी दोन्ही एकाच वेळी उरकली म्हणायची."

त्या माणसाचा चेहरा आणि हात इतके फुगीर होते की, आपण बोट लावलं

तर ते आत रुतेल अस वाटायच. ब्रुकलीन येथील अनाथाश्रमातून तो आला होता. इतके दिवस तो भटकत होता, पण त्याने काम अस केलच नव्हत. सहसा तो भीक मागूनच आपला शेर मिळवायचा. हिवाळ्याच्या दिवसात भटकेगिरी केल्याबद्दल कुठतरी त्याला पोलीस पकडायचे. मग दोनतीन महिने स्वारीची तुरुंगात रवानगी व्हायची. कुठल्या कुठल्या तुरुंगात चागल जेवण मिळत याची यादी त्याला पाठ होती. त्याची जीभ पातळ होती आणि तो विलक्षण जलद बोलत असे. अनेक धदेवाईक भटक्याच्या टोळ्या त्याच्या परिचयाच्या होत्या. एके दिवशी गवतावर पडून निळ्या आकाशाकडे पाहत तो पडला असता मी त्याला सोडून दिला. आपण एकटे असलो तरी आपल्याला काही कमी पडणार नाही याविषयीचा जबरदस्त विश्वास जर त्याला नसता तर त्याला सोडून जाताना मला वाईट वाटल असत.

एका रात्री वादळ झाल आणि खूप जोराचा पाऊस कोसळू लागला एका घराच तळघर बाधण्याच काम चालू होत. सुतारानी अर्धच काम सपवल होत आणि ते घरी गले होते. सुतार पुन्हा कामाला येईपर्यंत त्या तळघरात झोपायच मी ठरवल. नतर मी चौकाचौकातून भटकलो. तीन घरात स्टोव्हला पॉलिश करून द्यायच काम मला मिळाल. या कामाबद्दल न्याहारी, दुपारच आणि रात्रीच जेवण एवढा मोबदला मला मिळाला अनेक घरात मी काम मिळवण्यासाठी खटपट केली या बायका गतसवर्गामध्ये ज्याच्या घरात मी दुधाचा रतीब घालीत होतो त्याच्यासारख्याच होत्या. मला कॉलेजमध्ये जाण्यासाठी पैसे हवे आहेत आणि त्यासाठी मी काम मिळवण्याच्या खटपटीत आहे अस मी सागितल असत तर त्यानी मला जरूर मदत केली असती, पण खरा अडचण अशी होती की त्याच्या घरात गजलेले स्टोव्हच फारसे नव्हते—आणि त्यामुळे मला काम मिळण शक्य नव्हत चार जुलै या दिवशी केओकुक या शहरी बरीच गर्दी उसळली होती. मेनस्ट्रीटवरच्या टोकावर एका लहानशा हॉटेलापुढ 'वेटर पाहिजे' अशी पाटी मी वाचली. हॉटेलच्या मालकाला मी जाऊन भेटलो दोन वेळच जेवण आणि दिवसाचे पन्नास सेट देण्याच त्याने मला कबूल केल. हॉटेलात गिऱ्हाइकानी मागवलेली खाद्यपेय त्याना देताना नम्रपणे मी कस वागल पाहिजे त त्यान मला समजावून सागितल आणि दहा वाजता तो बाहेर निघून गला. साडे-अकरापर्यंत तीनचार गिऱ्हाइकच हॉटेलात जमली इतक्यात हॉटेलचा मालक परत आला. दुपारी विशेष गर्दी होईल तेव्हा मी कामात मदत करीन अस त्यान मला सागितलं. पुढच्या दोन तासात सहासात गिऱ्हाइक आली. यावेळी

दुकानाचा मालक एका कोपऱ्यात बसून झोप काढीत होता मी माझं काम करीत होतो दुकानात एका वेळी दोनपेक्षा अधिक गिऱ्हाइक सहसा येत नसत. त्याना हवी असलेली खाद्यपेय मी तत्परतेनं आणून देत असे मला मी काही तरी महत्त्वाचं काम करतो आहे असं सारखं वाटायचं काही दिवसानी मी चढत चढत जाऊन या हॉटेलात मालकाचा भागीदार होईन असं स्वप्न मी मनात बाळगलं होतं. काही वेळानं झोप संपवून मालक उठला आणि थोड्याच वेळात येतो असं सांगून बाहेर निघून गेला तीन वाजता 'पहिल्यापेक्षा' अधिक खुषीत येऊन त्यानं हॉटेलात पाऊल टाकलं. दुपारी तो जेवलेला नव्हता. मी त्याला दोन अंडी तळून दिली आणि सोबत एक बनपाव आणि गरम कॉफी दिली त्यानं जेवण संपवलं आणि थोडावेळ बाहेर जाऊन येतो असं सांगून तो निघाला. पाच वाजता तो पुन्हा हॉटेलात आला, तो अगदी 'टेर' होऊन. एका कोपऱ्यात त्यान जमिनीवर लोळण घेतली व ताणून दिली. तो झोपल्यावर मी दोन मटणाचे सॅडविचेस तयार केले दोन डोनट्स घेतले आणि ते कोटाच्या खिशात ठेवले. नंतर मी पैशाची पेटी उघडून माझ्या पगाराचा अर्धा डॉलर घेतला, हळूच हॉटेलचं दार उघडलं, खांद्यावर कोट टाकला आणि तडक बाहेर निघालो त्या रात्री असाच एका चालत्या गाडीत उडी मारून मी डब्यात शिरलो या गाडीने मला मिसूरी राज्याच्या मध्यभागी आणून टाकलं.

दुसरे दिवशी बीनलेक या मिसूरी राज्यातल्या एका गावी रेल्वेरस्त्यावर काहीं कामगार काम करीत होते तिथं मी गेलो फे कॉनॉर्स हा या मजुराचा मुख्य होता. दिवसाला एक डॉलर पंचवीस सेंट्स एवढ्या पगारावर त्याने मला कामावर ठेवून घेतलं कामाच्या जागेपासून तीस पावलावर त्याचं चार खोल्याचं घर होतं. आपल्याच घरी त्यानें माझी राहण्याजेवण्याची व्यवस्था केली याबद्दल मला त्याला आठवड्याचे तीन डॉलर्स द्यावे लागत. कॉनॉर्सच्या हाताखाली आम्ही पाचजण काम करीत होतो. कॉनॉर्स स्वतःच्या अधिकाराच्या जागेवर आणि आपल्या आवाजावर बेहाय खूष होता आमच्या अंगावर तो कधीच संतापून ओरडला नाहीं, परंतु तो अशा काहीं लकबीनं वागत असे, त्याच्या चेहऱ्यातच अशी काही जरब असायची की कुणीहि त्याच्याकडे पाहिलं तरी साध्या मजुराच्या जागेपासून सध्याच्या अधिकाराच्या जागेपर्यंत तो चढत गेला आहे हे सहज कळून आलं असतं. सकाळीं सातपासून संध्याकाळी सहापर्यंत मला तिथं काम करावं लागे माझं अंग रात्री मी पूर्वी बर्फ-घरात काम करताना दुखे तसं दुखू लागायचं.

सकाळी, दुपारी, रात्री कॉनॉर्सच्या घरी ठराविकच पदार्थ जेवणात असायचे. कॉनॉर्स, त्याची बायको आणि तीन मुल याना हे ठराविक जेवण फार आवडायच्च अस दिसल. दोन आठवडे मी कॉनॉर्सच्या हाताखाली काम केल आणि एके दिवशी रविवारी सकाळी मी एका धावत्या गाडीत उडी मारून कान्सास शहराकडे निघालो. राहण्याजेवण्याचे पैसे मी कॉनॉर्सला दिले नव्हते परतु माझा पगारहि मीं घेतलेला नव्हता. माझ्या पगारातून तो आपल बिल वसूल करून घेईल अस म्हणून मी तेथून तडक निघालो.

कॅन्सास शहरी मी जाऊन पोचलो. आर्मर ॲव्हेन्यू या रस्त्यावर मिसेस म्यूलिन या बाईच एक छोटस हॉटेल होत. हॉटेलच्या खिडकीपाशी 'बशा विसळणारा पोरगा पाहिजे' अशी पाटी लावलेली होती. मिसेस म्यूलिनला मी भेटलो आणि हे काम पत्करल. दुपारच्या वेळी हॉटेलात बरीच गर्दी व्हायची आणि बशा विसळताना चागलीच धादल उडायची. जेवणाच्या खोलीतली जमीन दररोज मी सकाळीं झाडून ठेवीत असे. आणि दर शनिवारी ओल्या फडक्याने ती पुसून काढीत असे. हॉलच्या टोकाला एक पडदा लावलेला होता. त्या पडद्यामागे एक लहानशी कॉट होती. मी त्या कॉटवर झोपत असे.

पहाटे सहा वाजता मी उठत असे जेवण्याची खोली झाडून मी स्वच्छ करीपर्यंत साडेसहा वाजायला यायचे साडेसहा वाजता हॉटेलच दार उघडल की गिऱ्हाइक यायला सुरुवात व्हायची रात्री आठ वाजेपर्यंत मी काम करीत असे. मध्ये फक्त दीडदोन तासच मला सुट्टी मिळायची या नोकरीतले माझे दिवस सुखात गले हॉटेलातला मुख्य स्वयपाकी आनदी आणि मोकळ्या स्वभावाचा होता. तिन्ही वेळा तो मला चागल आणि भरपूर जेवण देत असे जॉर्ज नावाचा दुसरा एक वेटर होता. तोहि आनदी वृत्तीचा होता त्याला अनेक जुनी जुनी गाणी येत. मी फर्माइश करीत असे आणि तो मला अनेक गाणी म्हणून दाखवीत असे. रविवारच्या दिवशी मला सुट्टी मिळायची. या दिवशी मी कान्सास शहरात खूप भटकत असे. एकदोन आठवड्यात पश्चिम नासासमधली गव्हाची शेत पिकून तयार होणार होती. मिसेस म्यूलिनने दुसऱ्या आठवड्याचा पगार माझ्या हातावर ठेवला तेव्हा मी काम सोडून जाणार असल्याच तिला सागितल. मी तिचा निरोप घेतला आणि बाहेर आलो. दुकानाच्या खिडकीवर 'बशा विसळणारा पोऱ्या पाहिजे' अशी पाटी पुन्हा लटकू लागली. हॉटेलातला मुख्य स्वयपाकी आणि जॉर्ज हा वेटर याचा निरोप घेताना मला फारच वाईट वाटल. ही दोन्ही माणस

सज्जन होती त्याच्यामुळेच तिथल माझ वास्तव्य सुखाच झाल होत.

मी पुढे निघालो. वाटेत एका स्वस्त हॉटेलात दुसऱ्या मजल्यावरच्या खोलीत मी उतरलो. इथे एका रात्रीच पधरा सेंट्स भाड होत त्याच खोलीत माझ्या बरोबर आणखी चाळीस माणस उतरली होती. एकेका हाताच्या अतरावर एकेक कॉट टाकलेली होती. माझ्या शेजारचा एक माणूस इतक्या मोठ्यान घोरायचा की काही सागता सोय नाही पहाटेचे तीन वाजले की एक माणूस झोपेतून किंचाळतच उठायचा. कसल तरी भीतिदायक स्वप्न त्याला पडत असाव. सगळ्यात तापदायक म्हणजे या खाटेत असलेले ढेकूण. ते असे सपाटून चावायचे की डोळ्याला डोळा लागण मुश्किल व्हाव त्यानी आमच्या बिछान्यात आपली घर केली होती या बिछान्यावर टाकायला त्या हॉटेलात चादरहि नव्हती. घोरणाऱ्या आणि किंचाळणाऱ्या माणसाच्या, चावणाऱ्या ढेकणाच्या या खोलीत मी दोन रात्री राहिलो

एकदा चालत्या गाडीत उडी मारून मी प्रवास करीत असताना मला चागली अद्दल घडली. कोळसे ठेवण्याच्या डब्यात मी शिरलो होतो. मला शिरताना ब्रेकमनने पाहिल आणि हाकलून लावल. मी खाली उतरल्यासारख केल आणि त्याचा डोळा चुकवून पुन्हा गाडीत घुसलो. आता गाडी वेगान चालू लागली होती. तो मनुष्य माझ्याजवळ आला. वेगात असलेल्या गाडीतून उतरणहि मला शक्य नव्हत माझ्याजवळ तोंड आणून तो मोठ्याने ओरडला, "गाडीतून उतरून चालता हो अस मी तुला बजावल होत आता मुकाट्यान पैसे काढ नाहीतर चागली याद राहील अशी तुला अद्दल घडवतो " पूर्वी गाडीत मला अनेक वेळा ब्रेकमन भेटले होते. डब्याच्या कोपऱ्यात अग चोरून उभा असलेला मला पाहिल की ते ओरडून सागत, "अरे, अशा तऱ्हेन प्रवास करणार असलास तर निदान आमचा डोळा चुकवण्याची तरी काळजी घे!" परतु पैसे मागणारा असा ब्रेकमन काही मला पूर्वी भेटला नव्हता. खर म्हणजे मी फुकटात प्रवास करीत होतो. गाडीच्या तिकिटाचे पैसे देण माझ कर्तव्य होत. ह सगळ खर, पण या ब्रेकमनला मीं काय म्हणून पैसे द्यावेत? रेल्वेने त्याला काही तिकीट कलेक्टर नेमलेला नव्हता! मी पैसे देण्याच साफ नाकारल. तेव्हा तो सतापान लाल झाला. माझ्यापेक्षा त्याच वजन चाळीस पौंडतरी अधिक असाव. त्याने खाडकन् आपल्या उजव्या हाताने माझ्या डाव्या गालावर ठोसा लगावला. मी मला सावरतो न सावरतो तोच दुसरा ठोसा बसला. मी जमिनीवर कोसळलो. थोड्या

वेळाने मी कसाबसा उठून बसलो. माझ्याकडे पाहून तो ओरडला, "आहेस तसा बसून राहा. नाहीतर आणखी दोन लाथा बसतील पेकाटात. मी तसाच बसून राहिलो. ते दोघेजण जायला निघाले. जाता जाता त्यांनी माझ्याकडे वळून पाहिलं आणि मोठ्यानं हसून ते म्हणाले, "ठीक आहे आता तुला प्रवास करायला हरकत नाही. तिकिटाची चांगलीच किंमत तू भरली आहेस!"

डब्याच्या दरवाजापाशी मी उभा राहिलो. झाडांचा आणि शेतांचा हिरवा विस्तार माझ्या डोळ्यांपुढून जात होता थोड्या वेळानं गाडीचा वेग कमी झाला तशी मी खाली उडी टाकली भटक्यांच्या एका टोळीत मी मिसळलो त्यातली दोन माणसं ज्या गाडीतून मी उतरलो होतो ती गाडी पकडण्यासाठी धावत होती. बाकीचे चारपाच जण एका झऱ्याच्या काठी आपले शर्ट धूत होते. मी तिथंच थांबलो आणि त्या झऱ्याच्या काठी माझा शर्ट, पायमोजे आणि दोन रुमाल धुऊन टाकले त्या भटक्यांपैकी दोघेजण माझ्याजवळ आले. त्यांनी आदल्या रात्री काही निकेल खर्च करून पाव आणि इतर थोडे खाण्याचे पदार्थ घेतले होते. 'एक निकेल दे आणि आमच्याबरोबर खायला बस' असं त्यांनी मला सांगितलं होतं. मी त्यांच्याबरोबर बसून भरपूर खाऊन घेतलं. त्याच रात्री मी पुन्हा धावती गाडी पकडली आणि एम्पोरिया शहरात आलो चालता चालता 'एम्पोरिया गॅझेट' या वृत्तपत्राच्या कचेरीसमोर मी आलो. बुइल्यम ॲलन व्हाइट हा या पत्राचा संपादक होता. कचेरीत जाऊन त्याची भेट घेण्याची माझी इच्छा होती, पण मला धीर झाला नाही. मला भूक लागली होती. एका हॉटेलात जाऊन मी दोन सेंट्सचं जेवण घेतलं आणि सिटी पार्कमध्ये येऊन मी गवतावर पहुडलो. इतक्यात तिथं दोन माणसं आली. ते दोघे धंदेवाईक भटक्ये होते. त्यांनी माझी ओळख करून घेतली काही वेळ आम्ही बोलत बसलो. थोड्या वेळानं मला त्यांनी गाणी म्हणून दाखविण्याची विनंती केली. मी त्यांना गाऊन दाखविली. ते मला म्हणाले, "तू आमच्याबरोबर चल. गाणी म्हणत म्हणत आपण शहरोशहरी फिरू. आपल्याला चांगले पैसे मिळतील. ते आपण वाटून घेऊ." ही कल्पना मला जरा चमत्कारिक वाटली.

त्या रात्री पूर्णचंद्र उगवला होता. आकाश स्वच्छ होतं. छान चांदणं पडलं होतं. सान्तेफी या तलावाच्या समोर चालत्या गाडीत चढण्याच्या तयारीने आठ माणसं उभी होती. एम्पोरियाला मी ज्या गाडीत चढलो होतो त्या गाडीतून तिचा वेग कमी झाल्याबरोबर मी बाहेर उडी टाकली. पहाट होईपर्यंत मी प्लॅटफॉर्मवरच

झोपलो होतो. सकाळी पाच वाजता मला जाग आली तेव्हा मला कळल की, कॅन्सास राज्यातल्या हचिन्सन या गावी मी आलो होतो. इथून भ्रमन्तीला सुरुवात व्हायची होती. मी पूर्वी ऐकल होत की, रेल्वेरस्त्याच्या आसपास असलेल्या घरात काम मागण्यासाठी जाण्यात काहीं अर्थ नसतो, कारण अनेक धंदेवाईक भटक्यानी भीक मागण्यासाठी जाऊन या माणसाना चागलच हैराण केलेल असत. त्यामुळे तिथल्या घरात न जाता मी आठदहा चौक पुढ चालून मी तिसऱ्या घरी गलो. आणि एकदोन घरापुढे जाऊन, "मला न्याहारी द्याल तर त्याच्या मोबदल्यात मी तुमच थोड काम करून देईन" अस म्हटल. परतु या दोन्ही घरातल्या लोकानी माझ्याकडे पाहून दरवाजे लावून घेतले. थोडस पुढे चालून मी तिसऱ्या घरी गलो. त्या घरातल्या बाईने मात्र मला लाकड तोडण्याच काम दिल माझ काम झाल्यावर त्या बाईने आणि तिच्या मुलीने मला घरात नेऊन पोटभर खाऊ घातल माझ खाऊन झाल्यावर मी त्याचे आभार मानले आणि निघालो. जाताना त्यानी मला आणखी थोड खाण बाधून दिल

आर्थिक मदीचा काळ हळूहळू ओसरत होता अस वर्तमानपत्र म्हणत होती पण तरीहि शेकडो माणस बेकार होतीं. आपली घरदार सोडून काम मिळविण्यासाठी ही माणस गावोगाव भटकत होती. यात काही धंदेवाईक भटक्येहि होते. काम न करणाऱ्या भटक्यात दोन वर्ग होते. एक भीक मागून निर्वाह करणारा आणि दुसरा चोऱ्या करून हे भीक मागणारे भटक्ये करुण कहाण्या सागण्यात, अडचणीचीं गाऱ्हाणी गाण्यात पटाईत होते. वाटेवर भेटलेल्या एखाद्या नागरिकाच चित्त द्रवून त्याने खिशातून पैसे काढून द्यावेत म्हणून हे भीकमागे भटके स्वतःविपर्यीच्या कपोलकल्पित करुण कहाण्या सागत. ही करुण कहाणी फार लाबवण्यात मात्र अर्थ नसतो, कारण मग तो नागरिक कुतूहलापोटी चार प्रश्न विचारू लागायचा, त्याच्या प्रश्नाला उत्तर देण्याच्या फदात जर हा भटक्या पडला तर अर्थातच वेळ लागायचा आणि इतक्यात वाटेतला एखादा पोलिसशिपाई नेमका येऊन टपकायचा ! !

चोऱ्या करून उदरनिर्वाह करणारे भटक्ये कधीच फारसे बोलत नसत. एकदा तपकिरी सूट, तपकिरी शर्ट आणि त्यावर तपकिरी नेकटाय घालणारा एक चोरटा भटक्या मला भेटला. त्याने मला विश्वासात घ्यायचा प्रयत्न केला. माझ्याजवळ येऊन शातपणे तो मला म्हणाला, "मी नेहमी दुसऱ्या मजल्यावर चोरी करतो. या बाबतीत मला तुझा चागला उपयोग होऊ शकेल." त्याची कल्पना अशी

होती की एखाद्या घराच्या खिडकीखाली त्यानं उभं रहायचं, आणि मी त्याच्या खांद्यावर चढून खिडकीतून घरात प्रवेश करायचा, हाताला लागतील ते पैसे आणि दागिने लंपास करायचे. मला तो भेटला तेव्हा त्याचा हा 'धंदा' चांगला चालत नव्हता, परंतु लवकरच चांगले दिवस येतील अशी तो आशा बाळगून होता. त्यानं सुचवलेल्या कल्पनेवर विचार करून काय ते सांगतो असं मी त्याला सांगितलं, परंतु पुन्हा त्याचं तोंड न पाहता मी तिथून सटकलो.

प्रवासात मला अनेक प्रवासी भेटत. त्यांच्या सहवासाचा माझ्या व्यक्तिमत्वावर नेमका कोणता संस्कार घडायचा हे त्या वेळी किंवा आतादेखील सांगणं कठिण गेलं असतं. पण एवढं मात्र खरं की या प्रवासामुळे माझ्यातला आत्मविश्वास मी गेल्सबर्गमध्ये होतो त्यापेक्षा कितीतरी पटीनं अधिक वाढला होता. आत्म-सन्मानाची भावना माझ्या मनात निर्माण झाली होती. मी न लाजता बोलू लागलो होतो. कामावर असताना मला भेटणाऱ्या मुली माझी चौकशी करीत. त्यांच्याशी बोलताना माझा अवघडलेपणाहि कमी होत होता.

लॉरेन्स, पॉनी काउंटी, कॅन्सास इथे भटकत असताना मी एक बेकार भटक्या आहे असं माझ्या मनातहि येत नव्हतं आणि तसं मी कुणाला सांगतहि नव्हतो. याचं कारण होतं. एके काळी या विभागात आमच्या मालकीची जमीन होती. या प्रदेशात चालताना मी कुणीतरी प्रतिष्ठित नागरिक आहे अशा भावनेनं मी चालत होतो. तीन दिवस मी एका मुतारीकडे दिवसाला पंचाहत्तर सेंट्स पगारा-वर काम केलं. त्यानंतर पाच दिवस एका शेतकऱ्याकडे मळणीचं काम केलं. हे काम शरीरश्रमाचं होतं, परंतु बरोबरचे कामकरी आनंदी वृत्तीचे होते. मला चांगलं जेवणहि मिळायचं. गवत साठवून ठेवायची खोली स्वच्छ होती. तिथल्या गवतावर आम्ही चौघेजण झोपत असू. या कामाबद्दल मला जेवण आणि दिवसाला एक डॉलर पंचवीस सेंट्स एवढा पगार मिळायचा. त्यानंतर लॅर्कन येथे चांगलं काम मिळण्याची शक्यता आहे असं मी ऐकलं आणि तिथंच निघालो. मध्ये काही दिवस काम नव्हतं, तेव्हा मला एक भटक्या भेटला. तो मूळचा कॅन्सास शहरातला. पूर्वी तो एका कोळशाच्या दुकानात हिशोब लिहिण्याच्या कामावर होता. दुकान नीट चालेनासं झालं तेव्हा मालकानं त्याला नोकरीवरून काढून टाकलं. या भटक्याजवळ एक पिस्तुल होतं. शिवाय, जवळ चांगलेच पैसेहि तो बाळगून असला पाहिजे असं वाटायचं. त्याचा चेहरा आकर्षक होता. लांबट हनुवटी, ससाण्याच्या चोचीसारखं नाक आणि निळे डोळे

अस त्याच वर्णन करता येईल. त्याच्या त्या निळ्या डोळ्यात पाहिल की सारखं वाटायच की हा माणूस काही दिसतो तितका साधा नाही. हा कधी धोका देईल हे काही सागता यायच नाही. या निळ्या डोळ्याच्या भटक्यान माझ्याशी मैत्री केली. आपण दोघानी बरोबरच प्रवास करू अस त्याने मला सुचवल. परतु मी त्याच्या-बरोबर न जाता लॅकिन येथे एकटाच गेलो सहज मी एकदा रेल्वेच टाइम टेबल पाहिल. मला आढळून आल की गल्सबर्गपासून लॅकिन सहाशे चौऱ्याऐंशी मैल दूर होतं. रेल्वे लाइन सोडून मी केलेली भ्रमती जमेस धरली, तर मी घर सोडल्यापासून एक हजार मलाचा प्रवास केला होता लॅकिन येथे एका शेत-कऱ्याकडे मी धान्यमळणीच काम केल त्याच्याकडच काम सपल की दुसऱ्या शेतकऱ्याच्या शेतावर जाऊन काम करायच असा क्रम चालू ठेवला.

लॅकिनला मी एका चालत्या गाडीत चढलो. दोन डबे एकमेकावर आदळू नयेत म्हणून बसविलेल्या 'बम्पर'वर उभा राहून मी प्रवास करीत होतो. ब्रेकमनने हुसकून लावल्याबरोबर मी खाली उडी टोकली आणि पळू लागलो. वाटेत मला तो निळ्या डोळ्याचा भटक्या भेटला. मध्यरात्रीची वेळ होती. आम्ही दोघ एका हॉटेलात गेलो आणि तिथे जेवण घेतल बिल आपणच देणार असा त्या निळ्या डोळ्याच्या भटक्यान आग्रह धरला आणि बिल त्यान दिलहि तो म्हणाला, "सध्या खिसा गरम आहे" पुढची गाडी मी पकडणार अस मी त्याला सागितल. माझ्याबरोबर पाण्याच्या टाकीपर्यंत तो चालत आला. वाटेत आपल्या खिशातल पिस्तुल काढून त्यान मला दाखवल आणि तो म्हणाला, "हे पाहिलस, याच्यामुळे कष्ट न करता भरपूर पैसे मिळतात. एखादा माणूस भेटला की मी त्याला हे पिस्तुल काढून धमकावतो आणि त्याच्या जवळचे असतील नसतील ते पैसे काढून घेतो." माझ्याजवळ तीस डॉलर्स होते. मला पिस्तुल दाखवून तो माझ्याकडचे सगळे पैसे काढून कसे घेत नाही याच मला आश्चर्य वाटल. पिस्तुल दाखवून त्यान जर मला धमकावल असत तर जीव वाचवण्यासाठी मी माझे सगळे पैसे त्याच्या हवाली केले असते या-विषयी शकाच नाही. मला वाटल की मी एखाद पिस्तुल विकत घ्याव आणि त्याचा भागीदार म्हणून या वाटमारीच्या धद्यात सामील व्हाव अशी त्याची इच्छा असावी. मी जाताना मला तो म्हणाला, "मी एकदोन दिवस इथेच थाबणार आहे. इथे एखादा चागला डल्ला मारण्याची सधि मिळेल असं मला वाटत. त्यानतर मी 'कलिंगडाच्या सणाला' रॉकीफोर्ड येथे जाईन. तिथे मी तुला भेटेन."

रॉकीफोर्ड येथे कलिंगडाचं खूप मोठं पीक येतं. हंगामातला एक दिवस 'कलिंगडाचा सण' म्हणून उत्सवासारखा साजरा करण्याची इथं पद्धत होती. या दिवशी कलिंगडं फुकट वाटण्यात येत. आजूबाजूच्या हजारो माणसांची गर्दी इथं लोटायची. एका गर्दीच्या पॅसेंजर ट्रेनमध्ये मी घुसलो आणि रॉकीफोर्ड इथं येऊन ठेपलो. माझ्याजवळची सॅंडविचेस मी खाल्ली आणि भटकायला निघालो हवेत गारवा होता. आजूबाजूचे उंच उंच कडे पाहून माझं मन भारावून गेलं. डोंगराळ प्रदेशाचं असं सौंदर्य मी पूर्वी पाहिलं नव्हतं एके ठिकाणी डोंगराच्या कड्याचं एक उंच सुळका हात वर करावा तसा मला दिसला. माझ्या मनात एकदम विचार आला की हा कडा नसून आश्वासन देण्यासाठी ईश्वरानं वर उचललेला हात असेल. हे शब्द तोंडी यावे, असं काहीं यापूर्वी पाहिल्याचं मला आठवेना.

पुढं मी डेन्वर शहराच्या दिशेनं निघालो. बहुतेक प्रवास रात्रीच्या वेळी बम्पर-वर उभा राहूनच मी करायचा बम्परवर पाय ठेवायचे आणि डब्याच्या कड्यांना हात धरून लोंबकळायचं हे केवढं मोठं दिव्य आहे हे अनुभवाशिवाय कळायचं नाहीं रात्री कडाक्याची थंडी पडायची. प्रवास करताना जरा जर डोळा लागला आणि त्याच वेळी कडीवरचा हात सटकला की संपलंच सगळं! डुलकी येत आहे असं वाटलं की मी माझ्यावरच ओरडून म्हणत असे, "गाढवा, झोपतोयस काय? मरशील लेका!" जागरण आणि थंडी यांनी मेंदू नुसता सुन्न व्हायचा. बम्परवरच्या या प्रवासात जगलो वाचलो तर नशीब अशी भावना सारखी मनात असायची. एखाद्या पहारेकऱ्यासारखाच मी तीव्र दक्षतेनं माझ्या झोपेवर पहारा करीत बसायचा झोप येऊ नये म्हणून मी पाच-पाच मिनिटांनी बम्परवर पाय ठेवण्याच्या जागा एकसारख्या बदलीत असे तरीहि झोप आवरणं कठिण आहे याची मला जाणीव व्हायची. मग मी माझ्या डोक्यावर थडाथड गुद्दे लगावून घ्यायचा. पायावर जोरानं पाय आपटायचा. एक तासभर कडाक्याच्या थंडीच्या त्या रात्री बम्परवर लोंबकळत मी माझ्या झोपेशी असा निकराचा संग्राम केला. अखेर गाडी थांबली तसा मी उडी मारून खाली उतरलो. मी जिवंत आहे या जाणिवेनं मला विलक्षण समाधान वाटलं. मी परमेश्वराचे आभार मानले.

डेन्वर येथे विंडसर या राजेशाही हॉटेलात मी दोन आठवडे बशा विसळण्याचं काम केलं. या कामाबद्दल मला जेवण आणि आठवड्याला दीड डॉलर मिळायचा. आता पुढे काय करायचं? ही भटकंती आणखी काहीं काळ पुढं चालू ठेवायची की पुनः गेटसबर्गला घरी जायचं? मला घरची ओढ लागली हे अगदी खरं होतं.

गेल्सबर्गच्या दिशेन मी निघालो. वाटेत तीन दिवस एका जंगलात थांबलो. जंगलात मला ते पाच भटक्ये भेटले. आम्ही सर्वांनी एका झऱ्याच्या काठी स्वच्छ कपडे धुतले. आजूबाजूच्या शेतातल धान्य काढून आम्ही सहाजण भाजून खात असू. रात्रीच जेवण झाल्यावर शेकोटी करून आम्ही सगळे गप्पा मारीत बसायचे. त्यानंतर मी पुन्हा एका चालत्या गाडीत चढलो आणि नेब्रास्का शहरात आलो. या शहरात एक वकील होता, त्यान मला लाकड तोडण्याच काम दिल. या कामाबद्दल मला दोन वेळच भरपूर जेवण मिळाल. माझ्या अंगावरचे कपडे बरेच फाटले होते. त्या वकिलान माझी दया येऊन मला आपला एक जुना सूट दिला. वकिलाच्या दृष्टीन तो लोकरी सूट जुना असला तरी तेवढा चांगला सूट मी माझ्या आयुष्यात कधी वापरला नव्हता हे मात्र मला माहीत होत. तो सूट मी घेतला आणि कृतज्ञताबुद्धीन 'आणखी काहीं काम करून देऊ का ?' असं त्या वकिलाला विचारल. यावर तो वकील हसला आणि म्हणाला, "आता कामबिम काहीं नको. तू तडक आपल्या घरी जा कसा !" त्या रात्री मी आणि माझ्या-बरोबरच्या चार भटक्यांनी एका गाडीत झोपायच ठरवल. रात्रीची वेळ. दाट धुके पडल होत. थंडीन आम्ही गारठलो. अखेर आम्ही खाली उतरलो. आम्ही पाचजण तडक शहरातल्या पोलिस चौकीवर गेलो. "आम्ही बेकार भटक्ये आहोत, आम्हाला आजची रात्र लॉकअपमध्ये ठेवा" असं तिथल्या पोलिस अधिकाऱ्याला सांगितल. त्यांनं आम्हाला लॉकअपमध्ये ठेवल. ती खोली अस्वच्छच होती, पण तिथं आम्ही थंडीन गारठणार नव्हतो. वर्तमानपत्राच्या घड्या आम्ही जमिनीवर पसरल्या आणि झकास झोप काढली. दुसरे दिवशी सकाळी त्या पोलिस अधिकाऱ्यान आम्हाला लॉकअपमधून बाहेर काढल आणि आत्ताच्या आत्ता शहरातून चालते व्हा असं बजावून सोडून दिल. तिथून मी ओमाहा या शहरी आलो. कॅन्सास, ओमाहा, डेन्वर या शहरात असताना मी युनायटेड स्टेट्सच्या सैन्यभरतीच्या कचेरीसमोर उभा राहून सैन्यात सामील व्हाव की नाहीं याचा अनेक वेळा विचार करीत असे. माझ मन सारख मागपुढ व्हायच. सैन्यात फार तर दोन वर्ष काम करायला मी तयार होतो. परंतु भरती व्हायच म्हणजे कमीत कमी तीन वर्षांचा करार करण आवश्यक होत. ही तीन वर्षांची मुदत मला जड वाटायची.

पंधरा ऑक्टोबरला दुपारच्या वेळी मी गेल्सबर्गला येऊन पोचलो. वेरीन स्ट्रीट-वर आलो. ज्या घराचा दरवाजा न ठोठावता मी तडक आत शिरू शकत होतो

अस अमेरिकेतील ते एकमेव घर मला दिसल. या घरातली माणस माझ्या स्वागतार्थ सदैव सज्ज होती होय, ते माझ घर होत मी आतापर्यंत घरी फक्त तीनच पत्र पाठविली होती. घरी गेलो तेव्हा घरातल्या माणसांनी माझ्यावर प्रश्नाचा भडिमार केला मी कुठ कुठ प्रवास केला? मला काय काय अडचणी आल्या? मी काय काय पाहिल अनेक प्रश्न त्यानी मला विचारले. माझ्याजवळ पधरा डॉलर्स शिल्लक होते ते मी बाबाना दाखवले. ते म्हणाले, "बर झाल. घरात अडचण होतीच पैशाची." रात्री स्वच्छ चादर असलेल्या बिछान्यावर झोपताना समाधानान माझ मन काठोकाठ भरून आल.

माझ्या अगावरचा लोकरीचा नवा सूट मार्टने पाहिला तेव्हा तो मला म्हणाला, "हा सूट तू नक्कीच विकत घेतलेला नाहीस. काय भानगड आहे साग पाहू?" मग मी त्याला तो सूट मला कसा मिळाला ते सविस्तर सागितल. बोलता बोलता मार्ट मला म्हणाला, "ऑगस्टमध्ये वर्तमानपत्रात मी अशी बातमी वाचली की एक भटक्या पश्चिम कॅन्सासमध्यें बम्परवर लोंबकळून प्रवास करीत असताना खाली पडला आणि मेला. ती बातमी मी वाचली तेव्हा तूच तो असावास अशी अशुभ कल्पना मनात येऊन मी अगदी घाबरून गेलो. पण मी घरातल्या कुणालाच ती बातमी सागितली नाही" मग मी मार्टला कोलॅरॅडो येथे माझ्यावर असाच प्रसग कसा येत होता आणि त्यातून ईश्वरकृपेने मी कसा वाचलो हे सागितल.

या प्रवासाचा मला काय फायदा झाला मी निश्चित सागू शकत नाही. पण एवढ खर की या प्रवासामध्ये माझ्यात खूपच बदल झाला होता. मी मोकळेपणाने लोकाच्या डोळ्याला डोळा भिडवून आता पाहू शकत होतो. कुणीहि मला कसलाहि प्रश्न विचारला तरी मी सहजपणे त्याच उत्तरहि देऊ शकत होतो किंवा हव असल्यास तो प्रश्न टोलवूहि शकत होतो. मी घरी आल्यावर 'बागाच टोळक' माझ्याभोवती जमा झाल. मी बदललो आहे हे त्यानाहि जाणवल होत पण नेमका माझ्यात काय बदल झाला आहे हे माझ्याप्रमाणेच त्यानाहि सागता आल नसत. खोल खोल कुठतरी माझ्या मनात नवी आशा, नवी उमेद निर्माण झाली होती. जीवनात अनेक अडचणी असतात, सकट कोसळतात हे मला कळल होत. परतु कितीहि सकट कोसळली, कसल्याहि अडचणींना मला भेडसावल तरी यापुढं मी कधीहि डरणार नव्हतो—झगडत झगडत मी पुढे जाणार होतो.

# लढाईवर

गेल्सबर्गच्या पश्चिमेकडे तीन मैलावर स्वाझे नावाच्या शेतकऱ्याचं एक शेत होतं. स्वाझे शेतीबरोबरच दुधाचा व्यापार करीत असे. मी त्याच्याकडे कामाला राहिलो. पहाटे साडेचारला उठून मी आणि स्वाझे बावीस गाईचं दूध काढीत असू. मी आठ गाईचं दूध काढायचा. माझ्याहून वयानं मोठा स्वाझे भराभर काम करायचा. तो चौदा गाईचं दूध काढायचा. हे दूध आठ मोठ्या हड्यात भरून आम्ही हे हंडे दुधाच्या गाडीत ठेवत असू. मग न्याहारी करून मी ही गाडी घेऊन शहरात घरोघरी दुधाचा रतीब घालण्यासाठी जात असे. ' शिकागो रेकॉर्ड ' हे वृत्तपत्र मी दररोज विकत घेत असे. दुधाच्या गाडीत बसल्या बसल्या माझं वृत्तपत्रवाचन चालू असे. शिकागो रेकॉर्डमध्ये होम युनिव्हर्सिटीची व्याख्यानमाला प्रसिद्ध होत असे. शिकागो युनिव्हर्सिटीतल्या वाङ्मय, इतिहास, राज्यशास्त्र इत्यादि विषयाच्या अध्यापकांची व्याख्यानं या मालेत होत. घोडे हळू हळू गाडी ओढत चालत असत. माझ्या दुधाच्या गाडीत बसून चाललेल्या ज्ञानसाधनेत ते मुळीच व्यत्यय आणीत नसत. दुपारच्या जेवणानंतर मी दुधाचे हंडे स्वच्छ धुवून ठेवत असे. त्यानंतर मी आणि स्वाझे पुन्हा गाईचं दूध काढीत असू. स्वाझे हा सहृदय आणि उमदा मनुष्य होता. त्याची बायको मजबूत बांध्याची पुरश्री होती. स्वाझे कुटुंब मेथॉडिस्ट पंथाचं होतं. मी रात्रीच्या जेवणानंतर तास दोन तास बसून त्यांच्या घरातली पुस्तकं आणि मासिकं वाचीत असे. एकदा असंच मला वाचताना पाहून स्वाझेची पत्नी माझ्याजवळ आली आणि मला म्हणाली, " चार्ली, तू कुणीतरी मोठा माणूस होणार आहेस असं मला नक्की वाटतं. " यापूर्वी माझी बहीण मेरी हिनेच फक्त माझ्याविषयी असा विश्वास व्यक्त केला होता. दररोज रात्री साडेआठ वाजता मी झोपत असे. मी प्रवासाहून गेल्सबर्गला आलो तेव्हा माझं वजन एकशे छत्तीस पौंड होतं. स्वाझेकडे मी कामाला लागलो तेव्हा सोळा पौंडानी माझं वजन वाढलं.

फेब्रुवारीच्या मध्याला मी स्वाझेकडची नोकरी सोडली. एका स्वीडिश

रगाऱ्याकडे तो व्यवसाय शिकण्याच्या निमित्तानं मी नोकरी पत्करली. कुठलातरी एक व्यवसाय नीट शिकावा अशी माझी फार इच्छा होती. पुन्हा एकदा तशी संधि चालून आली याच मला फार बर वाटल. दहा तास मला काम कराव लागे. या दहा तासापैकी फारच थोडा वेळ मला रग देण्याची संधि मिळे. बहुतेक सगळा वेळ ज्या वस्तूला रग द्यायचा ती वस्तु खरखरीत कागदाने घासून देण्याचच काम माझ्याकडे असे. ज्या स्वीडिश रगाऱ्याकडे मी कामाला राहिलो होतो तो अगदी मद्दड चेहऱ्याचा माणूस होता. सारा दिवस तो घुम्यासारखा बसून राही. मी 'गुडमॉर्निंग' म्हणालो की मोठ्या कष्टान तो नुसताच हुकार देत असे एकहि शब्द न बोलता, जराहि न हसता मुतर्की चेहरा करून काम केल पाहिजे अस त्या रगाऱ्याच मत होत. एकदा मी काम करीत असताना माझ्याशीच कसलस गाण गुणगुणत होतो त त्या रगाऱ्यान ऐकल आणि माझ्याकडे असा काही चेहरा करून पाहिल की माझा आवाज घशातल्या घशात थिजून गेला आहे अस मला वाटल. सकाळी सात वाजल्यापासून भिती आणि कपाट खरखरीत कागदान घासून रग देण्यासाठी गुळगुळीत करण्याच माझ काम सुरु व्हायच प्रत्यक्ष रग देण्याच काम सहसा मला मिळतच नसे. मी भित घासून गुळगुळीत केली की तो रगारी आणि त्याचा भागीदार रग देत असत.

पधरा फेब्रुवारी अठराशे अठ्याण्णवमधली एक रात्र. त्या रात्री साडेनऊ वाजता मी झोपी गेलो रात्री दोन वाजता वॉशिंग्टनमध्ये आरमाराच्या सरचिटणिसाचा दरवाजा कुणीतरी ठोठावला आणि त्याला उठवल. त्यान दार उघडून पाहिल तो एक तार आली होती. त्याने ताबडतोब राष्ट्राध्यक्षाना फोन केला आणि त्याना तार वाचून दाखविली. तारेतला मजकूर असा होता : "रात्री पावणेदहा वाजता हॅवॅना बदरात 'मेन' बोटीत स्फोट झाला. अनेकजण जखमी झाले, बरेचजण बुडाले." मेन ही एक उत्कृष्ट युद्धनौका होती. अचानक तिच्यावर स्फोट झाला आणि ती पाण्याच्या तळाशी गेली. त्या युद्धनौकेवर तीनशेबावन्न अधिकारी आणि इतर माणस होती. त्यापैकी दोनशेसाठ माणस ठार झाली.

सॅडपेपरन भिती घासण्याच माझ काम आपल चालूच होत. त्याच वेळीं माझ्या कानावर अस आल की क्यूबाच्या स्वातत्र्य-सैनिकावर ज्या जनरल वायलरने अत्याचार केले होते त्यानेच मेन ही युद्धनौका बुडवली होती. खर म्हणजे मेन ही युद्धनौका नेमकी कोणत्या कारणामुळे बुडाली हे कुणालाच निश्चित ठाऊक नव्हत. ती मुद्दाम कुणी बुडवली की अपघात होऊन ती बुडाली हें नक्की

सांगता आलं नसतं. क्यूबाच्या स्वातंत्र्ययुद्धाला लक्षावधि अमेरिकनांची सहानुभूति होती. स्पॅनिश सरकारचा हा कुटिल डाव उधळून टाकला पाहिजे असं जनतेला वाटत होतं. युद्ध जर सुरू झालं असतं तर काय करायचं हे मी माझ्या मनाशी ठरवून टाकलं होतं. मार्च-एप्रिल महिन्यात स्पॅनिश सरकारविरोधी घोषणांनी सारा देश दुमदुमून गेला. सॅंडपेपरनं मी एकीकडे भिंती घाशीत होतो आणि दुसरीकडे माझं मन खवळून उठलं होतं. परंतु माझ्या मनातल्या खळबळीचा पत्ता मद्दड चेहऱ्याच्या त्या रंगाऱ्याला मी मुळीच लागू दिला नाहीं. प्रेसिडेन्ट मॅकिन्ले यांनी स्पॅनिश सरकारविरुद्ध युद्धाची घोषणा केली. आणि सव्वीस एप्रिलला इलिनॉयच्या सहाव्या इन्फन्ट्री रेजिमेंटच्या 'सी' कंपनीमध्ये मी माझं नाव दाखल केलं. हे रेजिमेंट देशाच्या सैन्याचाच एक भाग होतं. या रेजिमेंटमधले सैनिक एखाद्या विशेष प्रसंगी गणवेश चढवून खांद्यावर बंदुका टाकून शहरातल्या रस्त्यावरून कवाईत करीत जात. 'सी' कंपनीमध्ये बारा नव्या लोकांची भरती व्हायची होती. या बारा लोकांत सर्वांत प्रथम मी माझं नाव दाखल केलं होतं. कंपनीतल्या बहुतेक सैनिकांची आणि माझी आधीची ओळख होती. कॉर्पोरल कली रोज पूर्वी स्टेज मॅनेजरचं काम करीत होता तेव्हा त्याच्या हाताखाली मी काम केलं होतं. रेजिमेंटमधले तीन चतुर्थांश सैनिक गेल्सबर्गमधलेच होते. बाकीचे गेल्सबर्गच्या परिसरातील गावांतून आले होते.

माझी नोकरी सोडून मी सैन्यात भरती होणार आहे असं मी माझ्या घरी सांगितलं तेव्हा सगळ्यांनाच वाईट वाटलं. परंतु मला कुणीहि थांबवू शकणार नाही हे त्यांना ठाऊक होतं. मार्ट म्हणाला, "आमच्या घरातला एकजण राष्ट्रातल्या सैन्यात आहे याचा आम्हाला अभिमान वाटेल, परंतु युद्धात तू कदाचित मारला जाशील या कल्पनेनं आमच्या हृदयाचा थरकाप होतो." यावर मी मार्टला सांगितलं, "सगळेच सैनिक काहीं युद्धात मरत नाहींत. युद्धात मर्दुमकी गाजवून परत येण्याइतकं माझं दैव शिकंदर नसेल कशावरून?" शिवाय, पश्चिमेकडचा प्रदेश माझा पाहून झाला होता. या युद्धामुळं पूर्वेकडचा प्रदेश पाहण्याची संधि मला मिळणार होती. आगगाडींत बसून आमचं सैन्याचं पथक निघालं तेव्हा निरोप देण्यासाठीं हजारों कुटुंबं स्टेशनवर जमलीं होतीं.

स्प्रिंगफील्ड शहरांत आम्ही आलो तेव्हा आमची उतरण्याची व्यवस्था ज्या घरात झाली तिथं पूर्वी जनावरांचं प्रदर्शन भरलं होतं. त्या जनावरांप्रमाणेंच आम्ही तिथल्या गवतावर ब्लॅंकेट पसरून झोपलो. आमच्यातील काहीं सैनिक

अधूनमधून गाईबैलाच्या हंबरण्याचे आवाज काढायचे. सैनिकाचा गणवेश आम्हाला देण्यात आला नव्हता. रायफल आम्हाला दिलेली होती ती खांद्यावर घेऊनच आम्ही कवाईत करीत होतो.

दहा दिवसातच आम्हाला गणवेश देण्यात आले. लोकरीचा निळा शर्ट, बटण असलेला जाड निळा गळाबंद कोट आणि कोटाच्या कापडापेक्षा दुप्पट जाड असलेल्या कापडाची निळ्या रंगाची पॅंट असा हा गणवेश होता. ग्रॅंट आणि शेरमन याच्या नेतृत्वाखाली पन्नास वर्षापूर्वी लढलेल्या सैनिकांनी हाच गणवेश घातला होता. राष्ट्रीय सैनिकाचा हा गणवेश अंगावर चढवला तेव्हा माझी छाती अभिमानान भरून आली.

लौकरच आमची वैद्यकीय परीक्षा घेण्यात आली. परीक्षा घेणारा डॉक्टर जर्मन होता. नियमाच्या बाबतीत तो फारसा काटेकोर नव्हता. आमच्यातल्या ज्यो डन या सैनिकाची उंची एक इंच कमी भरायला लागली. बाजूला उभे असलेल्या अधिकाऱ्याकडे त्या जर्मन सर्जनने प्रश्नार्थक नजरेन पाहिल. ज्योच्या डोळ्यातून अश्रू ओघळायला लागले. अधिकाऱ्यानी संमतिदर्शक मान हलवली. तेव्हा डॉक्टरने ती टेप आपल्या बोटाला थोडीशी गुंडाळून ज्योच माप घेतल आणि त्याला पास करून टाकल. लवकरच आम्ही स्पॅनिश सैनिकाना जाऊन भिडणार, त्यांच्यावर गोळ्यांचा वर्षाव करणार अशा बातम्या आमच्या कानावर येत होत्या. वॉशिंग्टनला जाताना वाटेत गाडी जिथे जिथे थांबायची त्या त्या स्टेशनावर शेकडो माणस आमच अभिनंदन करण्याकरता जमायची. काही दिवसानी आम्ही वॉशिंग्टनला आलो. तिथून व्हर्जिनियामधील फॉल्स चर्च येथे उतरलो. फॉल्स चर्चपासून दोन मैलावर असलेल्या जंगलात आम्ही गेलो. तिथली झाडझुडप कापली. आमचे तंबू ठोकले. प्रत्येक तंबूत दोन सैनिक राहत असत. दुसरे दिवशी सकाळी आम्ही झाडाच्या फांद्या तोडून आणल्या आणि त्यांची माचण करून त्यांच्यावर झोपलो. माझ्या नशिबान माझ्या तंबूत ॲन्ड्र्यू ट्रॅनिंग हा सैनिक माझा जोडीदार म्हणून आला. ॲन्ड्र्यू टॅनिंग हा स्वच्छ, तत्त्वनिष्ठ आणि उत्तम शिस्त अंगी असलेला सैनिक होता. त्याचा जन्म स्वीडनमध्ये झाला होता. तंबूत एक हात अंतरावर आम्ही दोघ झोपत असू, परंतु रात्री ॲन्ड्र्यू एकदाहि घोरला नाही. आठवड्यातून दोनदा गेटसबर्गमध्ये असलेल्या आपल्या प्रेयसीला तो पत्र लिहायचा. या स्वीडिश मुली-बरोबरच पुढे त्याने लग्न केल. या स्वीडिश मुलीनंतर ॲन्ड्र्यूच प्रेम आपल्या

बदुकीवर होत. आपली बदूक दररोज घासून पुसून तो लख्ख ठेवीत असे. स्वतःचा उल्लेख आपल्या नावान न करता तो आपल्या रायफलच्या नबर घेऊन करीत असे. तबूत प्रवेश करण्यापूर्वी तो मोठ्यान ललकारी द्यायचा, "अडतीस नबर आ रहा है." 'सी' कपनीत सैनिक म्हणून तो दोन वर्ष होता. आम्ही सुरू केलेल्या 'मॉनर्क क्लब'चा तो पूर्वी सभासद होता. त्याची प्रेयसी ॲमाडा हॅन्सन आणि बहीण टीली याच्याबरोबर मी वॉल्ट्झ नृत्य केलेल मला आठवल. निळ्या आकाशात शुभ्र पीस भिरभिरत जाव तशी टिली नाचत असे. युनियन हॉटेलमध्ये देखरेखीच्या कामावर ॲन्ड्र्यू होता. त्या वेळी मी युनियन हॉटेलच्या सलूनमध्ये पोऱ्याच काम करीत होतो असा आमचा पूर्वपरिचय असल्यामुळे दोघाच्याहि जिव्हाळ्याचे अनेक विषय आम्हाला गप्पा मारण्यास सापडत. जूनच्या अखेरपर्यंत आमच्या कवायती जोरजोरात चालू होत्या. जवळच्याच एका पाण्याच्या नळावरून पाणी आणून आम्ही आमच्या तबूत ठेवीत असू जगलातल्या एका झऱ्यावर आम्ही आमचे कपडे धुवायचे प्रत्यक्ष युद्धात जरी आम्ही सामील झालो नसलो तरी आमच्या कॅपमध्ये शिस्त बाणण्याच्या दृष्टीन युद्धाचच वातावरण ठेवण्यात आल होत त्यामुळे रॅशनचच अन्न आम्हाला मिळत असे. आर्थर मेटकाफ हा आमच्या कपनीचा मुख्य स्वयपाकी होता. तो सदा हसतमुख असायचा. जे काही रॅशन मिळायच त्याचा तो शक्य तितका उत्तम स्वयपाक करून वाटायचा. वॉशिग्टन शहरापासून—जिथ युद्धखात्याची कचेरी होती—आम्ही सात मैलावर होतो.

थॉमस लेस्ली मॅक्गर हा आमचा कॅप्टन होता. गेलसबर्गमधील तो एक दुसऱ्या दर्जाचा वकील होता मॅक्गरजवळ एक पिवळ्या केसाचा कुत्रा होता. या कुत्र्याच नाव होत स्मगलर. माझा पूर्वीचा एक वर्गमित्र कॉनरॅड बायलॉफ हा आमचा फर्स्ट लेफ्टनट होता. त्याचा बाप पूर्वी स्वीडिश सैन्यात सैनिक होता. कॉन्रॅडकडे पाहिल्यावर अस वाटायच की सैन्याधिकाऱ्याचे गुण हा जन्मतःच घेऊन आला आहे. इतर सैनिकाना त्याच्याविषयी प्रेम वाटायच. हुकूम करताना त्याच्या व्यक्तित्वाला करारीपणाची तिखट धार यायची. परतु आमची कवाईत घेण्यापूर्वी आमच्याकडे पाहून तो अस काही स्मित करायचा की शरीरश्रमाचा सारा शीण ओसरून आम्ही मजेन खेळतो आहोत अस आम्हाला वाटायच. डॅनियल स्मिथ हा विद्वान् मनुष्य आमचा सेकड लेफ्टनट होता. आपल्या हाताखालच्या लोकाशी तो सहानुभूतीने वागत असे.

आमच्या कपनीतल्या नऊ सार्जट्स आणि आठ कार्पोरल्सपैकी कुणाविषयीहि मला अनादर वाटत नसे. दिवसातून पाच-सहा वेळा हजेरी घेण्यासाठी शभर नाव मोठ्यामोठ्यान पुकारणाऱ्या आणि त्या निमित्तान आपल्या घशाला वळण देणाऱ्या त्या 'पहिल्या सार्जटला' कोण कसा विसरेल? काही दिवसानी या हजेरीनील नावाची आम्हा सगळ्याना इतकी सवय झाली की आमच्यापैकी कोणीहि पहिल्या बेजामिन ॲडरसनपासून शेवटच्या हेन्री वुडवर्डपर्यंत सगळी नाव न चुकता क्रमान म्हणून दाखविली असती. एफ् एल्. मर् जॉन्सन हा फर्स्ट सार्जट होता. तो सपाटून काम करायचा.

आमच्या कपनीतले दहा सैनिक नॉक्स कॉलेजचे विद्यार्थी होते, आणि लोंबार्ड कॉलेजचे दोघेजण होते. वीसजण शेतात काम करणारे होते. आमच्यापैकी ज्याच्या कुणातरी नातेवाइकानी पूर्वीच्या यादवीत भाग घेतलेला होता असे वीस तरी सैनिक निघाले असते. वेगवेगळ्या कारणासाठी हे लोक सैन्यात भरती झाले होते. काहींतरी धाडस करायच, जीवनातल्या अडचणीना न डरता तोड द्यायच अशा हेतून काहींजण आले होते. हा सगळ्यात उच्च हेतु होता अस मी म्हणेन. गूढ अशा देशप्रेमाच्या भावनेन काही जणानी सैन्यात प्रवेश केला होता. घरातल्या एकसुरी वातावरणाला कटाळून काही जण आले होते त्यापैकी दोघे तरी असे होते, की ज्याच्या बायका विलक्षण कजाग होत्या. त्याच्या जाचामुळे ते सैन्यात भरती होणार नाहीत तर काय? सैनिक म्हणून सेवानिवृत्त झाल्यावर पेन्शन मिळते हे कारण काहीं जणाच्या येण्यामागे होत. अशा वेगवेगळ्या कारणामुळे या सैनिकानी सैन्यप्रवेश केला होता.

६ जुलै रोजी अटलाटिक कोस्ट लाइनवरून जाणाऱ्या आगगाडीतून आम्ही निघालो ते व्हर्जिनिया आणि नॉर्थ कॅरोलिना ओलाडून आम्ही साउथ कॅरोलिना येथील चार्ल्स्टन या गावी येऊन पोचलो. तबाखूची आणि कापसाची शेत आम्ही प्रथम इथच पाहिली. गणवेश घालून आम्ही चार्ल्स्टन शहरात भटकायला निघालो तेव्हा तिथल्या जनतेन रस्तोरस्ती आमच मनःपूर्वक स्वागत केल. एकाहि सलूनमध्ये किंवा हॉटेलमध्ये आमच्याकडून पैसे घेतले नाहीत.

बदरात रिटा ही युद्धनौका नागर टाकून उभी होती. स्पॅनिश लोकाकडून अमेरिकन सैन्याने जिकून घेतलेली ही पहिली युद्धनौका. जुलै ११ ला आम्हीं तिच्यातून प्रवास सुरू केला. पहिल्याच दिवशी आमच्यापैकी एकजण म्हणाला, "व्हिस्कीच्या ग्लासात अंड तरगत तशी ही युद्धनौका पाण्यात तरगते आहे."

क्यूबाच्या उपसागरात १७ जुलै रोजी रिटा युद्धनौका येऊन ठेपली. ऑर्गोन, इंडियाना, आयोवा या युद्धनौका आधीच तिथं उभ्या होत्या. त्यांच्या डेकवर उभ्या असलेल्या सैनिकांनी आणि अधिकाऱ्यांनी आमचं हर्षभरानं स्वागत केलं. दुसरे दिवशी सकाळी आम्हाला बातमी कळली की सॅंटिआगो काबीज करण्यात आलं आहे आणि आम्हाला क्यूबामध्ये लढण्यासाठी आता जाण्याचं कारण नाही. ही बातमी ऐकून आमच्यापैकी काहीजण निराश झाले, तर काहींना बरं वाटलं.

काही दिवसांनी गटॅनॅमो या उपसागरातून आम्ही निघालो. त्याच वेळी बातमी ऐकली की आम्ही आता पोर्टो रिको येथं जाणार आहोत. आम्ही जर वर्तमानपत्र वाचली असती तर आम्हाला कळलं असतं की आम्ही खरं म्हणजे केप फॅजार्डो येथं जाणार आहोत. केप फॅजार्डो, सॅनजीवान या पोर्टो रिकोच्या राजधानीजवळ होतं. पोर्टो रिकोच्या दिशेनं आम्ही अर्ध्या वाटेवर गेलो. जनरल नेल्सन ए. माइल्स यांनी अचानक आपलं धोरण बदललं. ज्या अर्थी आम्ही केप फॅजार्डो येथे जाणार असं वृत्तपत्रातून प्रसिद्ध झालं आहे त्या अर्थी ही बातमी सर्व जगाला कळली असणार म्हणूनच जनरल माईल्सने धोरण बदलून पोर्टो रिकोच्या दक्षिण किनाऱ्यावर प्रथम उतरण्याचं ठरविलं. जनरल माइल्सने अकस्मात् दक्षिण किनाऱ्यावर आक्रमण केल्याची बातमी युद्धाच्या सेक्रेटरीला कळली तेव्हा त्याला खरंच आश्चर्य वाटलं असं म्हणतात.

गॉनिका येथे आम्ही गेलो तेव्हा स्पॅनिश सैन्य आम्हाला येथं गाठणार आणि युद्ध होणार असं आम्हाला वाटलं होतं. शहराजवळच्या एका शेतात आम्ही तळ ठोकला. दुरून बंदुकीचे आवाज आम्हाला ऐकू आले. आता युद्ध होणार या विषयी आम्हाला खात्री वाटली. बंदुकीचे आवाज ऐकले की प्रत्येक वेळी आम्हाला असंच वाटायचं. पण एकदाहि प्रत्यक्ष युद्ध करण्याची आम्हाला संधि मिळाली नाही दुसरे दिवशी सकाळी आम्ही थानूको येथे आणि तिथून पान्स येथं गेलो रात्री आम्ही एका जंगलात राहिलो. त्या जंगलात इतके डास होते की काही विचारू नका त्या डासांच्या पलटणींचा गूंऽग गूंऽग आवाज ऐकून आमच्यापैकी एकजण म्हणाला, " बिगूल वाजवीत हे डासांचं सैन्य आता जेवण घ्यायला चाललं. " हे वाक्य उच्चारणाऱ्या सैनिकाला इतके डास चावले होते की त्याचं तोंड अक्षरशः सुजलं होतं. माझा एक डोळा सुजून मिटला होता. काही लोकांचे दोन्ही डोळे मिटले होते!! रात्रीच्या वेळी ब्लॅकेट डोक्यावरून घेऊन मी झोपत असे. मध्येच गुदमरल्यासारखं वाटून जाग यायची. मग डोक्यावरलं ब्लॅकेट

माजला करायचं. गुणगुणणारा डासांचा जथा हातांनी दूर हाकलायचा आणि मोकळा हवेत श्वास घेऊन पुन्हा डोक्यावरून पांघरूण घेऊन झोपायचं. दर अर्ध्या तासानं हा क्रम चालू असायचा. डास, डोकेदुखी आणि जागरण यांनी आम्ही हैराण झालो.

रस्तोरस्ती स्पॅनिश सरकारच्या जुलमातून मुक्त झालेली जनता आमचं हार्दिक स्वागत करण्याला उभी असे या माणसांची कृश शरीरं, फुगलेली पोटं, आणि निस्तेज चेहरे जुलमी स्पॅनिश राजवटीची ग्वाही देत. काही दिवस पोन्स येथे राहून डोंगराळ रस्त्यानं आम्ही पुढे निघालो. उन्हाच्या कडाक्यानं आम्ही भाजून निघत होतो वाटेत जवळचं ओझं कमी करण्याकरता काहींनी आपलाजवळची ब्लँकेट टाकून दिली तर काहींनी ती फाडून अर्धे तुकडेच आपल्याजवळ ठेवले होते वाटेत उतरणीवरच्या एका रस्त्यावर आम्हा थांबलो रात्री सगळं शांत होतं. थकून भागून सारेजण शांत झोपी गेले होते. इतक्यात कुणाच्या तरी हृदयभेदक किंकाळीनं आम्ही जागे झालो धावपळ सुरू झाली. जे झोपेतून उठले नाहीत ते तुडवले गेले. आमचं सामान आणि दारूगोळा वाहून नेणाऱ्या बैल गाड्यांपैकी एका गाडीला जुंपलेला बैल उधळला गेला होता आणि त्यानं हा सगळा हाहाःकार उडवला होता

कुटुआडो येथे आम्ही आलो तेव्हा तह झाल्याची बातमी आली. आम्ही आनंदानं आरोळ्या ठोकल्या आमच्यापैकी बऱ्याचजणांचं वजन कमी झालं होतं. एप्रिलमध्ये माझं वजन एकशे बावन्न पौंड होतं. ऑगस्टमध्ये ते एकशे तीस पौंडावर आलं आमची शरीरं रापून निघाली होती अंगावरचे गणवेश फाटले होते आणि हॅटना भोकं पडली होती तेथून आम्ही न्यूयॉर्कला गेलो.

रिचर्ड डेव्हिस यानं या युद्धावर एक लेख लिहिला होता. आपल्या लेखात त्यानं असं विधान केलं होतं की जनरल माइल्स यांच्या नेतृत्वाखाली पोर्टो रिको येथे गेलेल्या सैन्यपथकाला फारसा त्रास झालाच नाही—ती एक सहलच होती. सँटिआगो येथल्या रणधुमाळीच्या मानानं आम्ही जे सोसलं होतं ते काहीच नव्हतं हे खरं. परंतु आम्हाला काहीच त्रास झाला नव्हता हे विधान मात्र हास्यास्पद होतं. म्हणे आम्ही सहलीला निघालो होतो! सहलीला निघालेल्या माणसांना उन्हापावसातून, दोपरभर चिखलातून आमच्यासारखं वणवण फिरावं लागतं? सहलीला निघालेल्या माणसांना महिनोंमहिने टिनमधल्या थंडगार चाटाण्यावर निर्वाह करावा लागतो? त्यांचं अंग डास चावल्यामुळे सुजून निघतं?

सॅंटिआगोसारखं तुमुल युद्ध, रक्तपात आमच्या वाट्याला आला नव्हता हे खरं, परंतु आम्हींहि काही कमी हालअपेष्टा सोसल्या नव्हत्या.

न्यूयॉर्कमध्ये आम्ही गेलो तेव्हा रस्तोरस्ती लोकांनी आमचं हार्दिक स्वागत केलं. त्यांचे जे नातेवाईक सैन्यात भरती झाले होते त्यांच्याविषयीच्या बातम्या त्यांनी आम्हाला विचारल्या. युद्धात महान् मर्दुमकी गाजवून आलेले आम्ही वीर आहोत अशा भावनेनं ते आमच्याकडे पाहत होते. गेल्सबर्ग राज्यातल्या बर्लिंग्टन स्टेशनवर आम्ही उतरलो तेव्हा शेकडो लोकांचा समुदाय आमच्या स्वागतार्थ जमला होता. माझे आईवडील आणि भावंडं या गर्दीत होती. सध्याकाळी मी माझी बहीण मेरी हिच्याबरोबर डॅंडिडा या गावी गेलो. तिथल्याच एका शाळेत मेरी शिक्षिका होती. मी खूप थकलो होतो. मेरीनं सुंदर मऊ गादी असलेल्या बिछान्यावर माझी झोपण्याची सोय केली. जवळ जवळ अर्धा तास त्या मऊ बिछान्यावर झोपण्याचा मी प्रयत्न करीत होतो, पण झोप लागेना. तेव्हा मी तसाच उठलो आणि जमिनीवरच्या चिध्यांच्या सतरंजीवर झोपलो. पाच मिनिटांत मला गाढ झोप लागली.

दुसरे दिवशी मी माझ्या बेरीन स्ट्रीटवरच्या घरी गेलो. मार्ट गहिवरल्या स्वरात मला म्हणाला, “तू सुखरूप परत आलास हे पाहून आम्हाला खूप आनंद झाला आहे.”

मी म्हणालो, “मला तशी जीव धोक्यात घालण्याची संधीच मिळाली नाहीं.”

मार्टनं विचारलं, “तू नवीन काय शिकलास?”

मी उत्तरलो, “इतरत्र कधींहि शिकायला मिळणार नाहींत अशा अनेक नव्या गोष्टी मी शिकलो.”

मग मार्ट म्हणाला, “गेल्या वर्षी तू भटक्या होतास. या वर्षी तू सैनिक झालास. आता पुढच्या तुझा वर्षी काय बेत आहे?” यावर मी म्हणालो, “पुढच्या वर्षी कॉलेजात जायचं असं म्हणतोय!” हे ऐकून मार्ट उद्गारला, “कॉलेज! छान कल्पना आहे!”

बाबांनी मनःपूर्वक स्मित करून माझ्याशी हस्तांदोलन केलं. त्यामुळे मला माझा खूपच अभिमान वाटला. मला कळलं की आपल्याबरोबरच्या कामगारांना बाबा सांगायचे, “आता माझा पोरगा घरी येणार आहे. युद्धाच्या सगळ्या वार्ता आता आम्हाला कळतील.” आई म्हणाली की आजूबाजूचे लोक, दुकानदार

नेहमीं माझी चोकशी करीत असत. माझ्या पगाराचे एकशे तीन डॉलर्स आणि ब्याहेत्तर सेंट मला मिळाले होते. त्यातले पन्नास डॉलर्स मी बाबाना दिले. अमेरिकेसाठी माझा मुलगा युद्धावर गेला—म्हणजे खऱ्याखुऱ्या अर्थाने आता आपण अमेरिकन नागरिक झालो असं बाबाना वाटलं. त्यानंतर वर्तमानपत्रातून आमचे फोटो आले. ठिकठिकाणी आमचे सत्कार झाले. आम्हाला मेजवान्या दिल्या गेल्या.

प्रत्येक माणसाच्या जीवनात अकस्मात् असे काहीं प्रसंग येतात की त्यामुळे त्याच्या जीवनाला एक वेगळंच वळण मिळतं. माझ्याहि जीवनात असे दोन प्रसंग घडले. आमच्या 'सी' कंपनीमध्ये जॉर्ज लॉगब्रेक नावाचा एक सैनिक होता. तो लोंबार्ड युनिव्हर्सिटीचा विद्यार्थी होता. या युनिव्हर्सिटीची त्याने मला माहिती सांगितली आणि खटपट केली तर मला एक वर्षाची फी माफ होईल असहि तो म्हणाला. कॉलेजमध्ये नाव घालण्याची माझी तीव्र इच्छा आहे असं मी त्याला सांगितलं. चर्चमधल्या आमच्या सत्कारार्थ झालेल्या एका मेजवानीच्या वेळी जॉर्ज मला म्हणाला की, लोंबार्ड युनिव्हर्सिटीत माझं नाव घालण्याची त्यानं व्यवस्था केली आहे.

त्यानंतर विज ब्राउन मला भेटला. फायर डिपार्टमेन्टमध्ये एका माणसाची जरुरी आहे असं त्यानं मला सांगितलं. आगीची सूचना देणाऱ्या एका माणसाची जरुरी होती. महिन्याला दहा डॉलर्स पगार मिळणार होता. कुठंहि आग लागण्याचा टेलिफोन आला की ती बातमी आग विझवणाऱ्या पथकाला जाऊन सांगायची हे माझं काम होतं. विज ब्राउनने माझ्यासाठी मेयर कार्नेकडे शब्द टाकून मला ही नोकरी मिळवून दिली. बंबखान्याचा मुख्य अधिकारी जिम ओब्रायन मला म्हणाला, "तू पूर्वी युद्धावर गेला आहेस, तेव्हा हे काम तुला काहीं कठिण वाटणार नाही."

लोंबार्ड युनिव्हर्सिटीत मी माझं नाव घातलं. लॅटिन, इंग्लिश इनऑरगॅनिक केमिस्ट्री, वक्तृत्व आणि नाट्य हे विषय मी अभ्यासासाठी निवडले. लवकरच प्रोफेसर जॉन ग्रब आम्हाला दररोज सकाळीं आठ वाजता लॅटिन शिकवायला यायचे होते. अनेक वर्षांपूर्वी गाईचं दूध काढताना मी त्याना पाहिलं होतं. अशा रीतीनें माझा अभ्यास सुरू होणार होता. वर्ग चालू असताना मध्येच जर आग लागल्याची घंटा वाजली तर मला उठून जावं लागणार होतं, पण असं घडण्याची शक्यता क्वचितच होती.

माझ्या शिक्षणाला आरंभ होत होता. मला आठवत, मी शाळेत असताना मला शिकवणारी लॉटी गोल्डक्रिस्ट ही शिक्षिका एकदा बोलता बोलता म्हणाली होती, " मुलांनो, ज्ञानाचा सागर अफाट आहे. कितीहि शिकत राहिल तरी ते अपुरच पडणार. "